मनोहर ग्रंथमला—पुष्प १३ वें

# वादळी वारे

(विचारक्षोभक मतमतांतरांचें दिग्दर्शन व परीक्षण)

लेखक

दत्तात्रय केशव केळकर



१९४०



प्रकाशक

मनोहर ग्रंथमाला, पुणें

किंमत २ रुपये

# —वादळापूर्वीं—



'मनोहर ग्रंथमाले'चें १३ वें पुष्प म्हणून मुंबईच्या रुइया कॉलेजांतील प्राध्यापक श्री. द. के. केळकर यांचा 'वादळी वारे' हा निबंधसंग्रह प्रसिद्ध करण्यास आम्हांस आनंद वाटतो.

ग्रंथकाराचें 'काव्यालोचन' हें पुस्तक ज्यांनीं वाचलें असेल त्यांना ग्रंथकाराची मूलगामी विचारसरणी व मनोवेधक मांडणी याबद्दल आम्ही कांहीं मुद्दाम सांगावयास नकोच.

वादळी वाऱ्यांत एकत्र केलेले निबंध पूर्वी नियतकालिकांतून प्रसिद्ध झालेले होते. त्यांच्यावर योग्य तो संस्कार करून ते येथें एकत्र केले आहेत.

विचारक्षेत्रांत ज्या अनेक लाटा प्रस्तुत काळीं उसळत आहेत त्यांचें मार्मिक निरीक्षण येथें वाचकांस घडेल असें आम्हांस वाटतें. 'हिंदूंची समाजरचना ही पूर्णावस्थेस गेलेली असून समाजसुधारणा हें थोतांड होय', 'चिकित्सक पद्धति हा एक आंग्लशिक्षितांच्या बुद्धीस जडलेला किळसवाणा रोग होय', 'हिंदु संस्कृतींतील ब्राह्मणांची कामगिरी ही निवळ विघातक होय', 'शास्त्रीय शोधांनीं असमाधान मात्र दुणावलें आहे', 'मराठी काव्य सर्व जाळून टाकलें तरी जागतिक वाङ्मयाचें रेसभरहि नुकसान होणार नाहीं', 'शास्त्रीय पद्धतीनें समाजरचना सिद्ध झाली तर तिच्यांत काव्याला कोठेंच स्थान राहणार नाहीं', 'सातासमुद्रापलीकडून येऊन गोरगरिबांच्या खस्ता खाणारा मिशनरी हा केवळ देवमाणूस होय', 'शिक्षणासारख्या निर्लेप विषयांत राष्ट्रीय-अराष्ट्रीय ह्या भावना चुकीच्या होत', 'मातृभाषेचा अभिमान धरणें म्हणजे राष्ट्राचा विकास खुरटून टाकणें होय!', 'नीतिनियम हें बिनबुडाचें बुजगावणें होय' वगैरे अनेक मतमतांतरांच्या प्रक्षोभक लाटा राष्ट्राच्या मनोभूमीवर आजकाल आदळत आहेत. त्यांचें सागरजल येथें प्रत्यक्ष चाखण्यास सापडून त्याचेच बरोबर उलट बाजूनें वाहणाऱ्या झऱ्याचें जलहि प्राशन करावयास मिळणार आहे. समुद्रस्नान व तदनंतर निर्झरस्नान हें आरोग्यवर्धक असतें असें म्हणतात. प्रस्तुत पुस्तकाच्या

अवगाहनानेंहि वाचकाच्या मानसिक आरोग्यवर्धनास मदत होईल अशी आम्हांस आशा आहे.

याच ग्रंथकाराचें 'संस्कृतिसंगम' हें अभिनव पुस्तक आमच्या मालेंतून आम्ही लवकरच प्रसिद्ध करणार आहोंत, हें वाचकांस कळविण्याची आम्ही परवानगी घेतों.

—प्रकाशक.

---

# आभार-प्रदर्शन



ज्यांच्या उत्साहामुळेंच प्रस्तुत पुस्तक प्रसिद्ध होऊं शकलें ते मनोहर ग्रंथ-मालेचे चालक, ज्यांच्या सौजन्यामुळें मुद्रितें तपासतांना अनेकदां खोडाखोडी करण्याची सवलत घेणें शक्य झालें ते राजगुरु प्रेसचे व्यवस्थापक, ज्यांच्या कलेनें मुखपृष्ठ खुलविलें ते आर्ट कॉर्नरचे प्रोप्रायटर, व ज्या पत्र-मासिकांतून मूळ लेख प्रसिद्ध झाले त्यांचे संपादक या सर्वांचा मी फार ऋणी आहे.

मुंबई,
१ मार्च १९४०.

द. के. केळकर.

# अनुक्रमणिका

---

# लेखांचें प्रथम-प्रकाशन, स्थल, काल

(१) सह्याद्रि— ऑक्टोबर १९३६. (२) केसरी— मार्च १९३५. (३) जोत्स्ना— मे १९३७. (४) केसरी— १९३७. (५) केसरी— मार्च १९२७. (६) विविधज्ञानविस्तार— वर्ष ५९. (६) केसरी— नोव्हेंबर १९३५. (८) केसरी— मे १९२८. (९) केसरी— मे १९२६. (१०) मालवसाहित्य – ऑक्टोबर १९३७. (११) रुइया-कॉलेजपत्रिका १९३९. (१२) केसरी— १९२४. (१३) मुंबई हेमंत-व्याख्यानमाला— फेब्रुवारी १९३९.

---

# वादळी वारे

## — १ —

## शास्त्रानें श्रृंगारलेला समाज-संसार

गेल्या शें-दीडशें वर्षांत भौतिक शास्त्रानें मानवी संसारावर जो शृंगारसाज चढविला आहे तो केवळ अपूर्व होय. आपल्या संसारांत सुखसोयींची भर टाकतील असे शोध मनुष्य हजारों वर्षे लावीत आलाच आहे. पण या शें-दीडशें वर्षांत अशा शोधांचा जणों नुसता पाऊस पडला आहे. स्वच्छ नीलाकाशांत रात्रीच्या समयीं एखाददुसरी उल्का तळपून जात असतां हमेष पाहावयास सापडते; पण कार्तिक-मार्गशीर्ष मासांमध्यें कांहीं रात्री अशा असतात कीं, त्या रात्रीं आकाशाच्या ज्या भागाकडे नजर फेकावी त्या त्या भागांत तेजःपुंज तारका नुसत्या उड्या घेत असतांना आढळून येतात. तसेंच भर पौर्णिमेच्या दिवशीं सागराच्या लाटावर लाटा उसळूं लागून भरती येऊं लागली म्हणजे वाटतें कीं, जणों या लाटांची आतां अनंत परंपराच सुरू राहणार. तशीच गेल्या शें-दीडशें वर्षांत शास्त्रीय शोधांची नुसती गर्दी उसळून गेली आहे.

मानवी संस्कृतीच्या विकासाला अत्यंत आवश्यक असे कांहीं मूलभूत शोध फार प्राचीन काळींच लागले गेले. ऐतिहासिक दृष्टीनें फार दूरच्या प्राचीन काळांत न्याहाळून पाहूं गेलें तरी दृष्टि पोंहोचते तेथपर्यंतच्या समाजानें शेतकी, विणकाम, भाषा व समाजनियमन वगैरे मूलभूत गोष्टी आधींच साध्य केलेल्या दिसतात. गोल चाकाचा शोध लावून मानवाला रथारूढ करून ज्यानें पायपिटी वांचविली, काष्ठावर काष्ठ घासून अग्नि हुकमी तयार करण्याच्या कृतीनें हिंस्त्र प्राण्यांपासून व थंडीपासून निवारण करण्याचें अमोघ शस्त्र ज्यानें निर्माण केलें, मिळतील तेव्हांच व मिळतील तेवढींच फळें झाडावरून नुसतीं ओरबडून

खाण्याऐवजीं त्यांचें बीं पेरून हुकमी धान्य मिळवून मानवाची आद्यतम चिंता जी क्षुधा ती ज्यानें दूर केली, लिपीचा शोध लावून वाङ्मयाला स्खलनशील अशा मानवी स्मृतीच्या संदुकेंतून सोडवून अभंग अशा शिलालेखाचें चिरंजीवित्व ज्यानें मिळवून दिलें, ते सर्व प्राचीन काळचे ऋषिवर्य महान् अव्वल दर्जाचे शोधक होत. त्यांच्या शोधांनींच एरवीं दुर्बल असा हा साडेतीनहाती मानवप्राणी आपल्यापेक्षां शतपटींनीं सामर्थ्यवान् अशा इतर अनेक प्राण्यांना पुरून तर उरलाच, पण इतर प्राण्यांप्रमाणें शतकानुशतकें एकाच एक स्थिरावस्थेंत रखडत न पडतां शास्त्र, कला, वाङ्मय, नीतिनियम यांनीं समृद्ध असा संस्कृतिप्रासाद त्यानें उठविला.

## काव्यसृष्टीवर मात

या प्रासादांतील भौतिक सुखसोयींमध्यें तर गेल्या शेंपन्नास वर्षांत जितकी विलक्षण भर पडली आहे, तितकी पूर्वीं केव्हाच पडली नसावी. भौतिक सुखसोयींची मुख्य गुरुकिल्ली म्हणजे सृष्टीवरील स्वामित्व. सृष्टीच्या जामदारखान्यांत ऐश्वर्य नुसतें लोळत पडलें आहे; तिला नेत्रकटाक्षावर नाचविण्याची मोहिनी मात्र पाहिजे; मग तिच्या स्वामीच्या ऐश्वर्याला सीमा नाहीं. आणि हें अमर्याद ऐश्वर्य खास प्राप्त होईल अशी आशा वाटूं लागण्याइतकें सृष्टीचें रहस्य दिवसेंदिवस उकलूंहि लागलें आहे. एकापेक्षां एक क्रांतिकारक अशा लागत चाललेल्या शोधांच्या परंपरेनें शास्त्राच्या महत्त्वाकांक्षेची झेप आतां एवढी वाढली आहे कीं, सृष्टीचें अमुक रहस्य वा कोडें आपल्या बुद्धीस उकलणार नाहीं, किंवा कल्पनेला सुचलेल्या अमुक घटना आपल्या कर्तबगारीस व्यवहारांत उतरून दाखवितां येणार नाहींत असें त्याच्या स्वप्नींहि येत नाहींसें होत चाललें आहे. आणि यावें तरी कां ? त्याच्या शास्त्रीय बुद्धीला आणि अजस्र उद्योगाला यशाच तसें अचाट आलेलें आहे. शतकानुशतकें ज्या गोष्टी केवळ कविकल्पनेच्या विलासाचा विषय होऊन राहिल्या होत्या त्या आतां त्यानें प्रत्यक्ष आपल्या सेवेस हजर केल्या आहेत. आकाशाच्या अमर्याद विस्तारांत स्वच्छंदपणें विहार करणाऱ्या पक्ष्यांकडे, आणि दर्याच्या अथांग डोहांत सुखेनैव योगनिद्रा घेत पहुडणाऱ्या जलचरांकडे मानव हा शतकानुशतकें केवळ आशाळभूतपणें पाहत बसला होता. पण आतां पक्षिराज गरुडालाहि हेवा वाटावा अशा विलक्षण

भरारीनें तो उडूं शकतो, आणि उभा जन्म वरुणाच्या साम्राज्यांत घालविणाऱ्या जलचरांनींहि थक्क व्हावें अशा निर्घोरपणें दर्यामध्यें डुंबूं शकतो. प्राचीन काव्यें व संहिता यांतून विमानांचीं नावेंच नव्हे तर कांहींशीं तपशीलवार वर्णनेंहि आढळतात. यावरून पूर्वी एके काळीं विमानविद्या साध्य झाली होती असें मानलें तरी पुढें मात्र पुन्हा तिचा आत्यंतिक लोप झाला असला पाहिजे. कारण विमानांतून आकाशाचें अवगाहन करणाऱ्या राजांचीं वर्णनें आढळतात तीं सर्व पौराणिक काळांत. ऐतिहासिक काळीं कोणाहि राजाच्या दिमतीला विमान असल्याचा उल्लेख नाहीं. तें वैभव प्राप्त झालें आहे तें अगदीं अलीकडेच म्हणजे आजच्या तरुण पिढीच्या डोळ्यांदेखतच प्राप्त झालें आहे. तसेंच पाण्यामध्यें दडी मारून राहण्याची विद्या दुर्योधनास काय साध्य झाली असेल ती असो; पण पाण्यामध्यें मासा झोप घेई कैसा याचा अनुभव चाखावयाचा झाल्यास माशाच्याच जन्मास गेल्याशिवाय गत्यंतर नाहीं अशी तुकारामाप्रमाणें सामान्य जनाची आजवर समजूत व स्थिति होती. पण आतां मासोळीचा जन्म न स्वीकारतांहि पाणवुडींत बसून या मानवदेहींच 'येणेंचि डोळा येणेंचि कायें' तो खुशाल दर्याच्या कुशींत जाऊन पहुडूं लागला आहे. लहान मुलांमुलींना आतां उखाणा घालून विचारण्यास हरकत नाहीं कीं, 'पंख नसतां नभीं उडतो व कल्ले नसतां जलीं पहुडतो असा प्राणी कोण?'

## यौगिक सिद्धि व शास्त्रीय सिद्धि

योगी लोकांनीं असलीं सामर्थ्यें फार प्राचीन काळींच साध्य केलीं होतीं याची या ठिकाणीं वाचकांना आठवण झालीच असेल. आकाशांत संचार करणें किंवा जलांत बुडून राहणें, विश्वांतील कोणत्याहि ठिकाणचें ऐकणें किंवा पाहणें या गोष्टी योगी लोकांच्या हातचा मळ होता अशी साक्ष अनेक ग्रंथांत वाचावयास सापडते. हस्तिनापुरांतील राजवाड्यांत धृतराष्ट्राच्या सिंहासनाशेजारीं बसून कुरुक्षेत्रावरील रणधुमाळी दिव्य दृष्टीनें पाहून वर्णन करणाऱ्या संजयाची अद्भुत कथा तर प्रत्येकाच्या परिचयाची आहे. त्या कथेंत काय सत्य असेल तें असो; पण आज मात्र रेडिओ आणि टेलिव्हिजन यांचा यंत्रसंभार आपल्या दिवाण-खान्यांत सजवून ठेवणाऱ्या आजच्या संजयरावाला स्वतःच्या घरच्या शेजेवर सुखेनैव पडल्या पडल्या जर्मनींत गेलेले आपले हिंदी बांधव ऑलिंपिक सामन्यांत

काय करामत करीत आहेत हें प्रत्यक्षच पाहतां येतें व त्यांच्या गौरवपर केलेलीं भाषणें साक्षात् ऐकावयास सापडतात. योगमार्गांत या किंवा याहिपेक्षां अद्‌भुत अशा सिद्धि प्राप्त होत असतीलहि. पण आधुनिक शास्त्रानें साध्य केलेल्या सिद्धीची मातब्बरी कांहीं निराळीच आहे. योगमार्गांमध्यें सिद्धि प्राप्त करून घेण्याकरितां प्रत्येक साधकाला व्यक्तिशः उग्र तपश्चर्या करावी लागते. उलट रेडिओ, टेलिव्हिजन वगैरेसारख्या ज्या सिद्धि शास्त्रानें साध्य केल्या आहेत त्यांची साधना चालू असतां मूळ शोधक सिद्धाला जें काय घोर अनुष्ठान करावें लागलें असेल तेवढेंच; पण एकदा कां ह्या सिद्धि शास्त्रज्ञांच्या आश्रमांत येऊन अवतरल्या म्हणजे मग त्यांच्याकडून सेवाचाकरी कोणीहि करून घ्यावी. त्या आश्रमांत येतात त्या आजन्मसेविका म्हणून राहण्याकरितां, शापभ्रष्ट अप्सरेप्रमाणें कांहीं तरी कुरापत काढून स्वर्गांत परत पळून जाण्याकरितां नव्हेत! शास्त्रज्ञाला विद्युत्सिद्धि जी एकदा वश झाली ती कंसमामाच्या हातून निसटून कडाडून वर निघून जाणाऱ्या श्रीकृष्णभगिनीप्रमाणें शास्त्रज्ञाला शिव्या देत परत तर पळून गेली नाहींच, तर उलट पतिव्रता सतीप्रमाणें त्याच्या आश्रमांत अहोरात्र त्याची सेवा करीतच राहिलेली आहे. योगमार्गांतील सिद्धि या कांहींशा अधून मधून भूलोकाची सफर करणाऱ्या अप्सरेसारख्या होत. कांहीं काल एखाद्या सिद्धाची सेवा करावी आणि त्यानें देह ठेवला कीं, बाकीच्याची क्षिती न बाळगतां तडक गंधर्वलोकीं निघून जावें ही त्यांची रीत. उलट शास्त्रीय सिद्धि या वसिष्ठ मुनींच्या आश्रमांतील नंदिनी कामधेनूसारख्या अखंडकामनापूरक होत.

या शास्त्रीय सिद्धि मानवी संसारांत राहावयास आल्यापासून सुखसोयींची इतकी लयलूट झालेली आहे कीं, आजच्या सामान्य सुखवस्तु गृहस्थाला आपला संसार सजविण्यास चैनीच्या आणि हौसेच्या जितक्या गोष्टी साध्य झालेल्या आहेत तितक्या अवघ्या पन्नास वर्षांपूर्वी पृथ्वीवरील अत्यंत संपन्न व शक्तिमान् अशा सम्राटालाहि असाध्य होत्या. नुसत्या ग्रामोफोनची गोष्ट घ्या. चाहील त्या गवयाचें गाणें करविणें हें पैशाची रास समोर ओतण्याची ऐपत असणाऱ्या कुबेराला पूर्वींहि अशक्य नव्हतें. पण मन मानेल तेव्हां व मन मानेल तितकें आणि विद्यमान व दिवंगत अशांचेहि गाणें चालू ठेवणें हे सुलतानी सत्ताधीशालाहि शक्य नव्हतें. पण आतां फोनोची तबकडी तुमच्याजवळ असली कीं, हवी तेव्हां व हव्या तितक्या वेळेला तुम्ही आपल्या आवडत्या खांसाहेबांना

पाचारण करा. कलावंताचा सुप्रसिद्ध लहरीपणा विसरून तो तावडतोब तुमच्यापुढें तंबोरा घेऊन हजर झालाच म्हणून समजा! गवयाची लहर संभाळण्याची आतां बिलकूल तकलीफ नाहीं. सांगाल ती गायकी गाईल, एकच चीज हवे तितक्या वेळा म्हणेल, आणि वेडीं विद्रीं तोंडें दाखवून रसभंग न करतां सुरेल आवाजी तेवढी ऐकवील हें वर! आणि हें सर्व फोनोपूर्व जगाचा विश्वासहि बसणार नाहीं एवढ्या अल्प मोबदल्यांत!

फोनोच्या ऐवजीं रेडिओची तुम्हीं स्थापना केलीत म्हणजे मग तर काय सगळें विश्व तुमच्या कानांत सामावलें म्हणा ना! यंत्राची गुंडी हातांनीं हलके हलके फिरवीत घटकेंत मुंबईंतील संगीत ऐकावें, व जरा कंटाळा आला कीं गुंडी फिरवून क्षणभर विलायतेंतील क्रिकेटचा स्कोअर ऐकावा, आणि तो ऐकून झाला न झाला तोंच गुंडी फिरवून अमेरिकेंतील प्रेसिडेन्टाचें भाषण ऐकावें. टेलिव्हिजनच्या शोधानें तर एक यःकश्चित् हाताचें बोट समोर धरलें असतां पलीकडचें न दिसणाऱ्या तुमच्या दुर्बल दृष्टीला सगळ्या भूगोलावरील हवा तो देखावा दिसण्याचें सामर्थ्य प्राप्त करून दिलें आहे. श्रीकृष्ण सोळा हजार स्त्रियांच्या महालीं एकाच वेळीं प्रगट होत] असे असें आपण वाचलें आहे, पण आतां त्याचें तुम्हांला फारसें आश्चर्य वाटावयास नको. हजार ठिकाणीं एकसमयावच्छेदेंकरून तुम्हांस प्रत्यक्ष सदेह जरी हजर राहतां आलें नाहीं तरी टेलिव्हिजनच्या यंत्रासमोर तुम्ही उभे राहिलांत तर तुमच्या देशोदेशींच्या हजारों मित्रांना तुम्ही एकाच वेळीं दिसूं मात्र खास शकतां!

## गंगेची कावड

निमिषार्धांत हजारों ठिकाणीं जातां येत नसलें तर न येवो; पण एकंदरींत संचारसामर्थ्य केवढें प्रचंड वाढलें आहे पहा. दीडशें वर्षांपूर्वी गंगेची कावड रामेश्वरास पोंहोचविण्याची व्यवस्था करणाऱ्या अहिल्याबाईस किती टप्पे ठेवावे लागले असतील, किती माणसें नेमावीं लागलीं असतील आणि इतकें करून किती दिवसांनीं ती रामेश्वरास जाऊन पोंहोचत असेल! पण आजच्या तिच्या नातीपणतीच्या मनांत गंगेची कावड रामेश्वरास वाहावयाचें आलें तर तिनें पहाटे उठून मुखमार्जन करून महेश्वरच्या सौधशिखरावरून विमानोड्डाण करावें,

सूर्यबिंब दिसूं लागलें नाहीं तोंच वाराणशींत गंगातीरावर उतरावें, तेथें स्नानविधि उरकून गिंडी भरून घ्यावी आणि पुन्हा उड्डाण करावें तों मध्यान्हीं रामेश्वरीं उतरून गंगोदकाचा अभिषेक करावा. नंतर भोजन करून सेतु घेऊन पुन्हा विमानारूढ जें व्हावें तें पोटांतील पाणीहि हलणार नाहीं अशा विमानस्थ सुखशय्येवर वामकुक्षी घेत, सावल्या फिरूं लागल्यावर थेट काशी क्षेत्रीं हजर व्हावें, सेतु टाकून अवघ्या दिवसांत काशीयात्रा संपूर्ण करावी व चंद्रबिंब दिसूं लागेतों पुन्हा मुक्कामाला महेश्वरीं उपस्थित व्हावें! विमानाचा वेग आजच्च तासीं चारशें मैलांच्यावर गेलेला आहे आणि तो सध्यांच्या दुप्पट-तिप्पट वाढला तर सूर्याच्या वेगानें अवघ्या एका दिवसांत वैमानिक सबंध पृथ्वीप्रदक्षिणा करून येऊं शकेल. सूर्याच्या बरोबर तो एवढ्या वेगानें पूर्वेकडून पश्चिमेकडे भ्रमण करूं लागला तर जयद्रथ-वधाच्या वेळीं श्रीकृष्णानें सूर्यबिंबाला रोखून धरलें तसा तो सूर्यबिंबाला आपल्या माथ्यावर कायमचा तळपत ठेवूं शकेल! सूर्यग्रहणाच्या पर्वकाळीं सूर्य ग्रस्तस्थितींत अस्तमान झाल्यास पुन्हा दर्शन घडेपर्यंत तोंडांत पाणी घालतां येत नाहीं; पण विमानांत बसून तो करील वेगानें धावूं लागला म्हणजे ग्रहण सुटेपर्यंत सूर्यबिंबाला क्षितिजाखालीं मुळीं जाऊंच देणार नाहीं. ही गोष्ट पुढची, पण सूर्यदर्शन न घडल्यामुळें वर्षाकाळीं जें उपोषण पडतें तें आजहि त्याला विमानसिद्धीनें टाळतां येईल. कारण सूर्यबिंबाला झाकून टाकणाऱ्या मेघाच्या पडद्यापलीकडे उंच उडून सूर्याचें दर्शन घेणें, विमानानें आतां अगदींच सुलभ झालें आहे. असो.

विमानें, पाणबुड्या, रेडिओ, टेलिव्हिजन, बोलपट वगैरे शास्त्रीय सिद्धि या विशेष क्रांतिकारक व आंधळ्याच्याहि डोळ्यांत भरतील अशा सिद्धि होत. पण यांशिवाय इतक्या शतसहस्र लहानसहान बाबतींत शास्त्रानें आपल्या लाडक्या सुखलोलुप कल्पनेचे चोजले पुरविले आहेत कीं, तितके स्त्रीलंपट सम्राटानें आपल्या प्रेमपात्राचे काय पुरवावे! रात्रीची भयाणता दूर करणारा दिवा, वारा लागणार नाहीं पण पलीकडचें दिसेल अशी पारदर्शक काच, दगडापेक्षां कठीण पण तुकडा न पडतां वाकेल असें लोखंड, अमृतासारखें गोड असें गायीचें दूध आणि झाडांचीं फळें, थंडीवाऱ्यापासून निवारण करील असा ऊबदार कपडा वगैरे सुखसाधनें फार प्राचीन काळींच मानवानें हस्तगत केलीं. पण या प्रत्येकांत कांहीं उणीवा आहेत याचें शल्य त्याला बोचत होतें. रमणीला वार्धक्य यावें,

चंद्राला डाग लागावा वगैरे सप्तशल्यांचें सुभाषितकारानें वर्णन केलें आहे, त्याप्रमाणें आजूबाजूच्या सर्व पदार्थांना उजळणाऱ्या दिव्याला स्वतःच्या खालचा अंधार नष्ट करतां येऊं नये, पारदर्शक काच पैदा केली, पण ती केव्हां फुटेल या धास्तीनें तिची तब्येत संभाळत राहावी लागावी, फत्तरालाहि फोडणारा लोखंडी धातु वश झाला पण शिखंडीपुढें भीष्माचार्यांनीं हात टेकावे तसें साध्या चिखलमातीच्या स्पर्शानें तो खंगू व गंजू लागावा, अग्नीनें डोळयांना तेज आणावें पण त्याच्या धूमानें दृष्टि धुंद करावी, कपड्यानें थंडीपासून निवारण व्हावें पण पावसांत तोच अंगावर भिजला म्हणजे हिंवताप आणण्यास कारणीभूत व्हावा, अमृतोपम दुग्ध आणि फळें सापडावीं पण थोडक्याच काळांत विटून आणि नासून जाऊं लागावीं, विहिरीला पाणी लागावें पण तें इतक्या खोलीवर कीं चुळकाभर पाणी वर येईपर्यंत ओंजळभर पाणी डोळयांतून गळावें, अशा प्रकारचीं अनेक शल्यें त्याच्या मनांत शतकानुशतकें बोचत होतीं.

## म्हणींचा मृत्यु

हीं सर्व शल्यें आतां शास्त्रज्ञांनीं काढून टाकलीं आहेत. दिव्याला ओशाळ-गत करणारा त्याच्याखालचा अंधार तर त्यानें नष्ट केलाच आहे, पण हात न भाजतां, तेल न सांडतां, पेट न घेतां, वाऱ्यानें न विझतां हवा तेथें उशाशीं, पायथ्याशीं, हातांत, खिशांत व हवा तसा उभा आडवा खेळवितां येईल असा त्याचा विद्युत् देह बनविला आहे. या दीपानें 'दिव्याखालीं अंधार' ही म्हण जशी मारून टाकली, तशी पाहायला पारदर्शक पण वापरायला दगडी फरशीवर पडली असतांहि न फुटणारी अशी काच निर्माण करून ' अब्रू म्हणजे काचेचें भांडें ' हें रूढ रूपकहि शास्त्रानें रद्दीत काढलें आहे. आणि काचेला अभंगत्व आणावयाचें कसें ? तर बायका सांजाची पोळी लाटतात तसें. दोन पोळयांमध्यें सांजाचा पातळ थर भरतात तसें दोन ताव-दानांमध्यें सेल्युलॉइडसारख्या एखाद्या पारदर्शक पदार्थाचा पातळ थर बसविला कीं झाली भंगुर काचेची अभंग काच. जणों द्वैत म्हणजे नश्वरता व अद्वैत म्हणजे शाश्वतता या वेदांती सूत्राचें ही अभंग काच म्हणजे व्यावहारिक प्रतिकच ! भिजलेलें घोंगडें भिजत पडावयाचें याहि वाक्प्रचाराला भिजत न टाकतां त्यानें निकालांत काढलें आहे. घोंगड्यावर तो आतां अशी रासायनिक क्रिया करूं शकतो

कीं मुसळधार पाऊस अंगावर घेऊनहि अखंड पाण्यांत राहून निर्लेप राहणाऱ्या पद्मपत्राप्रमाणें तें खुशाल खडखडीत राहूं शकतें. अंगीं असल्या नीरनिरोधक घोंगडीचा डगला, पायीं गुडघ्यावर डोकावणारे गम बूट, शिरीं डोक्यावर नाचूं पाहणाऱ्या जलधारांना हट् म्हणून झिडकारणारी हॅट व तोंडीं लठ्ठ पेटलेला सिगार, अशा थाटानें नटल्यावर ऐन मुसळधार पाऊस पडत असतां मुद्दाम बाहेर पडून, खिशांत हात घालून, गडगडून सरींवर सरीचे चाबुक उडविणाऱ्या काळ्या कुट्ट ढगांकडे तुच्छतेनें पाहत, चिखलांतूनहि 'नमयतीव गतिर्धरित्रीम्' अशा थाटानें दणकून पावलें टाकीत जाण्याचा कैफ कोणास चढणार नाहीं ?

पायीं चालण्याची ही ऐट! मग मोटार, आगगाडी आणि विमान त्यांच्यावर स्वार होऊन वाटेंतील नद्यानाले, दऱ्याखोरीं, जंगलें-अरण्यें यांच्याकडे उर्मटपणें पाहत तुफान वेगानें धावत जाणाऱ्या प्रवाशाचें ऐश्वर्य काय वर्णावें ? रात्रीच्या प्रहरीं फर्स्ट क्लासच्या डब्यांतील लठ्ठ गुबगुबीत गादीवर पडावें, दिवा बंद करावा, पंखा सुरू करावा, आणि खुशाल घोरत झोपीं जावें. वाटेंत डोळे फिरविणारे कडे-कपारी येवोत, धो धो वाहून गिळूं पाहणारी नदी येवो, वा हिंस्र पशूंनीं व्याप्त अशीं निबिड जंगलें येवोत. स्वतः खांचाखळग्यांतून पायीं खडणारी माता जशी आपल्या तान्हुल्याला पोटाशीं धरून त्याच्या ओठांतील दूधहि हलणार नाहीं अशीं अलग वागविते, तशी आगगाडी माउलीहि स्वतः डोंगराच्या कड्यावरून तोल संभाळते, नदीवरून परतीरावर उडी मारते, पण आपल्या मांडीवर विश्रब्धपणें पहुडलेल्या प्रवाशाला नुसतें चाळवून या कुशीवरून त्या कुशीवर वळण्याइतकीहि तकलीफ पडूं देत नाहीं. आज-काल्च्या आगबोटी म्हणजे तर तरते राजवाडेच. त्यांत रेडिओ काय, सिनेमा काय, नाचरंग काय, मेजवान्या काय, टेनिस काय, पोहण्याचे तलाव काय, आणि नाहीं काय ? भर्तृहरीचें जुनें वचन आहे कीं, 'किं सुखं अप्रवासगमनम्' म्हणजे सुख काय तर प्रवास करण्याचें नशिबीं न येणें हें होय. राजा भर्तृहरि जर आजच्या एखाद्या बोटीवर गुप्तपणें प्रगट होऊन तेथील सुखसोयी निरीक्षण करील तर त्याला आपलें सुभाषित नेमकें उलटें लिहावें असें वाटल्यावांचून राहणार नाहीं. राजा भर्तृहरीच्या काळीं प्रवास म्हणजे गैरसोय असें समीकरण असल्यानें प्रवास हें प्रोषितभर्तृकेप्रमाणें इतरांनाहि मनःशल्यच होतें. पण आतां प्रवासाला मनःशल्य कोण करंटा म्हणेल ?

# भोळा इंद्र

सुखसोयींच्या या लयलुटीबरोबर मानवाचे कष्ट कमी करण्यांतील शास्त्राची कामगिरीहि कमी आश्चर्यकारक नाहीं. कष्टाचा मूर्तिमंत पुतळा म्हणजे शेतकरी! काळींत नांगर घातल्यापासून तों दाणा खळयांतून उचलून घरच्या कणगींत येऊन पडेपर्यंत शेतकऱ्याला हाडाचीं नुसतीं काडें करावीं लागतात. प्रत्येक बाब जिकिरीची आणि चिंतेची. आधीं मेघराजा वेळेवर निघाला पाहिजे. मृगाच्या ठोक्याला पावसाची झिमझिम सुरू झाली तर ठीक, नाहीं तर आभाळांत कोरडे पांढरे ढग नुसते भिरभिरूं लागले म्हणजे आकाशांतून पाणी पडेल म्हणून वाट पाहतां पाहतां याच्या काळजाचेंच पाणी होऊन जावें. बरें, पाऊस पडला आणि पीक आलें तरी त्यावर कीड पडून उपयोगी नाहीं, रोग पडून उपयोगी नाहीं. त्यांतून पीक वांचलें तरी पाखरांच्या तोंडून बचावलें पाहिजे. इतक्या सर्वांतून वांचून बचावून धान्य घरच्या ओसरीवर येउन पडलें म्हणजे मग बळिराजाच्या तोंडावर हास्य फुटूं लागायचें आणि तोंडांत लावणीचे सूर घोळूं लागायचे.

या कष्टमय जीवनांतील सर्वच कांटे शास्त्राला काढून टाकतां आले आहेत असें नाहीं. शास्त्रज्ञ झाला तरी हुकमी पाऊस थोडाच पाडूं शकतो! इंद्राच्या हातचें विजेचें खड्ग त्यानें हस्तगत केलें आहे. पण खुद्द पर्जन्यराज इंद्राला तो अद्याप हुकूम करूं शकत नाहीं. दीपराग आळवून पूर्वीं दिवे लागत असत म्हणतात त्याप्रमाणें विद्युत् साहाय्यानें निमिषार्धांत तो आज दिवे लावूं शकतो. पण पर्जन्यसूक्त तोंडपाठ म्हणून पर्जन्य पाडण्याच्या काव्यमय युक्तीच्या तोडीची शास्त्रीय युक्ति त्याला अद्याप वश झालेली नाहीं. पण पर्जन्य हा लहरी असला आणि तुमच्याच शेतवाडीवर तो रुसला तरी इतर कोठें तरी डोंगरमाथ्यावर वा नदीकांठीं तो लयलूट करीत असतोच ना? मग झालें तर. तेथें त्यानें स्वैर हस्तानें उधळलेली संपत्ति प्रचंड बंधारे बांधून आणि प्रदीर्घ कालवे खणून शास्त्रज्ञ तुमच्या पानमळयांत आणून सोडील. कोठें भाटघर व कोठें बारामती-बेलापूर? पण बारामतीवर पर्जन्यराज रुष्ट झाला तर भाटघरच्या डोंगरावर जाऊन शास्त्रज्ञ त्याची समजूत काढील आणि तेथील पाणी आणून फलटण-बारामतीचा ऊंस पिकवील. लांबून कालवा बांधून आणण्याचेंच कशाला? हवें तेवढें खोल खणत जाण्याची उमेद असली म्हणजे म्हणाल तेथें पाणी लागेल.

शरपंजरीं पडलेल्या भीष्माच्या तोंडीं पाताळची गंगा तीर मारून अर्जुनानें घातली असें आपण वाचतोंच ना ? आणि त्याचें इतकेंसें आश्चर्य वाटावयास नको ! कारण आजचा शास्त्रज्ञ हा खोदक यंत्र आणि पंप यांच्या साहाय्यानें सप्त पाताळांपैकीं सांगाल त्या पाताळांतील गंगा तुमचा मळा शिंपण्यास उभी करील. सहारासारख्या वैराण वाळवंटांत सस्यश्यामला वनराजी निर्माण करण्याचीं स्वप्नें आजच त्याला पडूं लागलीं आहेत. तात्पर्य, साक्षात् पर्जन्यराज इंद्राकडून खंडणी वसूल करण्याचें त्याला साधलें नसलें, तरी त्याच भोळ्या इंद्रानें इतस्ततः स्वैर उधळलेली सलिल-संपत्ति युक्तिप्रयुक्तीनें हस्तगत करणें शास्त्रज्ञाला आजहि साधलें आहे.

## कीटकाचें राजकारण

शेतकऱ्याच्या चिंतेचा दुसरा विषय म्हणजे पिकावरील कीड व रोगराई. ही चिंता निवारण्याकरितां शास्त्रज्ञांनीं हजारों, लाखों कृमि-कीटकांचा इतका निरलसपणें, चिकाटीनें आणि कसोशीनें अभ्यास केला आहे कीं, कष्टाळु शेतकऱ्यानेंहि तोंडीं बोट घालावें. कृमि-कीटक म्हणजे पायदळीं चिरडण्याचा आणि चिरडला म्हणजे पायाला घाण लागली म्हणून चडफडायचा विषय! पण शास्त्रज्ञानें या खातेऱ्यांत लोळणाऱ्या, किळसवाण्या, दुर्गंधि, खाजणाऱ्या अशा असंख्य कृमि-कीटकांची आपल्या प्रयोगशाळेंत इतक्या निगोतीनें व खर्चिकपणानें जोपासना चालविली आहे कीं, लक्ष्मीधर जवाहिऱ्या आपल्या हिऱ्या-मोत्यांची देखील येवढी काळजी घेत नसेल. त्या त्या प्रकारचे किती कीटक शास्त्रज्ञांनीं जमविले आहेत असें तुम्हांस वाटतें? तुम्ही आम्ही दहा-पांच फार झालें तर पांच-पन्नास किड्यांचीं नांवें सांगूं. पण शास्त्रज्ञानीं थोडे-थोडके नव्हे, दहा पांच हजारच नव्हे, तर चांगल्या दोन लाखांवर किड्यांची मोजदाद केलेली आहे म्हणे! नुसती मोजदाद केली आहे एवढेंच नव्हे, तर त्यांचे स्वभावविशेष पारखले आहेत, त्यांच्या लहरी समजावून घेतल्या आहेत, त्यांचे हेवे-दावे व वैर-मैत्री पाहून ठेवली आहे. या चिकाटीच्या आणि जिगजिगीच्या तपस्येमुळें त्याला कीटककंडनाची सिद्धि पूर्ण प्राप्त झालेली आहे. तुमच्या पिकांवर कीड पडूं लागली कीं, ताबडतोब तुम्हीं करावयाचें तें फक्त एवढेंच कीं, शास्त्रज्ञाकडे त्यांतील थोडी कीड चार दिवस पाहुणचार घ्यावयास धाडावयाची. थोड्याच

दिवसांत शास्त्रज्ञाकडून तुम्हांला त्या किडीच्या शत्रुकिडीचें एक पार्सल येईल. तें उघडा आणि आपल्या पिकावर सोडून द्या म्हणजे तुमची कामगिरी आणि चिंता संपली. या नव्या आलेल्या पाहुण्याला एकदां ओसरी दिलीत कीं साम्राज्य स्थापणाऱ्या धूर्त राष्ट्राप्रमाणें तो लौकरच मूळ मालकाला गुंडाळून ठेवील आणि मग मूळ कीड ही या नव्या कीटकाची स्वाभाविक भक्ष्यच असल्यानें तिचा मागमूसहि उरणार नाहीं.

नको असणाऱ्या पण उदंड माजणाऱ्या वनस्पतीचा नायनाट करण्यांत शास्त्रज्ञानें कसें शंभर नंबरी यश मिळविलें आहे हें आपल्याकडील निवडुंगावरून सर्वांच्या परिचयाचें झालेंच आहे. कोचीनियल नांवाच्या एका किडीनें या निवडुंगाचा येवढा फन्ना उडविला आहे कीं, जागोजाग फडा उभारून आपणास हटकणाऱ्या या निवडुंगाचें रानोमाळ पायपिटी केली तरी औषधास-सुद्धां बोंड सांपडूं नये. हिंवताप आणणाऱ्या डासांच्या संहाराची युक्तीहि इतकी फलद्रूप झालेली आहे कीं, इटलीसारख्या देशामध्यें आतां हिंवतापाचे धडे कानांशीं गुणगुणणाऱ्या डासांकडून न घेतां पुस्तकांतच वाचावे लागतात. साचलेल्या डबक्यांत डांस आपलीं अंडीं घालतात म्हणून पहिल्यापहिल्यांदा त्यांवर रॉकेल ओतीत असत. असें रॉकेल किती आणि कोठें ओतणार? पण आतां असा एक कृमि सांपडला आहे कीं, डबक्यांत सोडला कीं तो डासांची ऐन जिनसी अंडींच खाऊन टाकतो. मोठ्या माशानें लहान मासा तोंडीं लावावा हा मात्स्यन्याय सृष्टींत फार जारी आहे. प्रत्येक जीवजिवाणूचा भक्षक असा कोणी तरी शत्रु आहेच. चतुर मुत्सद्दी परक्या राष्ट्रांमध्यें परस्पर कलागत लावून स्वतःच्या राष्ट्राचें संरक्षण करतो तसा शास्त्रज्ञ हा सृष्टींतील नैसर्गिक शत्रु एकमेकांवर सोडून स्वतः गंमत पाहत बसतो. सृष्टीमध्यें निरुपयोगी अशी वस्तुच नाहीं. उपयोग करून घेण्याची अक्कल मात्र हवी. वेदान्त्याला क्षुद्र कीटकापासून परमहंसापर्यंत सर्व प्राणी एकमेव चैतन्याचींच रूपें दिसतात. तसेच क्षुद्रांतील क्षुद्रतम जंतु असेना, शास्त्रज्ञाच्या दृष्टीला तो केव्हांहि उपेक्षणीय दिसत नाहीं. कांहीं ना कांहीं तरी सेवा तो प्रत्येकाकडून घेईलच. मैल्याची दुर्गंधि नाहींशी करण्याचाच प्रश्न घ्याना. मैला वाहून नेण्याचें काम आपल्या भाइबंदांनाच करावें लागावें हें एक समाज-रचनेंतील मोठेंच शल्य आहे. पण शास्त्रज्ञाच्या कीटक-भांडारांत एक कीटक असा गवसला आहे कीं, जो हें

हलालखोराचें काम स्वतः उरकून एका अत्यंत गलिच्छ अशा व्यवसायांतून मानवाची कायमची सुटका करील. ह्या जातीचे किडे मैल्याच्या कुंडीमध्यें सोडून दिले कीं, तेथील सर्व घाण ते फस्त करून शुद्ध स्वच्छ पाणी तेवढें शिल्लक ठेवतात. मग तें पाणी पाटांतून तुमच्या बागांतून खेळविण्यासहि हरकत नाहीं, इतकें तें निर्गंध झालेलें असतें. शेतकऱ्याला या किड्याची फारशी गरज नसतेच कारण मैल्यांतून उत्कृष्ट सोनखत तयार करण्याची विद्या त्याला साध्य झालेली असतेच.

पण शेतकऱ्याचा मुख्य शत्रु जो कीड त्यापासून शास्त्रज्ञ त्याची कशी सुटका करितो याकडे पुन्हा एकदां वळूं या; कारण या किडीमुळें होणारें नुकसान फार प्रचंड आहे. खुद्द आपल्या हिंदुस्थान देशांतच दरवर्षी पिकांच्या रोगांमुळें, आणि त्यांतल्या बऱ्याच रोगांचें जनकत्व किडीकडेच असतें, सुमारें ५० कोटि रुपयांचें नुकसान होत असावें असा तज्ज्ञांचा अंदाज आहे! या रोगांवर, शास्त्रज्ञ दोन बाजूंनीं हल्ला करतो. एक म्हणजे एखाद्या पिकाचीं हजारों-लाखों रोपटीं तपासून किंवा संकराचें शेंकडों प्रयोग करून रोगाला दाद न देणारी अशी एक नवीन जात निवडून वा निर्माण करून त्याचीच निपज करणें. दुसरें म्हणजे जेथें कीड लागली असेल तेथें त्या किडीचा भक्षक कीटक आणून सोडणें. पहिल्या प्रकारचें उदाहरण म्हणजे गव्हाला जडणारा तांबेरा नांवाचा जो रोग होतो तो होय. हा रोग गव्हाच्या पिकाला नेहमीं झपाटींत आला आहे. पण शास्त्रज्ञांच्या पंचाक्षरी प्रयोगामुळें त्याचें कांही न चालून त्यानें आतां कायमची गति घेतली आहे. याहीपुढें जाऊन शास्त्रज्ञाला अशा कांहीं पिकांच्या जाती सांपडल्या आहेत कीं, धान्य उगवल्यावर मध्यंतरीं पाऊस न पडला तरी पीक जळून न जातां पुढील वृष्टीची वाट पाहत योगनिद्रेंत त्यांनीं सुखें राहावें. रोगाला किंवा किडीला भीकच घालणार नाहीं अशी सकस जात निर्माण करणें हा उत्तम पक्ष. पण तो न साधला तर किडीचा संहार करणारी अन्य कीड आणून सोडणें हा दुसरा पक्ष. उसावर विरिला नांवाची कीड पडते त्याची अशा रीतीनेंच परस्पर वाट लावली आहे.

## छाटी कुरतडणारा उंदीर

नव्या वसाहती केल्यावर आणि तेथें पिकें काढल्यावर वसाहतवाल्यांना पिकांच्या रोगासंबंधानें जे विचित्र अनुभव आले व त्यावर त्यांनीं जे तोडगे वापरले ते

मोठे विलक्षणच! सृष्टीमध्यें एकमेकांचे शत्रु-मित्र जवळच राहतात. पण स्थलांतर करतांना एखाद्या कीटकाचा शत्रु जर चुकून मागें राहिला तर त्याची वाढ अमर्याद होते आणि मग त्याला मैल मैल उभें पीक फस्त करण्यास काय उशीर? अशा वेळीं त्याचा शत्रु हुडकून काढून मुद्दाम तेथें आणून सोडावा लागतो. उंदीर छाटी कुरतडूं लागला म्हणजे मांजर पाळावयाची युक्ति संन्याशालाहि सुचत असते. पण शास्त्रज्ञांनीं उंदरा-मांजराच्या सारख्या स्वभावशत्रूंच्या कित्येक जोडया मुद्दाम अभ्यासल्या आहेत आणि त्यामुळें अनेक पिकें वांचविलीं आहेत. सुमारें चाळीस वर्षांपूर्वी कॅलिफोर्नियामध्यें नारिंगांच्या पिकावर भयंकर कीड पडली तेव्हां शास्त्रज्ञांनीं केलें काय तर आस्ट्रे-लियांतून लेडी बर्ड नांवाचे कीटक आणून नारिंगांच्या बागांतून दिले सोडून! त्यांनीं येतांच कीड पार खाऊन टाकली. फिजी बेटांत नारळाच्या आगरांत पटागी किड्यांनीं असाच एकदां धुमाकूळ घातला होता, तेव्हां त्यांचा समाचार घेण्याकरिता शास्त्रज्ञांनीं मलाया बेटांतून एक माशी शोधून काढली आणि त्या माशांचें एक पथक दिलें रवाना करून फिजीमध्यें!

पण कांहीं वेळा कीडभक्षक सैन्याला बोलावणें म्हणजे परकी गारदी सैन्य पोसण्यासारखें होतें. गारदी शत्रूवर तुटून पडतो, पण शत्रूचा निःपात झाला आणि तलवार रिकामी पडली म्हणजे शेवटीं तीच तरवार खुद्द धन्यावर उगारण्यास तो कमी करीत नाहीं. त्याचप्रमाणें कीडीचा शत्रु प्रथम कीड खाऊन टाकतो खरी, पण कीड संपल्यावर वखवखलेला तोच शत्रु खुद्द पिकावरही ताव मारण्यास कमी करीत नाहीं. पण यावरहि शास्त्रज्ञांनीं मात केलेली आहे. त्यांनीं कांहीं शत्रु असे शोधून काढले आहेत कीं, ते आपलीं अंडीं खुद्द भक्ष्याच्या पोटांतच घालतात म्हणजे एकीकडे कीटकांच्या संहार होत चालला कीं दुसरीकडे त्या बरोबरच आणि त्याच्या प्रमाणांतच संहारक कीटकांची पैदासहि घटत जाते, आणि शेवटीं सुंदोपसुंदाप्रमाणें एकमेकांना मारून हें कीटकोपकीटक वृक्षराजीला निर्वेध नांदूं देतात. अशा रीतीनें शास्त्रज्ञांनीं संशो-धनाची किचकट जिगजिग सोसून शेतकऱ्याची चिंता दूर करण्याचीं अनेक साधनें निर्माण केलीं आहेत.

फळांच्या बाबतींत पीक पदरांत पडलें तरी फळें नंतर टिकवावयाचीं कशीं हा एक निराळाच घोर बागवानाला पडत असतो. मोसमामध्यें फळें येऊं

लागलीं म्हणजे अशीं येतात कीं, त्यांचा नुसता सडा पडतो आणि 'अनंत हस्तें कमलवरानें देतां किती घेशिल दो करानें' अशी वेचणाराची भांबावलेली अवस्था होऊन जाते. आतां हीं फळें टिकवितां न आलीं तर सृष्टिसुंदरीनें मुक्त हस्तानें स्वैरपणें उधळलेली हीं संपत्ति उघड्या डोळ्यांनीं फुकट गेलेली पाहावयाचें नशिबीं मात्र यावयाचें. पण निर्वात, निर्जंतुक डब्यामध्यें फळें भरून ठेवण्याची युक्ति शास्त्रज्ञांनीं काढल्यामुळें मार्गशीर्ष महिन्यांतील विवाह-समारंभांत एखादी अडेल तट्टू विहीण ऐनवतांत आंबे पाहिजेत म्हणून रुसून फुगून बसली तर वैशाखांत भरून ठेवलेल्या बरणींतून आंबे काढून तिची समजूत काढणें आतां शक्य झालें आहे.

## घटोत्कची बाजार

अन्नाची तरतूद झाली कीं श्रीमंत-गरीब सर्वांना चैनीचे चोजले सहजच सुचतात. पैकीं श्रीमंतांच्या चैनीचे कोड पुरविण्याप्रीत्यर्थ शास्त्रज्ञानें काय करामत केली आहे याचें दिग्दर्शन वर झालेंच आहे. आतां गरीब गोपींनाहि ठुमकतां, मिरवितां यावें याविषयीं शास्त्रज्ञानें काय हिकमत चालविली आहे ती पहा. रेशमी तलम कापड, मोहक सुगंधी अत्तरें आणि मोत्यांचे दागिने असलीं विलासी लेणीं जीं पूर्वीं श्रीमंतांनाच साध्य होतीं तीं आतां गरिबानांहि विकत घेतां यावीं अशी त्याची मनीषा आहे. त्याकरितां त्यानें एक नवीनच बाजार उघडला आहे. त्या बाजाराला नांव द्यावयाचें तर 'घटोत्कची बाजार' असेंच यथार्थतेनें देतां येईल. घटोत्कची बाजाराची कथा तुम्हीं पुराणांतून वाचलीच असेल. घटोत्कची बाजारांत अशी घोषणा केली होती कीं, कोणीहि कसलाहि जुना माल आणून द्यावा आणि त्याच्या भारंभार तसलाच नवा माल घेऊन जावा ! आजच्या शास्त्रज्ञांनीं बसविलेला बाजार हा पौराणिक घटोत्कचाच्याहीपेक्षां अजब आहे. घटोत्कची बाजारांत नवी पैठणी हवी तर जुनी पैठणीच नेऊन द्यावी लागे. पण नव्या शास्त्रीय बाजारांत पैठणी मिळण्याकरितां रेशमी जुनेरें द्यावीं लागत नाहींत. तर तुमच्या शेतांतला टोपलीभर झाड-पाला नेऊन दिलात तरी भागेल ! तुम्हांस आश्चर्य वाटावयास नको. शाकुंतल नाटकांत तुम्हीं वाचलें आहांत ना कीं, शकुंतला सासरीं जावयास निघाली

तेव्हां आश्रमांतील वृक्षवेलींनी तिला क्षौम म्हणजे तलम रेशमी वस्त्रें अर्पण केलीं. तसली कण्वमुनींना प्राप्त झालेली ही सिद्धि आतां शास्त्रज्ञानेंहि वश केली आहे. म्हणजे तो आतां वृक्षवेलींपासूनच सुंदर तजेलदार असें रेशीम निर्माण करूं लागला आहे; आणि तें करतांना रेशमी किड्यांची पूर्वी करावी लागत असे तशी हत्याहि त्याला करावी लागत नाहीं हें वर! त्यानें विचार केला कीं, किडा झोप घेत असतां त्याला मारून टाकून त्याचें अंथरूण-पांघरूण लांबविण्यापेक्षां तो विणीत बसला असतां त्याच्याकडून त्याची विद्या शिकून घेणें हेंच अधिक श्रेयस्कर नाहीं का! एका शास्त्रज्ञाला ही विचारसरणी पटल्याबरोबर त्यानें तत्काल रेशमी किड्याच्या पायाशीं बसून रेशीमविद्येचे धडे घेण्यास सुरुवात केली. रेशमी किडा तुतीचीं पानें खातो व तीं पचवून बारीक धागा काढतो तेंच आपलें रेशीम. शास्त्रज्ञानें विचार केला कीं कीटकाच्या पोटांत तुतीच्या पानांवर जी किमया घडते ती रसायनशाळेंत सिद्ध का नाहीं होणार! आणि प्रयोग करून पाहतां ती साध्य झालीहि. झाडांचा मुख्य घटक सेल्युलोज नांवाचा एक चिकट मऊ पदार्थ असतो. तो एखाद्या रसायनांत विरघळविला व नंतर बारीक भोंकांतून दाबानें कारंज्याप्रमाणें उडविला आणि शेवटीं ज्या रसायनांत मूळ विरघळविला असेल तें उडून जाऊं दिलें कीं हवे तसे तलम धागे हातीं येतात; येवढीच काय ती किमया! आतां तुम्ही तुमच्या शेतांतील निरुपयोगी झाडझडोऱ्याच्या टोपल्या भरभरून शास्त्रज्ञाच्या घटोत्कची प्रयोग-शाळेंत नेऊन द्या म्हणजे तो तुम्हांला उत्तम रेशीम मोबदल्यांत देईल, आणि तें रेशीमहि असें कीं एक टिकाऊपणा सोडला, तर तलमपणांत आणि तजेलदारपणांत खऱ्या रेशमानेंहि खालीं मान घालावी. रानोमाळ भटकणाऱ्या तुमच्या काटक, बांधेसूत देहांत सौंदर्य भरपूर आहे. आतां ह्या रेशमी पैठण्या नेसून तुम्ही शहरांत जा आणि मग पहा कीं, राजवाड्यांतील राण्यांनाहि कबूल करावें लागेल कीं, " दूरीकृताः खलु उद्यानलता वनलताभिः ".

दुसऱ्या एका शास्त्रज्ञानें मौक्तिक विद्या संपादन करण्याचा चंग बांधला. स्वाति नक्षत्र लागेल, मग शिंपल्यांत चार थेंब पडतील, मग तळाशीं दडी मारून बसलेला शिंपला दैववशात् केव्हां तरी माझ्या हातीं येईल, अशी दैववादी विचारसरणी त्याला पटली नाहीं. त्यानें शिंपला उघडून पाहिला तों आंत एक

कीटक हजर. त्यानें मनाशीं ठरविलें कीं, रेशमाप्रमाणें मोत्याचेंहि रहस्य या कीटकापासूनच शिकलें पाहिजे. लवकरच युक्तिप्रयुक्तीनें त्या मुक्ताकीटकाच्या पोटांत शिरून त्यानें त्याचें रहस्य हेरलें कीं, आपला मौक्तिक हा या कीटकाची एक प्रकारची व्याधीच आहे. होतें असें कीं, एखादा वाळूचा कण शिंपल्यांत घुसून बोचूं लागला, म्हणजे तो बोचूं नये म्हणून त्याला गुळगुळीत बनविण्याकरितां आंतील कीटक त्याच्यावर आपल्या अंगांतल्या एका मऊ पदार्थाचें वेष्टण चढवीत असतो आणि तोच शेवटीं आमचा मोतीं बनतो! शास्त्रज्ञ म्हणाला, “मग आतां वाळूचा कण शिंपल्यांत दैवयोगानें केव्हां जाईल म्हणून वाट कशाला पाहत बसा! मीच प्रत्येक शिंपल्यांत वाळूचे कण चांगले वाटोळे असे पाहून, मुद्दाम घालतों आणि शिंपले तारेच्या पिंजऱ्यांत घालून पुन्हा हवे तेव्हां वर ओढतां येतील अशा रीतीनें समुद्रांत सोडून देतों म्हणजे झालें!” आणि शास्त्रज्ञाची ही युक्ति कल्पनेच्या बाहेर साध्यहि झाली. आतां मोत्याचें पीक हुकमी हवें तेवढें काढतां येऊं लागलें आहे. जे मोत्याचे दागिने श्रीमंतांनाच शक्य होते तेथें कल्चर मोत्याचे दागिने गरीबांच्या अंगावरहि मिरवूं लागतील असा संभव उत्पन्न झाला आहे. आणि हे मोतीं खोटेहि नव्हत. खऱ्या मोत्यांच्याच पद्धतीनें तयार झालेले. फक्त याला पदर कमी एवढेंच काय तें. पण केवळ देखणेपणाच लक्षांत घेतला तर खोटे आणि खरे यालाहि फारसा अर्थ नाहीं. अलंकाराची शोभा त्याच्या देखणेपणावर अवलंबून असते. या दृष्टीनें कल्चर मोत्यांच्या जोडीला कृत्रिम खड्यांचा उल्लेखहि करणें अयोग्य होणार नाहीं. साध्या काचेचेच हे खडे बनविलेले असतात. पण खड्याची चमक व तेजस्विता ही त्यांचे पैलू पाडण्यांत व त्यांतून प्रकाश परावृत्त करण्यावर अवलंबून असते. येवढें तत्त्व कळल्यावर शास्त्रज्ञानें आपल्या घटोत्कची पेठेंत असे कृत्रिम खडे खंडोगणती मांडले. हे खडे किंमतीला चार दोन पैशांचे, पण चमकदारपणांत जणों हजार दोन हजार रुपये मोलाचे. मग एखाद्या भिल्लिणीच्या पोरीलाहि आपलें रूपप्रसाधन कां करतां येऊं नये?

चैनीचा आणखी एक पदार्थ म्हणजे अत्तरें. हीं तयार करण्याची पद्धति पाहून तर घटोत्कचानेंहि तोंडांत बोट घालावें. शास्त्रज्ञानें सुगंधी अत्तरें कशापासून तयार केलीं आहेत? तर दुर्गंधी असा ज्याचा दुर्लौकिक आहे

अशा डांबरापासून! कर्दमांतून कमल निर्माण करणाऱ्या ब्रह्मदेवालाहि आतां गर्व वाटायला नको. कविवर्य बाणभट्टानें वर्णन केलें आहे कीं महर्षि जाबालीच्या आश्रमांत येतांच व्याघ्रसिंहादि हिंस्त्र पशु आपली स्वाभाविक क्रूरता विसरून जात. पण शास्त्रज्ञांच्या प्रयोगशाळेंत तर डांबरासारखे निर्जीव पदार्थहि आपली दुर्गंधी सोडून सुगंधी होऊन बाहेर पडूं लागले आहेत. दगडी कोळसा जाळला म्हणजे खालीं रापट तेलकट सांका उरतो तें डांबर. कोळसा जळत असतां धूर म्हणजे मी म्हणत असतों. जवळ असणाऱ्याला घुसमटून सोडणारा आणि घळघळा रडावयास लावणारा अवखळ असा जो धूर, त्यालाहि शास्त्रज्ञ आपल्या दावणींत गोवतो व त्यांतूनहि उंची रंग, अत्तरें, औषधें वगैरे काढून घेतों. डोळयांना झोंबणारा धूर आणि नाकाला झोंबणारें दुर्गंधी डांबर यांपासून सामान्य माणूस वैतागून जातो; पण शास्त्रज्ञाच्या प्रयोगशाळेंतून बाहेर पडली कीं, हींच द्रव्यें आपल्या मनमोहक रंगानें आणि सुगंधी परिमलानें डोळयांना आणि नाकाला मोहून टाकतात. लाकूड व कोळसा जाळून स्थाली पकवावयाची येवढेंच आजवर आपण करीत होतों आणि तीं जळत असतां धूर झाला म्हणजे चडफडावयाचें येवढेंच आपणांस माहीत होतें. पण आतां या वायां जाणाऱ्या धुरांतूनच शास्त्रज्ञानें औषधें, रंग, अत्तरें, असले उंची विलासी पण किंमतींत स्वस्त असे पदार्थ काढण्यास सुरुवात केली आहे.

## हसत हसत शस्त्रक्रिया

मानवी जीवन सुखी करण्यांत शास्त्रानें जी अमोलिक कामगिरी बजाविली आहे, तिचें हें पुराण असेंच सांगत बसलों तर वेळ पुरणार नाहीं. म्हणून शेवटीं आणखी एका बाबीचा उल्लेख करून पोथी गुंडाळतों. ती बाब म्हणजे रोगहरण. जीवन नीरस करून टाकणाऱ्या ज्या आपत्ति मानवाच्या पाठीमागें लागलेल्या आहेत त्यांत शारीरिक व्याधींचा क्रमांक फार वरचा आहे. व्याधिग्रस्त शरीर म्हणजे तिळतिळ तुटून येणारा मृत्यु. रौरव नरकांत काय हाल होत असतील ते यम जाणे; पण मृत्युलोकचा रौरव पाहावयाचा असल्यास व्याधिग्रस्तांनीं गजबजलेलें रुग्णालय पाहावें. आतां सर्वच रोगांना शास्त्रज्ञांना अद्याप जिंकतां आलेलें नाहीं. महतो महीयान् असा पर्वत फोडा म्हणाल तर शास्त्रज्ञ फोडील, अणोरणीयान् अशा परमाणूंचीं शकलें करा म्हणाल तरीहि तो

करून दाखवील. पण क्षयरोगासारख्या कांहीं रोगांचे जंतु असे चिवट आढळले आहेत, कीं त्यांचा नाश कसा करावयाचा हा शास्त्रज्ञांच्या पुढें बिकट प्रश्न आहे. तो सुटला नाहीं तरी इतर अनेक रोगांवर त्यांनीं विजय मिळविला आहे. विशेषतः शस्त्रक्रिया करण्याकरितां जी भूल द्यावी लागते तिचे अनेक प्रकार शोधून काढण्यांत जे त्यांना यश मिळालें आहे तें केवळ अद्‌भुत आहे. आजच्या शस्त्रक्रियेनें साध्य होणारे बरेच रोग पूर्वीच्या आयुर्वेदिक क्रियेनें औषधोपचारानें बरे केले जात असत. पण जेथें शस्त्रक्रिया करणें अपरिहार्यच ठरे तेथें तो अनुभव म्हणजे पूर्वी यमयातनाच असत. पण आतां तुमच्या दाढेंत ठणका मारतो आहे ना? मग जा दंतवैद्याकडे आणि लाफिंग गॅस घेऊन हसतहसत खुशाल दांत समूळ उपटून टाका. गळूं झालें आहे आणि कापणें अवश्य आहे? मग फिकीर मुळींच नको. डॉक्टर तुमच्या गळवावर एथिल स्प्रे सोडील तेव्हां तुम्हांला इतकें गारगार वाटेल, कीं डॉक्टर तुमचें गळूं सुरीनें कापीत नसून जणों चंद्रिकेच्या शलाकेनेंच कापीत आहे. तुम्हांला मधुमेह झाला आहे आणि पाय तोडून घेण्याचा प्रसंग ओढवला आहे? शस्त्रवैद्याकडे जा तो तुमच्या मणक्यांत एक औषध टोंचील, मग तुम्ही स्वतःचा पाय तोडीत असतां तें दृश्य खुशाल निर्विकार मनानें पाहूं शकाल. काय म्हणतां? रक्तस्राव पाहवणार नाहीं? त्याचीहि काळजी करूं नका. निःस्राव शस्त्रक्रियाहि साध्य होण्याच्या मार्गांत आहे.

प्रसूतिप्रसंग हा स्त्रियांच्या आयुष्यांतील एक मोठा जिवावरचा प्रसंग असतो. नवीन अर्भकाच्या स्वागताविषयीं एकीकडे वात्सल्यपूर्ण उत्सुकता तर त्याच वेळीं दुसरीकडे प्रसूतिवेदनांच्या यातना. यांतून तोड पूर्वी निघाली नव्हती. शस्त्रक्रियेच्या प्रसंगीं दिल्या जाणाऱ्या भुलीचा शोध लावून पुष्कळ वर्षें झालीं तरी, प्रसूतीच्या वेदना शमन करणारी भूल गवसली नव्हती. पण आतां या बाबतींत इतकें बिनधोक व सर्वांना वापरतां येईल इतकें स्वस्त औषध शास्त्रज्ञांनीं शोधून काढलें आहे कीं, वंध्येला आतां 'नहि वंध्या विजानाति गुर्वी प्रसववेदनाम्' असा टोमणा ऐकून घेण्याचा प्रसंग येणार नाहीं.

## वाल्याचा वाल्मीकि

आणि खुद्द वंध्यत्वहि नष्ट करण्याकरितां शरीरांतील अन्तःस्रावी ग्रंथींवर प्रयोग करून पाहण्याचा शास्त्रज्ञांचा सपाटा सुरू आहेच. या ग्रंथींची किमया

कळूं लागल्यापासून तर शास्त्रज्ञांना जणों जीवितरहस्य गवसलें अशीं स्वप्नें पडूं लागलीं आहेत. तो म्हणतो माणूस म्हणजे माझ्या हातीं असलेला ओल्या मातीचा गोळा आहे असें समजा. या गोळ्याला कोणता आकार देऊं तें बोला. उंचाला खुजा करूं, कीं खुजाला उंच करूं? लठ्ठाला फाटका करूं, कीं फाटक्याला लठ्ठ करूं. रडतराउतला रंगेल बनवूं, कीं वाल्याला वाल्मीकि करूं? शेवटचें वाक्य उच्चारीत असतांना तो तुमच्याकडे मिस्किलपणें हसत पाहील. कारण वाल्याचा वाल्मीकि करण्याची किमया अद्याप तरी शास्त्रज्ञांच्या स्वप्न-सृष्टींतच आहे. पण शास्त्रज्ञांचें पुराण ऐकत बसलांत तर शास्त्र काय काय करूं शकेल याचें मोठें रसभरित वर्णन तो तुम्हांला ऐकवील.

पण तें ऐकत असतां तुमच्यापैकीं एखादा हळूच म्हणेल, "पुढें काय काय साध्य होईल तें होवो, पण आजच शास्त्रानें मानवाला मिळवून दिलेलें ऐश्वर्यहि डोळे दिपवून टाकण्यासारखें आहे हें मी प्रांजलपणें कबूल करतों. पण आतां एकच विचारूं का? येवढ्या ऐश्वर्यानें नटून तरी मानव अधिक सुखी झाला आहे काय? सुखसोयींचे शोध जसे आपण लावलेत तसेंच, महाराज! विषारी धुरासारख्या संहारी अस्त्रांचे शोधहि आपल्याच मेंदूतून निघाले ना?" शास्त्रज्ञ उत्तर करील "होय! तो टोमणा तुम्ही मला मारणार हें मला माहीत होतें. पण येवढें ऐश्वर्य प्राप्त करून दिलें असतांहि तुम्हांला सुख खुपत असेल तर तुमच्या करंटेपणाला दोष लावा! कुबेराला हेवा वाटावा अशी संपत्ति मीं तुम्हांला प्राप्त करून दिली, पण तिची सर्व समाजांत खैरात करण्याऐवजी तिला सत्ताधीशांच्या संदुकेंत आणि मारवाड्याच्या मंजूषेंत तुम्हीं कोंडून गाडून टाकलीत तर मी काय करणार? तीच गोष्ट संहारी अस्त्रांची. सत्ताधीशांत सैतानी वृत्ति संचारत आहे म्हणूनच तुम्ही असली आसुरी सेवा माझ्याकडून करून घेता. माझ्या बुद्धीचा सदुपयोग तुम्हांस करून घेतां येत नाहीं तर त्याला मी काय करूं? मुलीचें लग्न करून देतांना गजान्त लक्ष्मीचें स्थळ पाहून देणें हें बापाचें काम. पण सासरीं मुलगी नांदूं शकली नाहीं तर तो बिचारा काय करणार! पण मी आपणाकडून तुमचा संसार सुखाचा करण्यासाठीं मनःपूर्वक झटलों आहे येवढें समाधान मला पुरें आहे."

---

— २ —

# समाज-शास्त्रांतील जुना-नवा दृष्टिकोन



आधुनिक पाश्चात्य समाजशास्त्रज्ञांची प्रमेयें व मतें यांचा वरवर आधार घेऊन, हिंदूंची रूढ समाजव्यवस्था सर्वतोपरी शास्त्रशुद्ध असून गेलीं पन्नास-पाऊणशें वर्षे आपल्या पुढाऱ्यांनीं सुरू केलेल्या सामाजिक, राजकीय, आर्थिक, शैक्षणिक वगैरे सर्व चळवळी धादान्त अशास्त्रीय होत असें निसुखपणें निपटून सांगणारा एखादा ग्रंथ तुम्हांस पाहावयास हवा असेल, तर 'हिंदूंचें समाजरचनाशास्त्र' हा ग्रंथ उघडून पहा.

· आपल्या प्राचीन ऋषिप्रणीत समाजव्यवस्थेचें पाश्चात्य समाजशास्त्राच्या आधारें केलेलें या ग्रंथांतील समर्थन वाचून सनातनवादी समाजाचा पूर्वजां-बद्दलचा अभिमान दसपट वाढेल यांत शंका नाहीं. आणि हें समर्थन खरो-खरच शास्त्रीय असतें तर सुधारकांचाहि पूर्वजांबद्दलचा अभिमान बळावला असता. कारण सुधारक जेव्हां जुनी रूढि बदलूं इच्छितात तेव्हांहि प्राचीनांबद्दल त्यांना अनादर असतो असें मुळींच नव्हे. प्राचीनांनींहि कालमानाप्रमाणें रूढि बदलली व त्यांचेंच धोरण पुढें चालवून, प्राप्तकालानुरूप योग्य फेरफार करणें हें आपलेंहि कर्तव्य होय असें ते मानतात इतकेंच काय तें. यामुळें आजच्या शास्त्रीय ज्ञानाच्या कसोटीनें आपली आजवर रूढ असलेली समाजव्यवस्था हीच उत्कृष्ट ठरली, तर आपण पुरस्कारलेल्या चळवळी चुकीच्या होत्या म्हणून क्षणभर वाईट वाटलें तरी, कोणाहि प्रामाणिक सुधारकाला आपल्या पूर्वजांची समाज-व्यवस्था शास्त्राच्या कसोटीला उतरली हें पाहून त्यांच्या बुद्धिमत्तेबद्दल योग्य अभिमान वाटल्यावांचून राहणार नाहीं. पण तशी भावना उत्पन्न होण्यापूर्वी हिंदूंच्या समाजरचनेंतील प्रत्येक प्रमेय शास्त्रशुद्ध आहे असें सिद्ध करण्याचा जो प्रयत्न ग्रंथांत केला आहे तो कितपत सिद्धीस गेला आहे याची छाननी केली पाहिजे.

ही छाननी करण्यापूर्वी प्रथम एका बाबीबद्दल नव सनातनींचें अभिनंदन केलें पाहिजे. ती बाब म्हटली म्हणजे सामाजिक प्रश्नांच्या विवेचनाला प्रयोगसिद्ध भौतिक शास्त्रांतील प्रमेयें व पद्धति लावून दाखविण्याचा प्रयत्न, ही होय.

भारतीयांची समाजरचना ही सर्वस्वीं निर्दोष असून अपरिवर्तनीय अशी आहे असें म्हणणारा सनातनी पक्ष, आणि ती परिपूर्ण नसून तिच्यांत फेरफार करणें जरूर आहे असें प्रतिपादन करणारा सुधारक पक्ष या दोन पक्षांत जे वाद-विवाद आजवर चालत ते एका बाजूस शब्दप्रामाण्य व दुसऱ्या बाजूस भावनाप्रामाण्य या आयुधांनीं लढले जात. आगरकराच्या काळीं हा प्रकार होता. या आयुधांऐवजीं नवीन वर्धमान व प्रयोगसिद्ध अशा भौतिक शास्त्राचें– विशेषतः प्राणिशास्त्राचें– जें नवीन आयुध नव सनातनी उपयोगांत आणूं लागला आहे त्याबद्दल त्याचे कोणीहि अभिनंदनच करील.

शब्दप्रामाण्याचा पूर्वीचा सर्वंकष अधिकार दिवसेंदिवस लोपत चालला आहे आणि तीच गत भावनाप्रामाण्याची भावना कितीहि उच्च व पवित्र असली तरी जर ती प्रयोगसिद्ध अशा निष्ठुर सत्याशीं विरोधी जाईल तर ती जगाच्या व्यवहारांत वेंधळी ठरेल. भावनेच्या दृष्टीनेंच पाहिलें तर महारोगा-सारख्या सांसर्गिक रोगानें पीडलेल्या रोग्यालाहि आप्तेष्टांतून दूर करणें हें निष्ठुर ठरेल. पण सर्व समाजाचें आरोग्य बिघडेल हें प्रयोगसिद्ध असल्यास, असल्या निःस्वार्थ पण अव्यवहार्य भावनेला बाजूस सारावेंच लागेल. आजच्या प्रयोगसिद्ध भौतिकशास्त्राचा दर्जा व दरारा इतका वाढलेला आहे कीं, त्याच्या सिद्धांतांशीं फटकून वागणाऱ्या भावनेचा टिकाव लागणार नाहीं, आणि या सिद्धांतांशीं जुने शब्दप्रामाण्यनिष्ठ सिद्धांत जर मिळत नसतील तर त्यांच्यावरील श्रद्धाहि डळमळूं लागेल. अर्थात् सनातनी आणि सुधारक या दोघांनाहि आपापलीं मतें शास्त्रपूत आहेत असें पटवून द्यावयाचें असेल तर आपलीं मतें आधुनिक प्रयोगनिष्ठ शास्त्राशीं अविरोधी आहेत असें दाखवून द्यावयास हवें. सनातनी आणि सुधारक यांमधील लढ्याचा शेवट लागावयाचा असला तर तो यापुढें या प्रयोगसिद्ध शास्त्राच्या रणांगणांवरच लागेल. शब्दप्रामाण्याच्या आणि भावनोत्कटतेच्या मैदानावर नव्हे– निदान यापुढें या दोन पक्षांतील झटापटी होतील त्यांचें मुख्य रणक्षेत्र भौतिक सिद्ध शास्त्रें हेंच राहील.

म्हणून समाजरचनेचा वाद शब्दप्रामाण्य व भावनाप्रामाण्य यांच्या कचाट्यां-तून सुटून प्रयोगसिद्ध शास्त्राच्या प्रशस्त मैदानावर तो आतां लढला जाऊं लागला आहे ही अभिनंदनीय गोष्ट होय.

## तत्त्वज्ञानांतील उलथापालथी

भौतिक शास्त्रांची उपासना जी आज केली जात आहे ती सर्व पाश्चात्यां-मध्यें. यामुळें आपल्या रूढ समाज-रचनेचें समर्थन करण्यासाठीं जी साक्ष काढावयाची ती भौतिक शास्त्रांतील सिद्धांताची सल्लामसलत घेणारे जे पाश्चात्य समाजशास्त्रज्ञ, त्यांचीच काढावी लागते. पण या बाबतींत एक गोष्ट मुद्दाम सांगितली पाहिजे, कीं खुद्द त्यांच्या मतांमध्यें गेल्या पन्नास-पाऊणशें वर्षांत पुष्कळच फेरफार पडला आहे. त्यांतील मुख्य फरक म्हणजे व्यक्ति-स्वातंत्र्याचा जयजयकार जो पूर्वी केला जात असे, तो आतां लोपत चालला असून समाजाची रचना करणें ती शिस्तीच्या तत्त्वावर केली पाहिजे असें मत प्रबल होत चाललें आहे हा होय.

गेल्या शतकांतील औद्योगिक क्रांतीच्या प्रभात-युगांत खुल्या व्यापाराचें तत्त्व हें मूर्धाभिषिक्त तत्त्व म्हणून स्वीकारलें गेलें होतें. हें तत्त्व अर्थशास्त्रीय व्यवहारांत जसें प्रमाण मानलें जाई तसेंच इतर सामाजिक व्यवहारांतहि मानलें जावें असें त्या काळचे तत्ववेत्ते प्रतिपादन करीत. देशादेशांतील किंवा व्यक्तीव्यक्तींतील व्यापारी देवघेव ही खुली असावी, सरकारनें कोणास विशेष सवलतीहि देऊं नयेत व कोणावर निर्बंधहि घालूं नयेत, व्यक्तींना व राष्ट्रांना एकमेकांशीं खुली स्पर्धा करूं द्यावी म्हणजे ज्याच्या त्याच्या मगदुराप्रमाणें ज्याची त्याची कमाई होईल व व्यापाराची एकंदर घडी निसर्गनियमाप्रमाणेंच बसेल असें हें खुल्या व्यापाराचें तत्त्वज्ञान होतें. हेंच तत्त्वज्ञान समाज-व्यवस्थेला लावून असें प्रतिपादन करण्यांत येई कीं, सामाजिक आचार व व्यवहार यांसंबंधींहि समाजघटक अशा ज्या व्यक्ति त्यांवर कोणतेंच नियंत्रण घालूं नये. ज्याला त्याला आपल्या प्रकृतिधर्मानुरूप वागूं द्यावें म्हणजे निसर्गतःच समाज सुस्थितींत राहील.

डार्विननें विकासवादाचा सिद्धांत मांडल्यावर तोहि आपणास पोषक आहे अशी या तत्त्ववेत्त्यांची समजूत झाली. निसर्गाची प्रवृत्तिच विकासाकडे

आहे हें यांतील गृहीत तत्त्व. या तत्त्वानुसार सामाजिक विकास हाहि निसर्गानुरूप होत असून व्यक्तीवर कृत्रिम निर्बंध घालणें म्हणजे समाजाच्या या निसर्गसिद्ध विकासास प्रतिबंध करणें होय असें मानलें जाई. सुप्रसिद्ध विकासवादी समाजशास्त्रज्ञ स्पेन्सर यानें तर या तत्त्वाची अगदीं कडच पोंचविली. त्याला कोणत्याच प्रकारचे निर्बंध मान्य नव्हते. असें सांगतात कीं जहाजांवरील अपघात टाळण्याकरितां सर्व जहाजांवर लाइफ बेल्ट्स ठेवलेच पाहिजेत असा निर्बंध घालणारा एक ठराव एकदा पार्लमेंटांत आला त्या वेळीं स्पेन्सरनें काय प्रतिपादन केलें असेल असें तुम्हांस वाटतें ? त्यानें चक्क प्रतिपादन केलें कीं, अशा प्रकारचा कोणताहि निर्बंध घालणें हें समाजाच्या नैसर्गिक प्रवृत्तीच्या विरुद्ध होय ! निर्बंध न घातल्यामुळें कांहीं लोकांचे जीव धोक्यांत पडले तरी चालतील, पण निसर्गाच्या प्रक्रियेस अडथळा करणें पाप होय ही त्याची समजूत !

## स्वातंत्र्य गेलें : शिस्त आली

अनिर्बंध खुल्या व्यवहाराचें तत्त्व आज जसें व्यापारांत तसेंच समाजव्यवस्थेंतहि अमान्य ठरलें आहे. राष्ट्राराष्ट्रांतील व व्यक्तीव्यक्तींतील व्यापारव्यवहार खुला, अनिर्बंध ठेवल्यानें व्यापाराची घडी आपोआपच नीट बसेल व ‘ मागणी तसा पुरवठा ’ या प्रक्रियेनें समाजाच्या गरजा व्यवस्थितपणें पुरविल्या जातील अशी जी समजूत होती तिच्या अगदीं उलट अनुभव लवकरच येऊं लागला. व्यापार खुला राहण्याचें तर बाजूसच राहिलें, उलट सर्व जगाची व्यापारपेठ काबीज असे नवकोट नारायण मात्र निर्माण होऊं लागले. त्यांनीं लोखंड, रॉकेल वगैरेसारख्या कांहीं वस्तूंची तर सर्व जगांतील पैदास खरेदी केली आणि मग प्रतिस्पर्धीच कोणी न उरल्यानें वाटेल त्या किंमतीस ते माल विकूं लागले. बरें, राष्ट्राची गोष्ट पाहावी तर त्यांनीं खुला व्यापार हें चक्क खूळ ठरवून व्यापारी पेठा काबीज करण्याकरितां एकमेकांवर तरवारीच उपसल्या ! अर्थात् ज्याला त्याला अनिर्बंध वागूं दिल्यानें आपोआप सुस्थिति निर्माण होईल या तत्त्वज्ञानाचा बोजवारा दिसून येण्यास वेळ लागला नाहीं.

## लोकशाहीला मुरड

व्यापाराप्रमाणें राजकीय व सामाजिक क्षेत्रांतहि व्यक्तिस्वातंत्र्याबाबत तोच अनुभव आला. लोकशाहीमध्यें बहुमतानें कोणत्याहि गोष्टीचा निर्णय

करण्याची पद्धति स्वीकारलेली असते. तिच्या बुडाशीं प्रत्येक मतदारास ज्या विषयावर मत द्यावयाचें तो विषय समजूं शकतो हें गृहीत धरलेलें असतें. पण लोकशाहीचा अनुभव घेतल्यावर त्या गृहीत कृत्याचा कोतेपणा समजून येण्यास उशीर लागत नाहीं. समजा, उद्यां सर्व हिंदुस्थानभर एकच पंचांग सुरू करावें असा कायदा कोणी असेंब्लीमध्यें आणला व जुनें पंचांग सुरू करावें, कीं नवें सुरू करावें असा प्रश्न सभासदांच्या पुढें आला. तर त्या वेळीं पंचांगासंबंधीं पूर्ण अनभिज्ञ अशा सभासदांच्या बहुमतानें त्याचा निर्णय देणें योग्य होईल काय ? केव्हांहि होणार नाहीं. अशा प्रकारच्या प्रश्नाबाबत अफाट निर्बुद्ध जनतेचें मत विचारांत न घेतां तज्ज्ञ अशा शेलक्या विद्वानांचेंच मत स्वीकारलें जाईल. अशा प्रश्नांच्या बाबतींत एक तज्ज्ञ एका बाजूला आणि एक लाख निर्बुद्ध दुसऱ्या बाजूला असले तरी तज्ज्ञाचाच शेवटीं विजय होईल, नुसत्या बहुतमताचा होणार नाहीं. अर्थात् प्रत्येकाला मतस्वातंत्र्य असावें व प्रत्येक गोष्ट बहुमतानें ठरवावी ही विचारसरणी लोकशाहीमध्येंहि सर्वस्वीं टिकणारी नाहीं.

## समाजरचनेचें केंद्र कोणतें ?

हाच अनुभव समाजकारणांतहि आला. समाजव्यवस्थेंतील एक महत्त्वाचें कलम म्हणजे प्रजोत्पादनार्थ केलेला विवाह हें होय—याहि बाबतींत व्यक्तीचा अनिर्बंध हक्क मानावयाचा म्हणजे 'यस्य मनो यत्र संलग्नं' या न्यायानें ज्याची जिच्यावर प्रीति बसेल त्यानें तिच्याशीं विवाह करावा अशा प्रकारची पूर्ण स्वतंत्रता व्यक्तीस देण्यांत यावी अशी विचारसरणी पूर्वीं जारी होती. विवाह ही दोन जीवांमधली खाजगी बाब असून समाजानें त्यांत कोणत्याही सबबीवर ढवळाढवळ करूं नये असा सूर पूर्वीं असे. पण याहि समजुतीला अनुवंशशास्त्राच्या अध्ययनानें धक्का दिला. विज्ञानाच्या वाढीबरोबर असें आढळून येऊं लागलें, कीं कांहीं रोग आनुवंशिक असतात; तेव्हां समाजशास्त्रज्ञांपुढें असा प्रश्न येऊन पडला कीं, व्यक्तीचा विवाहस्वातंत्र्याचा हक्क मान्य करून समाजांत रोगी संततीची भर पडलेली उघड्या डोळयांनीं मान्य करावी, कीं समाजाच्या कल्याणाकरितां व्यक्तीचा हक्क नाकारून रोगी माणसांना संतति-उत्पादन करण्याची मना करावी ? हा प्रश्न आतां नुसता वादविवादाच्या

क्षेत्रांतच राहिलेला नसून जर्मनीने व अमेरिकेंतील कांहीं संस्थानांनीं याबाबत कायदेहि पास केले असून दुष्ट व अनुवंशसंचारी अशा रोगी माणसांना संतति-उत्पादनास अक्षम करण्याची सक्तीहि सुरू केली आहे.

तर काय झालें कीं, समता, स्वातंत्र्य, हक्क वगैरे जीं महत्त्वाचीं सर्वंकष तत्त्वें म्हणून पूर्वी मानलीं गेलीं होतीं त्या तत्त्वांच्या मर्यादा जसजसा विचारवंतांच्या लक्षांत येऊं लागल्या तसतसें समाज-रचनेचें केंद्र व्यक्तीपासून समाजाकडे व स्वातंत्र्याकडून शिस्तीकडे झुकूं लागलें आहे.

आपल्या रूढ समाजव्यवस्थेंतहि स्वातंत्र्यापेक्षां शिस्तीवर भर अधिक आहे. येवढाच मुद्दा घेतला तर रूढ समाजव्यवस्थेस पाश्चात्य शास्त्रज्ञांचा दुजोरा मिळतो असें सहज दाखवितां येईल. इतकेंच काय पण पाश्चात्यांनीं गायिलेलीं स्तुतिस्तोत्रेंहि दाखवून देतां येतील. हिंदूंचें समाजरचनाशास्त्र जेव्हां युरोपियन पंडितांच्या प्रथम नजरेस पडलें, तेव्हां त्यांतील एकजात आंखीव कडक शिस्त पाहून त्यांच्यापैकीं कांहींना मोहिनी पडली असल्यास नवल नाहीं. नीत्शेनें गायिलेले स्मृतीचे गोडवे प्रसिद्ध आहेत. शाकुंतल वाचून गटेचें जसें देहभान हरपलें, उपनिषदें वाचून शोपेनहॉरची जशी ब्रह्मानंदीं टाळी लागली, तसाच मनुस्मृति वाचून नीत्शे आनंदानें बेहोष झाला. नीत्शेच्या आनंदाचें मर्म मात्र आपण नीट ओळखलें पाहिजे; तें म्हणजे नीत्शेला मनुप्रणीत समाजरचनेंतील तत्त्वें मान्य होतीं हें नव्हे, (एकच उदाहरण द्यावयाचें तर नीत्शेला मनूच्या स्वप्नींहि नसलेला trial marriage किंवा प्रयोगवजा अल्पकालिक विवाह मान्य होता) तर समाजरचनेचें जें कांहीं तत्त्व म्हणून मान्य केलें असेल त्या तत्त्वाचीं मनूनें केलेली कडक अंमलबजावणी हें होय.

समाजाचे गट किंवा जाती मानणें व त्या त्या गटानें रूढ नियुक्तच धंदा केला पाहिजे असा निर्बंध घालणें हें समाजरचनेंतील एक महत्त्वाचें प्रमेय होय. या प्रमेयाची अंमलबजावणी हिंदूंप्रमाणें अनेक समाजांत रूढ होती. जातिसदृश असे बेटीबंद गट हे हिंदुस्थानांतच आहेत असें नव्हे तर ते पूर्वी सर्व युरोपभरहि होते. आपल्याकडे जसे पूगश्रेणी वगैरे कारागिरांचे संघ असत, तसेच युरोपमध्यें निरनिराळ्या कारागिरांचे गिल्ड्स किंवा संघ असत. या संघांमध्यें त्या त्या धंद्यांतील विद्या संघाच्या बाहेरील व्यक्तीस दिली जाऊं नये व संघांतील व्यक्तीस दुसरा धंदाहि करूं देऊं नये असे निर्बंध असत, पण जातिनियंत्रणाची

आणि व्यवसायनियंत्रणाची अंमलबजावणी हिंदूंनीं जशी कडक केली तशी मात्र अन्यत्र झाली नाहीं. नीत्शेचे उद्‌गार या कडक शिस्तीस अनुलक्षूनच आहेत. अर्थात् समाजाची रचना करतांना व्यक्तीचे हक्क व स्वातंत्र्य यांना फाजील महत्त्व न देतां समाजाचें हित हें मुख्य ध्येय धरणें व त्याच्या सिद्ध्यर्थ व्यक्तीचे हक्क आडवे आल्यास त्यांची कदर न बाळगणें अशा प्रकारचें जें सूत्र हिंदूंच्या समाजरचनेंत दिसून येतें, त्या सूत्राच्या समर्थनपर वचनें आजच्या पाश्चात्य समाजशास्त्रांत आज हवीं तेवढीं आढळतील. नव सनातनी समर्थनाची एवढी ही एकच बाजू रंगवील तर समता, स्वातंत्र्य वगैरेबद्दल आजच्या सुशिक्षित समाजांत ज्या कांहीं अवास्तव कल्पना रूढ झालेल्या आहेत त्यांचें वैयर्थ्य निदर्शनास आणण्याचें श्रेय त्यास संपादतां येईल.

पण समाजाची रचना ही व्यक्तीचा हक्क किंवा सुख यांच्यापेक्षां एकंदर समाजाचें कल्याण कशांत आहे यावर नजर ठेवून केली पाहिजे हें जें हिंदुसमाजरचनेचें मुख्य सूत्र त्या सूत्राचेंच समर्थन करून न थांबतां समाजाची रचना करतांना या मुख्य सूत्राच्या जोडीला जीं अनेक प्रमेयें हिंदु शास्त्रकारांनीं स्वीकारलीं आहेत तीं सर्वच पाश्चात्य शास्त्रज्ञांच्या मतानें समर्थनीय आहेत असें जेव्हां तो प्रतिपादन करूं लागतो तेव्हां वादाला सुरुवात होते.

## पायाभूत प्रमेयें

हिंदुसमाजरचनेंतील एक अत्यंत महत्वाचें प्रमेय म्हणजे जातीजातींमधील व कुलाकुलांमधील जन्मजात श्रेष्ठपणा हें होय. जातिसंस्थेंतील कष्टकारक आणि सुखकारक अशा धंद्यांची जी विभागणी केली गेली आहे ती ह्या जन्मजात श्रेष्ठपणावर उभारलेली आहे. नुसत्या व्यक्तिच घेतल्या तर कांहीं व्यक्ति सुदृढ तर कांहीं दुर्बल, कांही सुरूप तर कांहीं कुरूप, कांहीं तल्लख बुद्धीच्या तर कांहीं मंद बुद्धीच्या असा फरक सर्वत्र आढळून येतो. किंबहुना सारख्या तोंडवळ्याच्या दोन व्यक्ति जगांत आढळत नाहींत तशींच समान गुणांनीं युक्त अशीं माणसेंहि अगदीं थोडीं. समतावादीदेखील सर्व माणसें सारख्या मगदुराचीं असतात असें मानीत नाहींत. समतावाद्यांची मागणी एवढीच असते कीं, सर्वांना समान संधि द्या— अमुक एका कुलांत

किंवा जातींत जन्मास आला, एवढ्यानेंच कोणालाहि श्रेष्ठ किंवा कनिष्ठ ठरवूं नका. यावर नव सनातनीचें म्हणणें असें आहे कीं कुलांचें आणि जातींचें श्रेष्ठत्व हें आजच्या समाजशास्त्रज्ञांनीं शास्त्रीय पद्धतीनें सिद्धच केलें आहे. या बाबतींत खरी स्थिति काय आहे हें पाहणें मोठें उद्बोधक होईल.

## दोन पद्धति

अनुवंशप्रक्रियेचा व जननशास्त्राचा जो अभ्यास गेल्या पन्नास-पाऊणशें वर्षांत ( विशेषतः चाळीस वर्षांत ) पाश्चात्य विद्वानांनीं केला आहे तो दोन निरनिराळ्या पद्धतींनीं केला आहे. या दोन पद्धति भिन्न असल्यानें त्यांच्या-मध्यें दोन भिन्न पंथ उत्पन्न झाले आहेत. त्या दोन पंथांचें स्वरूप लक्षांत घेणें प्रस्तुत वादाच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचें आहे. गाल्टन आणि मेंडेल हे या दोन पद्धतींचे द्रष्टे होत. मेंडेलनें वाटाण्याच्या रोपट्यांच्या अनेक पिढ्यांची निपज करून जे प्रयोग केले होते ते प्रयोग व त्यांवरून बांधलेले नियम १९०० सालच्या आधीं पुष्कळ वर्षें छापून प्रसिद्ध झालेले होते तरी १९०० पर्यंत त्यांकडे कोणी विशेष लक्ष दिलें नव्हतें. त्यानंतर मात्र त्याच्या प्रयोगांकडे अचानक लक्ष वेधलें गेलें व जसजसा त्या नियमांना प्रयोगाचा प्रत्यंतर-पुरावा मिळूं लागला, तसतसा 'वंशशास्त्राचा द्रष्टा' म्हणून मेंडेलचा सर्वत्र जयजयकार होऊं लागला. आज वंशशास्त्रांत जर कांहीं सिद्धांत म्हणून उल्लेख करण्यासारखे नियम अनेक प्रयोगांनीं सिद्ध झाले असतील तर मेंडेलनें बसविलेले नियमच होत.

पण मेंडेलच्या नियमांकडे शास्त्रज्ञांचें लक्ष वेधलें जाण्यापूर्वीं दुसऱ्या एका पद्धतीनें वंशशास्त्राचा अभ्यास सुरू झाला होता; त्याचा अध्वर्यु गाल्टन हा होता. यानें अनुवंशाचा जो अभ्यास केला तो आंकड्यांच्या जोरावर. एखादा गुण वा दोष अनुवंशपरंपरेनें अनेक पिढ्यांत दृग्गोचर होतो कीं नाहीं हें पाहावयाचें असल्यास, एखादें इतिहासप्रसिद्ध घराणें घेऊन त्याच्या पिढ्यानु-पिढ्या त्या गुणदोषांच्या दृष्टीनें तपासणें ही गाल्टनची पद्धत.

या पद्धतींत जितक्या जास्त पिढ्या तपासावयास मिळतील तितकी त्यावरून काढल्या जाणाऱ्या अनुमानाची बळकटी अधिक. अभ्यासावयास गुण व दोष घ्यावयाचा. तोहि नजरेंत भरेल असा ठसठशीत व निःसंदिग्ध असा. खुद्द गाल्टननें जो गुण पसंत केला तोहि अत्यंत ठळक असा 'प्रतिभा' हा गुण होय.

ह्या गुणाच्या दृष्टीनें गाल्टननें प्रतिभावान् म्हणून गाजलेल्या अनेक थोर पुरुषांच्या वंशावलि मिळवून अनेक पिढ्या तपासल्या आणि शेवटीं सिद्धांत पुकारला कीं प्रतिभा हा गुण आनुवंशिक आहे. म्हणजे तो एखाद्या कुटुंबांत पिढ्यानुपिढ्या सतत आढळून येतो. साधारणपणें आई-बापासारखीं मुलें होतात हें रोजच्या पाहण्यांतलेंच आहे, पण गाल्टन यानें असें प्रतिपादन केलें कीं, मुलांत फक्त आईबापांचेच गुण उतरत नसून आजे, पणजे, खापरपणजे, निपणजे वगैरे आठ पिढ्यांपर्यंतचे गुण उतरत असतात. हीं अनुमानें अनेक पिढ्यांतील व्यक्तींच्या संख्येवरून काढलेलीं असल्यामुळें आंकडेवार गणित करून कोणत्या पिढींतून किती प्रमाणांत गुण उतरतात, हें अगदीं गणिती सूक्ष्मपद्धतीनें कोष्टकवार सांगण्याचा मोह पडणें स्वाभाविक होतें. त्याप्रमाणें गाल्टननें अगदीं ग्रहगाणिती सूक्ष्मतेची ऐट आणून सिद्धान्त म्हणून मांडला कीं, अपत्यांत पूर्वजांपासून गुण उतरतात ते पहिल्या पिढीपासून अर्धे, त्याच्या मागल्या पिढीपासून एकचतुर्थांश, त्याच्या मागल्यापासून अष्टमांश अशा श्रेणीच्या पद्धतीनेंच उतरतात !

## गणिताचें गौडबंगाल

गाल्टनच्या या सिद्धांताकडे शास्त्रज्ञांचें लक्ष तेव्हांच वेधलें गेलें आणि लक्ष वेधण्यासारखीच त्याची मांडणी होतीहि. कारण कोणताहि सिद्धांत गणिती पद्धतीनें आंकडेवार व कोष्टकवार मांडून दाखवितां आला तरच त्याला सिद्धान्त हें नांव मिरवितां येतें. गुरुत्वाकर्षणाचा सुप्रसिद्ध सिद्धांतच घ्याना. झाडावरून फळ सुटलें असतां नेमकें पृथ्वीवर खालींच पडतें एवढ्या क्षुल्लक निरीक्षणावरून पृथ्वीच्या अंगीं आकर्षक शक्ति कल्पिणें, आणि नंतर तीच आकर्षक शक्ति विश्वांतील यच्चयावत् पदार्थांत असून सूर्यमंडळांतील पृथ्वीचन्द्रादि ग्रहोपग्रह याच आकर्षक शक्तीच्या हुकुमांत ठराविक कक्षेंत फिरत असावे अशी कल्पना मांडणें याला उज्ज्वल प्रतिभा लागतेच. पण नुसती एवढीच कल्पना मांडली गेली असती तर ती फक्त प्रतिभेचा विलास म्हणूनच समजली गेली असती. तिला सिद्धांताचें स्वरूप एवढ्यानेंच येतें ना! पण न्यूटननें जेव्हां या आकर्षक शक्तीचें प्रत्यक्ष मोजमाप घेतलें व आकर्षक शक्ति ही पदार्थांचें घनत्व व त्यांतील अंतर या दोन प्रत्यक्ष मोजण्यासारख्या घटकांवर अवलंबून असते व तीहि एका ठराविक प्रमाणांत असते असा गणिती नियम बसविला तेव्हांच

गुरुत्वाकर्षणाला सिद्धांताचें स्वरूप प्राप्त झालें. अर्थात् कोणताहि नियम आंकड्यांनीं सजवून गणिती कोष्टकाच्या रूपानें मांडला म्हणजे त्याला ठसठशीत रूप प्राप्त होत असतें. गाल्टनच्या सिद्धांताकडे या कारणास्तवच शास्त्रज्ञांचें लक्ष तेव्हांच वेधलें गेलें.

त्याच्या उत्साही गणिती शिष्यांनीं तर गुरुजीवर ताण करून आंकडेशास्त्राचे अगदीं आचळ न् आचळ पिळून काढून आपल्या अनुवंशसिद्धांताला अगदीं शास्त्रीय सूक्ष्म स्वरूप देण्याचा देखावा उत्पन्न केला. गाल्टनच्या पंथाचा एक प्रमुख अध्वर्यु कार्ल पियरसन, यानें तर या गणिती सूक्ष्मतेची कडच पोंचविली आहे. पूर्वजांपासून मिळणाऱ्या आनुवंशिक जिंदगीचें गाल्टननें दिलेलें कोष्टक म्हणजे अर्धा हिस्सा वगैरे हें ठोकळ होतें; पण पियरसन म्हणतो $\frac{१}{२}$, $\frac{१}{४}$, $\frac{१}{८}$ हें अगदीं स्थूल झालें. आनुवंशिक मिळकतीचा नियम बांधावयाचा तर त्याची श्रेणी $\frac{·२}{२}+\frac{·३}{४}+\frac{·२}{१६}$ अशी बांधली पाहिजे! ही सूक्ष्मता पाहून अनुवंशपद्धतीची गुरुकिल्लीच आपणास अवगत झाली असा कोणाचाहि समज न होईल तरच आश्चर्य! गुरुत्वाकर्षणाच्या व ग्रहांच्या गतीनें गणित जसजसें अधिक सूक्ष्म होत गेलें तसतसें ग्रहणें अगदीं मिनिटा-सेकंदांपर्यंत अचूक वर्तवितां येऊं लागलीं, तसेंच या पियर्सनच्या सूक्ष्म गणितानें अमुक माता-पित्यापासून अमुक पिढीला अमुक अमुक गुण अमक्या प्रमाणांत संक्रान्त झालेले आढळून येतील हें अचूक सांगतां यावें असा समज झाल्यास नवल नाहीं! पण हा सर्व भ्रम ठरला!

या प्रकारच्या आंकड्यांच्या मोडीवर विसंबून आंकड्यांच्या जंगलांनीं भरलेलीं विद्यारण्यें या पंथांतील अभ्यासकांनीं अनेक निर्माण केलीं आहेत. त्यांत त्यांनीं सद्गुणी किंवा प्रतिभावान् कुटुंबाप्रमाणें दुर्गुणी, गुन्हेगार म्हणून असलेलीं अशीं प्रसिद्ध घराणीं तपासलीं आणि हीं गुन्हेगार घराणीं तपासून त्यांनीं असें मत दिलें कीं, गुन्हेगारी हीहि आनुवंशिक असते, म्हणजे ती एखाद्या कुटुंबांत पिढ्यानुपिढ्या दिसून येते. अर्थात् अशा कुटुंबापासून बाकीच्या समाजाचें रक्षण करावयाचें असल्यास त्यांना बहिष्कृतच केलें पाहिजे, म्हणजेच त्यांना 'अस्पृश्य' लेखलें पाहिजे!

नवा सनातनी हिंदु समाजरचनेंतील श्रेष्ठकनिष्ठपणा व अस्पृश्यता यांचें समर्थन करण्यास ज्या ग्रंथकारांची साक्ष काढतो ते ग्रंथकार या संख्यापद्धति-

पंथाचे होत. पण या समाजशास्त्रज्ञांनीं वापरलेली पद्धतिच सदोष ठरली तर त्यांची अनुमानेंहि असिद्धच ठरतील हे निराळें सांगावयास नकोच आणि हीच गोष्ट दुसरा पंथ जो प्रयोगपद्धति पंथ त्या पंथाच्या लक्षांत येऊन चुकली आहे.

शास्त्रीय पद्धतींतील शेवटचा हुकमी पत्ता म्हणजे प्रत्यक्ष प्रयोग. मेंडेलचा वाटण्यावरील सुप्रसिद्ध प्रयोग उजेडांत आल्यावर त्या तऱ्हेनें शास्त्रज्ञांनीं अनेक प्रयोग केले. या प्रयोगांवरून अनुवंशप्रक्रियेचे जे नियम दिसून आले त्यांवरून पूर्वीच्या संख्यापद्धतीनें काढलेले नियम असिद्ध होत याविषयीं संशयच राहिलेला नाहीं. एकच उदाहरण द्यावयाचें तर आजा, पणजा वगैरे पूर्वजांपासून अपत्यांत कोणताहि गुण किती प्रमाणांत उतरतो याविषयीं जे कोष्टकपद्धतीचे नियम गाल्टन, पियरसन वगैरेंनीं बसविले होते त्या नियमांचा आणि प्रयोगसिद्ध नियमांचा कांहींच मेळ नाहीं, असें दिसून आलें आहे. कोणताहि गुण बापापासून अर्धा, आज्यापासून चौथा हिस्सा, पणजापासून सोळावा हिस्सा प्राप्त होतो हें जे कोष्टक गाल्टननें तयार केलें होतें तें आज कोणीहि शास्त्रज्ञ मान्य करीत नाहीं. कारण प्रत्यक्ष प्रयोगावरून जे नियम अवगत झाले आहेत ते यापेक्षां अगदींच निराळे. या नियमांमुळें माता-पितरांतील सर्वच गुण अपत्यांत प्रकट होतात हेंच मुळांत खोटें ठरलें आहे !

## सबल-दुर्बल गुण

मेंडेलच्या प्रयोगांत गाल्टनप्रभृति आकडेशास्त्रज्ञांना अज्ञात असें नवीन तत्त्व प्रथमच प्रत्ययास आलें कीं, गुण हे सबल आणि दुर्बल असे दोन प्रकारचे असून, मातापितरांमधून अपत्यांत उतरणाऱ्या गुणामध्यें सबलदुर्बल गुणांची झुंज झाली असतां दुर्बल गुण सुप्तस्थितींत राहून सबल गुणच अपत्यांमध्यें प्रादुर्भूत होतात. मेंडेलच्या नियमांचा प्रपंच करण्याचें हें स्थल नव्हे; तेव्हां एवढेंच सांगितलें म्हणजे पुरे कीं, अनुवंशप्रक्रियेचा अभ्यास करण्याची ही प्रयोगनिष्ठ पद्धति अमलांत आल्यावर पूर्वींची आंकडेवारीची पद्धति मागें पडली. मात्र ती मागे पडण्याचें कारण संख्याशास्त्रच खोटें आहे हें नव्हे; तर संख्याशास्त्राचा उपयोग मर्यादित क्षेत्रातच होतो हें होय. एकाच कारणापासून

एकच फल निष्पन्न होत असेल तर तें किती प्रमाणांत होईल हें ठरवितांना आंकडेशास्त्राचा उपयोग जास्तींत जास्त होऊं शकेल. पण एकाच फलाचीं जेव्हां अनेक कारणें असतील तेव्हां जितकीं कारणें जास्त तितकें संख्या-पद्धतीनें काढलेलें अनुमान दुर्बल होत जाईल. आणि जेव्हां ज्या फलाविषयीं नियम बांधावयाचा त्याचें स्वरूपहि निश्चित नसून सांकेतिक असेल तेव्हां तर संख्यापद्धति न स्वीकारलेलीच बरी. कुलाचा श्रेष्ठकनिष्ठपणा हा आनु-वंशिक असतो कीं नाहीं हें संख्यापद्धतीनें ठरवूं लागलें म्हणजे वरील सर्व भानगडी उत्पन्न होतात.

## जखमेवर मीठ

आंकडेशास्त्रज्ञांनीं जी पद्धत अंगीकारली ती अशी होती, कीं श्रेष्ठपणाची आनुवंशिकता अजमावण्याकरितां अनेक श्रेष्ठ श्रीमान् घराणीं घ्यावयाचीं व त्यांत लौकिकवान् व्यक्ति किती निपजल्या ह्यांची शेंकडेवारी काढावयाची. नंतर त्याच पद्धतीनें दारिद्र्यांत व सामाजिक दुरवस्थेंत कायमच्या गाडून टाकलेल्या कनिष्ठ समजल्या जाणाऱ्या वर्गांतील अनेक कुटुंबें तपासा-वयाचीं व त्यांच्यांत कोणी लौकिकवान् होऊन गेले असल्यास त्यांची शेंकडे-वारी मांडावयाची. व मग मोठ्या विद्वत्तेचा आव आणून सिद्धांत मांडावयाचा कीं लौकिकवानांचें प्रमाण कनिष्ठ वर्गांच्या तारतम्यानें श्रेष्ठ वर्गांत ज्या अर्थी फारच मोठें आहे त्या अर्थी श्रेष्ठ वर्णांचें श्रेष्ठत्व हें जन्मजातच होय. या विचार-सरणींतील भ्रामकपणा अगदीं वरवर पाहणाऱ्याच्याहि लक्षांत येईल! श्रेष्ठ-कनिष्ठ-पणा हा कांहीं प्रमाणांत जन्मसिद्ध असतो हें सिद्ध झालें तरी त्याच्या विकासास व प्रगटीकरणास वाव मिळाल्याशिवाय तो मोजावयाचा कसा? शतकानुशतकें एखाद्या सामाजिक वर्गाला दारिद्र्य आणि दास्य यांनीं जखडून टाकावयाचें, "शक्तोपि हि शूद्रेण न कार्यो धनसंचयः" अशा प्रकारानें त्याला धन मिळवावयाचे मार्ग बंद करून टाकावयाचे. "न शूद्राय मतिं दद्यात्" या दंडकानें त्याला विद्येपासून अलिप्त ठेवावयाचें, अमेरिकेंत निग्रोच्या बाबतींत व आपल्याकडे अस्पृश्यांच्या बाबतींत इतर वर्णांशीं फारसा संपर्कहि ठेवूं द्यावयाचा नाहीं, मग त्यांच्यांतील आंकडेवारी घेऊन तुझ्या कुशींत आमच्या सारखे लौकिकवान् कोठें निपजले तें दाखीव नाहीं तर तुझी कूसच निकृष्ट

असें कबूल कर असें हिणवावयाचें यापरता आंकडेशास्त्राचा अधिक मान-हानिकारक उपमर्द कोणता असणार ?

## आंकडेशास्त्राच्या दुरुपयोगाचें उदाहरण

वरील पद्धतीनें वाटेल तें सिद्ध करतां येईल. उदाहणार्थ, एखाद्यानें हिंदुस्थानांतील गेल्या शंभर वर्षांत होऊन गेलेले लष्करी अधिकारी किती झाले याची मोजदाद केली, नंतर त्यांत युरोपियन शेंकडा ९९ व हिंदी शेंकडा एक असें आंकड्यानें दाखविलें आणि त्यावरून शेवटीं असा सिद्धांत मांडला कीं, शें-दीडशें वर्षांतले आंकडे तपासून पाहिले असतांहि हिंदु लष्करी अधिकाऱ्यांचें प्रमाण ज्या अर्थी शेंकडा एक एवढेंच पडतें त्या अर्थीं हिंदूंचा वंशच लष्करी बाण्याच्या दृष्टीनें कनिठ होय. तर ह्या सिद्धांतास आपण जी किंमत देऊं तीच किंमत आंकडेवारीनें कुळांचें श्रेष्ठ-कनिष्ठत्व सिद्ध करूं पाहणाऱ्या गाल्टन पियरसन वगैरेंच्या सिद्धांतास दिली पाहिजे. दुसऱ्यावर राज्य करावयास सोकावलेले जेते या पद्धतीचा अवलंब करीत असतात हें स्वाभाविक आहे. कांहीं वर्षांपूर्वी सेनापतींनीं कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें या लष्करी प्रश्नासंबंधीं उद्गार काढले कीं, हिंदु सैनिकांनीं गेल्या महायुद्धांत चांगली कामगिरी बजावली हें खरें, पण ती सर्व युरोपियन ऑफिसरांच्या देखरेखीखालीं! खासा टोमणा आहे कीं नाहीं? हिंदूना ऑफिसर कधींही नेमावयाचें नाहीं व हिंदु कर्तबगारी करूं शकतात ती युरोपियनांच्या हाताखालींच, स्वतंत्रपणें नव्हे असें उलट तेवढें टाफरावयाचें. गाल्टनपंथीय आंकडेशास्त्रज्ञांच्या सिद्धान्ताचा प्रकार थेट वरच्या-सारखाच आहे. पण गाल्टनपंथीयांचे सिद्धांत हे वरिष्ठ वर्गांना उपकारक वाटल्यानें त्या सिद्धान्ताचा प्रथम पुष्कळ उदो उदो झाला, पण गाल्टन-पंथाच्या पद्धतींतील भ्रामकपणा फार दिवस टिकूं शकला नाहीं. मेंडेलपंथाच्या म्हणजे प्रयोगनिष्ठपंथाच्या उदयानंतर सगळें गाडें फिरलें. आज अनुवंश-शास्त्राच्या अभ्यासकांत प्रमाणभूत म्हणून जी पद्धति मानली जाते ती मेंडेलची पद्धतिच होय.

## बेट्सनचा अभिप्राय

आतां सनातनी म्हणेल कीं, दुसरी पद्धति जी आंकडेशास्त्रीय पद्धति तिचीं उत्तरें. हीं अनुवंशाच्या नियमावलीच्या बाबतींत मेंडेलच्या पद्धती-

सारखींच येतात. तर या बाबतींत शास्त्रज्ञ काय म्हणतात तें पहा. मेंडेलपद्धतीचा प्रमुख आचार्य जो बेट्सन तो आंकडेपद्धतींविषयीं काय म्हणतो तें पाहण्यासारखें आहे. त्याचे शब्द अगदीं रोखठोक आहेत. तो लिहितो कीं, आंकडेशास्त्रीय पद्धतींत असें गृहीत धरलेलें आहे कीं अपत्याच्या गुणांच्या जोडीला माता-पित्यापैकी कोणाहि एकाचे गुण कळले तरी त्यावरून गणितीपद्धतीनें अनुवंशाचा नियम बसवितां येईल. ही पद्धति मूळ ज्या कल्पनांवर बसविली होती त्या कल्पना प्रथम मेंडेलच्या नियमांच्या अज्ञानामुळें गृहीत धरल्या गेल्या. आणि पुढें जेव्हां मेंडेलपद्धतीचा पुरावा उपलब्ध झाला तेव्हां त्याकडे या पंथांतील लोकांनीं जाणूनबुजून डोळेझांक केली. आनुवंशिक प्रक्रियेमध्यें गुणाची भेसळ न होतां त्याचें स्वतंत्र वांटप होत असतें हा मेंडेलचा नियम जर अवगत असता तर कोणत्या पिढींतून किती गुण वंशजास मिळतात एतद्विषयक गाल्टनचा सिद्धान्त माडलाच गेला नसता. कोणत्याहि अपत्यामध्यें कोणत्याहि पूर्वजाचा गुण उतरूं शकतो हा जो आंकडेशास्त्रीय पद्धतीचा मूळ पाया तोच चुकला आहे असें एकदां ठरल्यावर त्या पद्धतीचें शास्त्रीयत्वच नष्ट झालें हें सांगावयास नकोच.

According to Biometrical system if the characters of one parent and of the offspring are known the material can, after mathematical treatment by means of correlation tables, be used to deduce a law of inheritance. The theoretical conceptions upon which this method is based, were formed and elaborated first in ignorance and subsequetly in disregard of Mendelian facts. ...Had segregation been known to Mr. Galton the law of ancestral heredity would not have been promulgated......when the conception that any individul can transmit the characteristics of any ancestor was shown to be untrue, the structure which the biometrician have offered to the world as a scientific study of heredity ceased to have meaning or value.

---

‡ Mendel's Principles of Heardity by Bateson.

बेट्सनची वरील उक्ति इतकी स्पष्ट आहे कीं तिचें विवरण करण्याचें कारणच नाहीं. अर्थात् या पद्धतीवरून निष्पन्न झालेला जो कुलांचा व जातींचा जन्मजात श्रेष्ठ-कनिष्ठपणा तो काल्पनिक मानणेंच रास्त होय.

सर्व व्यक्ति जन्मतः तुल्यगुण आहेत असें समतावादीहि मानीत नाहीं हें वर सांगितलेंच. पण मूळ उपजत गुणांना वाव मिळणें किंवा उपजत दुर्गुणाची पीछेहाट होणें हें शिक्षण, संस्कार आणि आर्थिक व सामाजिक परिस्थिति यांनीं ठरतें. या बाबतींत पशुकोटि आणि मानवकोटि यांत अत्यंत दांडगा फरक आहे. पशुकोटीमध्यें संस्कार आणि संपत्ति सर्वांचीच सारखी असल्यामुळें कनिष्ठपणा ठरावयाचा तो आनुवंशिक पिंडावरूनच ठरतो. मानवाचें तसें नाहीं. मानवानें पिंडगत अनुवंशाच्या जोडीला सांस्कृतिक अनुवंश निर्माण केला आहे. आणि या सांस्कृतिक अनुवंशाच्या बळावरच मानवानें निसर्गावर अजस्र विजय मिळविलेला आहे. म्हणूनच शिक्षण देणाऱ्या शिक्षकाला दुसरा पिता म्हणूनच संबोधिलें जातें.

अर्थात् यावरून अस्पृश्यतेचें किंवा जातीजातींमधील जन्मजात श्रेष्ठपणाचें समर्थन करण्यास आजच्या अनुवंश शास्त्राची संमति नाहीं हें दिसून येईल.

हिंदूंच्या समाजशास्त्रांतील दुसरें प्रमेय म्हणजे अनुवंशप्रक्रियेमध्यें पुरुषवर्गाचें श्रेष्ठत्व हें होय. याहि बाबतींत ग्रंथकारानें अशी बाजू मांडली आहे कीं पुरुषाचें श्रेष्ठत्व जें आजवर मानलें गेलें आहे, हें अनुवंशशास्त्राला धरून आहे. माता-पितरांपासून अपत्यांत जें गुणसंक्रमण होतें त्यांत स्त्रीपेक्षां पुरुषाचेच गुण अधिक उतरतात. अपत्य हें प्राधान्यानें पित्याच्या वळणावर जातें अशाविषयीं स्मृतिकारांचें ठाम मत असल्याचें दिसतें व तें शास्त्रीय आहे असा सनातन्यांचा अभिप्राय आहे मनूचें वचन या बाबतींत अगदीं स्पष्ट आहे. 'जातो नार्याम् अनार्यायाम् आर्यादार्यो भवेद् गुणैः ॥ जातोऽप्य नार्यादार्यायां अनार्य इति निश्चयः ॥' तसेंच, 'यादृशं भजते हि स्त्री सुतं सूते तथाविधं ।' वगैरे वचनेंहि याच समजुतीचीं पोषक होत. हलक्या कुलाला श्रेष्ठपद प्राप्त व्हावयाचें असल्यास त्या कुलांतील मुलगी श्रेष्ठ कुलांत, तिची मुलगी पुन्हा श्रेष्ठ कुलांत अशा रीतीनें प्रक्रिया चालू ठेवली तर सात पिढ्यांत स्त्रीगुण लोपून जातील. अशी जी प्रक्रिया स्मृतिकारानीं मांडली आहे तिच्यांत स्त्रीगुणापेक्षां पुरुषगुण प्रभावी हीच समजूत दिसून येते. याच

समजुतीवर अनुलोमविवाहापेक्षां प्रतिलोम विवाह हा दूषणीय ठरविला गेला आहे. घटस्फोट आणि पुनर्विवाह हे निषिद्ध ठरविण्यांतहि सनातन्यांच्या मता-प्रमाणें 'पुरुषपिंडांचा स्त्रीपिंडांवर अत्यंत जबरदस्त परिणाम होतो' हीच गोष्ट कारणीभूत धरलेली असावी.

## जनन-क्रियेचें व्याकरण

या बाबतींत प्रयोगनिष्ठ शास्त्राची बाजू अगदीं थोडक्यांत मांडावयाची तर ती अशी आहे कीं, माणसाच्या शरीरांतील प्रत्येक पेशींत ४८ रंगपरमाणु समाविष्ट असतात. फक्त बीजपेशीमध्यें मात्र त्यांची संख्या निम्मी म्हणजे २४ होते. स्त्रीबीज आणि पुरुषबीज यांचा संयोग झाला म्हणजे अपत्या मध्यें त्यांची संख्या पुन्हा ४८ होते. हे रंगपरमाणु हीच आनुवंशिक जिंदगी आणि ती माता व पिता या दोहोंकडून तुल्य प्रमाणांत मिळते. म्हणजे प्रत्येक गुणविशेषावर हुकमत चालविणारे दोन परमाणु अपत्यास मिळतात. एक मातेकडून व दुसरा पित्याकडून. उदाहरणार्थ, डोळ्याच्या रंगावर एका विशिष्ट रंगपरमाणूची हुकमत चालते. असे परमाणु अपत्यास मातेकडून एक व पित्याकडून एक असे दोन मिळतात, म्हणजे एकाचे डोळे घारे व दुसऱ्याचे काळे असले तर अपत्याचे डोळे कोणाच्या वळणावर जावयाचे ते पित्याचे डोळे कोणत्या रंगाचे आहेत यावरून ठरत नसून घारे आणि काळे या दोन रंगांत प्रभावी कोणता, दुर्बल कोणता, यावरून ठरतें. अर्थात् पुरुषच नेहमीं प्रभावी ही कल्पना असिद्ध आहे. मेंडेलच्या पद्धतीनुसार कोणता गुण मूलतःच प्रभावी व कोणता मूलतः दुर्बल हें अनेक प्रयोगांनीं निश्चित झालेलें आहे. मग तो गुण मातेमध्यें असो कीं, पित्यामध्यें असो. यावरून अनुलोमापेक्षां प्रतिलोम कनिष्ठ मानण्यास अनुवंशशास्त्राचा आधार नसून त्यांचीं कारणें इतर कांहीं असलीं पाहिजेत हें लक्षांत येईल.

## वर्णांतरानें निर्वंश ?

अनुवंशप्रक्रियेमध्यें स्त्री आणि पुरुष हे घटक तुल्यबल होत हें लक्षांत घेतलें म्हणजे वर्णान्तरानें निर्वंश होतो या मताच्या पुष्ट्यर्थ जीं उदाहरणें दिलीं जातात त्यांचेंहि वैयर्थ्य दिसून येईल. जोशी यानीं हॅवलॉक

एलिसचें मत दिलें आहे कीं, "एखाद्या कारू घराण्यांतील एखादा महत्त्वाकांक्षी पुरुष कर्तृत्वाच्या जोरावर जेव्हां पांढरपेशा वर्गांत विवाह करून कुटुंब स्थापतो, तेव्हां असलें घराणें साधारणतः तीन पिढ्या भरभराटलेलें दिसतें. पण पुढें तें निपुत्रिक होतें म्हणजे निर्वंश होतें. कन्यासंततीला मात्र धक्का लागत नाहीं." आतां कन्यासंततीला धक्का लागत नाहीं हें जर खरें असेल, तर वंशनाश झाला या म्हणण्याला प्राणिशास्त्रदृष्ट्या अर्थच उरत नाहीं. कारण कन्येच्या द्वारा अनुवंश पुढे चालूच राहतो आणि कन्येच्या द्वारा चालू राहिलेली परंपरा आणि पुत्राच्या द्वारें चालू राहिलेली परंपरा यांत अनुवंशशास्त्रदृष्ट्या महत्त्वाचा फरक नाहीं. कन्या ही दुसऱ्या कुलांत दिली जाते व ती त्या दुसऱ्या कुलाचें नांव चालविते म्हणून कुलाची परंपरा नष्ट होते हा लौकिकरूढीचा विचार झाला. अनुवंशशास्त्रदृष्ट्या त्यांत तथ्य नाहीं. जेथें स्त्रीप्रधान वारसापद्धति आहे तेथें तर कन्येकडूनच कुलपरंपरा चालू राहते.

दुसरा आधार गाल्टनचा! लॉर्डांच्या सभेवर हुकमत चालवितां येण्याकरतां नवे सरदार निर्माण करण्याची पद्धति इंग्लंडमध्यें मधून मधून अवलंबिली जाते. गाल्टननें त्यांपैकीं ३१ घराण्यांचा अभ्यास केला. हे नवे निर्माण केलेले सरदार जुन्या अस्सल घराण्यांतील मुलींशीं होतां होईतों विवाह करीत. अर्थात् या प्रकारांत वर्णांतरहि झालें आणि असवर्ण विवाहहि झाला आणि या प्रकाराचा शेवट काय झाला, तर गाल्टन लिहितो कीं, 'गाणितागत अभ्यास केला असतां असें दिसून येतें कीं, अशा तऱ्हेच्या विवाहाचा परिणाम म्हणजे मुख्यतः घराण्यांत नापिकता उत्पन्न होणें असाच होतो.' गणितागत पद्धतीच्या शास्त्रशुद्धतेविषयीं मागें विवेचन केलेंच आहे. पण दुसरी एक गोष्ट गाल्टन सांगतो ती लक्षांत घेतली पाहिजे. ती ही कीं, या नव्या सरदारांपैकीं बहुतेकांनीं जे विवाह केले ते निपुत्रिक लक्षाधिशांच्या एकुलत्या एका कन्येशीं ! मग या विवाहप्रकारांत नापिकता उत्पन्न झाली ती असवर्ण विवाहामुळे झाली, कीं निपुत्रिक एकुलत्या एक कन्येशीं विवाह केल्यामुळें झाली ? पण अशा तऱ्हेची शास्त्रीय फोड न करतां गाल्टनचें मत मात्र उद्धृत केलें जातें कीं असवर्ण विवाह हे निर्वंशाला व नाशाला कारण झाले आहेत.

संकरापासून निर्माण होणारी प्रजा ही भयंकर उग्र स्वरूपाची होते अशीहि

समजूत आहे. क्षत्रियापासून शूद्र कन्येच्या ठिकाणीं जी संकरजाति उत्पन्न होते, तिला स्मृतिकारांनीं उग्र असें नांवहि दिलें आहे. आणि पाश्चात्यांनींहि या संकरप्रजेचे गुण उग्र स्वरूपाचेच लिहिले आहेत. मनु व पाश्चात्यांचे विचार व निरीक्षण किती जुळतें आहे हें दाखविण्याकरितां जोशी यांनीं संकरप्रजेचे धंदे म्हणून दिले आहेत ते पुढीलप्रमाणें — प्रो. बुगल म्हणतो, 'ब्राझिल देशांतील सर्व चित्रकार आणि बजवय्ये हे संकरप्रजा आहेत. त्याच देशातील सर्वच वैद्य हेहि संकरप्रजाच आहेत. वेनेझुएला देशांत संकरप्रजा ही वक्ते आणि कवि म्हणून प्रसिद्धि पावलेली आहे.' असें जर आहे तर संकरप्रजा ही दुष्ट म्हणून तिच्या नांवानें खडे कां फोडावयाचे? आतां कवि, चित्रकार, वैद्य वगैरेंचे धंदे हे दुष्ट धंदे म्हणावयाचे असल्यास ग्रंथच आटोपला!

## संकर म्हणजे संकट नव्हे

असवर्ण विवाह हा भिन्न आहारविहार, भिन्न सामाजिक व आर्थिक दर्जा, भिन्न विचारपरंपरा इत्यादिकांच्या योगानें सुखावह होईल, कीं नाहीं हें आपणांस येथें पाहावयाचें नाहीं. तसेंच असवर्ण विवाहावरचा निषेध दूर केला म्हणजे असवर्ण विवाह सरांस जारी होईल असेंहि नाहीं. सर्वः सगंधेषु विश्वसिति' या न्यायानें जो तो शक्य तोंवर समानशील असाच संसाराचा भागीदार निवडील. पण असवर्ण विवाह निर्वंश करणारा असा समाजघातक प्रघात होय ही जी समजूत आहे तिला वंशशास्त्राचा आधार नाहीं, एवढेंच तूर्त लक्षांत घ्यावयाचें आहे.

असवर्ण विवाहाचा प्रश्न निघाला कीं घोडा, गाढव आणि खेचर ही त्रयी डोळयांपुढें दत्त म्हणून उभी राहते. आणि घोडा व गाढव या भिन्न जातींच्या भिश्र विवाहापासून झालेली संतति जी खेचर ती जशी नापीक निघते, तशीच जातीजातीमधील मिश्रविवाह हाहि नापीक ठरत असावा अशी समजूत करून देणें यापेक्षां अधिक सुलभ तें काय? फक्त मानवी समाजांतर्गत कृत्रिम मानवी जाती ह्या प्राणिशास्त्रीय परिभाषेंतील जाती म्हणजे Species होत अशी थोडी धूळफेक केली म्हणजे झालें. आणि ती 'हिंदूं'चें समाजशास्त्र या पुस्तकाच्या कर्त्यानें केलीही आहे. तो लिहितो कीं,

" मनु म्हणतो जातिधर्म शाश्वत आहेत. आतां धर्म म्हणजे त्या त्या जातीमध्यें दिसून येणारे नैसर्गिक गुण. आणि जाति म्हणजे मनुष्याला जन्मानें प्राप्त होते ती म्हणजे इंग्रजीमध्यें Species." अर्थात् ग्रंथकाराच्या मतें हिंदु समाजांतील निरनिराळ्या जाती ह्या निरनिराळ्या Species होत. यावर टीका काय करावी ? येवढेंच सांगितलें म्हणजे पुरें कीं, प्राणिशास्त्रज्ञ हे सर्व मानवजात ही एकच Species मानतात.*

संकर टाळल्यानें व कुल शुद्ध राखल्यानें त्या त्या कुलांतील गुणविशेष स्थिर व शाश्वत स्वरूपाचे होतात, म्हणून संकर निषिद्ध हाय. तसेंच पोटजातींतलिहि विवाह अनेक शतकें बंद असल्यानें त्यांच्यांतीलहि गुणविशेष शुद्ध होत चालले असल्याने त्यांत पुन्हा संकर करणें अनिष्ट होय अशी जी विचारसरणी आहे तीहि निरपवाद नाहीं. कारण कुल-शुद्धि राखल्यानें गुणविशेष जसे स्थिर होत जातात तसेच त्याच न्यायानें दोषविशेष स्थिर होत जातात हें मानणें प्राप्तच नाहीं का ? यामुळें गुणशुद्धीकरितां कांहीं पिढ्या संकर टाळणें जर इष्ट मानले तर दोषनाशाकरितां त्यानंतर संकरास प्रोत्साहन देणें इष्ट मानावें लागेल. अर्थात् संकर म्हणजे संकट हा सिद्धान्त नव्हे.

* " केसरींत हा लेख प्रसिद्ध झाल्यावर श्री. जोशी यांनीं उत्तरादाखल लिहिलें कीं, " सर्व समाजशास्त्रज्ञ मानव genus आणि त्याच्या varieties मानतात. याबाबत अगदीं पहिल्या प्रतीच्या लेखकांचीं सरासरी शंभर मतें आम्ही केळकरांना समर्पण करूं." पुढच्या अंकांत मीं जें प्रत्युत्तर दिलें होतें तेंहि या ठिकाणीं देतों. मी लिहिलें होतें कीं, ' वरील मजकुरांतील हातचलाखी वाचकांच्या नजरेस आणणें जरूर आहे. जोशी यांनीं मूळ ग्रंथांत पान १०६ वर जातींना species हा शब्द वापरला आहे. तो अशास्त्रीय आहे असें मीं म्हटलें होतें. त्यावर उत्तर देतांना species हा पारिभाषिक शब्द टाळून त्याऐवजीं ते आतां varieties हा शब्द वापरीत आहेत आहेत. जोशी यांनीं शंभर ग्रंथकारांची ग्वाही दिली आहे. पण इतकी तसदी घेण्याचें कारण नाहीं. शभराऐवजीं चार-पांच ग्रंथकारांनीं कां होईना, पण समाजांतर्गत जातींना species हा शब्द वापरला आहे असें जोशी यांनीं दाखवून दिल्यास मी माझी चूक दुरुस्त करीन." जोशी यांनीं असें दाखवून दिल्याचें माझ्या वाचनांत नाहीं.

सनातन्यांचें आणखी एक प्रमेय म्हणजे 'वर्णसंकरानें राष्ट्रेंचीं राष्ट्रें उध्वस्त झालीं आहेत हें होय. राष्ट्रें उध्वस्त कशीं होतात याविषयीं निरनिराळ्या उपपत्ति मांडल्या गेल्या आहेत. या बाबतींत सिद्धांत मांडण्याइतकी ज्ञानाची प्रगति झालेली आहे असें मला वाटत नाहीं. पण निरनिराळ्या ग्रंथकारांचीं मतेंच पाहावयाचीं तर संकर न केल्यामुळेंच राष्ट्र पंगु होतें असें जें एकान मत दिलें आहे तेंहि वाचकांनीं ध्यानीं घ्यावें. हा ग्रंथकार दुसरा कोणी नसून इजिप्शियन संस्कृतीचा अभ्यासक सर फ्लिंडर्स पेट्री हा होय. यानें इजिप्तच्या संस्कृतीचे उत्कर्ष आणि अपकर्ष यांचा अभ्यास केला आहे. त्यांत अपकर्षानंतर पुन्हा उत्कर्ष होणाऱ्या स्थितींचें वर्णन करतांना तो लिहितो कीं, पंगु झालेल्या राष्ट्रांत नवीन जोम खेळूं लागावयाचा तर त्यांत नव्या रक्ताचें मिश्रणच झालें पाहिजे.--Every civilisation of a settled people tends to incessant decay, and this decay continues until it is too weak to initiate anything when a fresh race comes in and utilises the old stock to graft on both in blood and culture. As soon as the mixture is well started it produces a new wave of civilisations.

परदेशगमननिषेध आणि शूद्राला विद्यादानाचा निषेध हे सनातनी समाज-शास्त्रांतील आणखी दोन सिद्धांत होत.

## परदेशगमनाचा निषेध

द्विजातींनीं स्वतःचा देश सोडून अन्य ठिकाणीं जाऊं नये याविषयीं मनूचें असें वचन आहे कीं, आर्यावर्त नांवाचा जो प्रदेश तोच द्विजांना राहण्यास योग्य. कृष्ण काळवीट जेथें स्वभावतः संचार करतो तो यज्ञीय देश असून त्याच्या पलीकडील देश म्लेंच्छ देश होय. द्विजांनीं सर्व प्रयत्नेंकरून या देशाचाच आश्रय करावा. या मनूच्या वचनाच्या मध्यें परदेशीं कां जाऊं नये याविषयीं आपला देश हा यज्ञीय देश असून परदेश म्लेंच्छ देश होय, एवढेंच दाखविलें आहे व तें सहज समजण्यासारखेंहि आहे. अन्य देशीं मनुष्याला आपला आचार शुद्ध राखतां येत नाहीं यामुळें यज्ञसंस्थेचा अभिमानी असा जो वैदिक वर्ग त्यानें परदेशीं जाऊं नये एवढाच मनूच्या सांगण्याचा उद्देश

असावा. पण जोशी यांना पाश्चात्य समाजशास्त्रांत एक अशीच उपपत्ति आढळली आणि ती, आणि तीच, मनूस अभिप्रेत असली पाहिजे असें त्यांनीं ठासून प्रतिपादन केलें आहे. ती म्हणजे जे वंश ज्या देशांत प्रथम उत्पन्न झाले असतील ते त्याच देशांत जगूं शकतात हें होय. हें प्रमेय लिहून झाल्यावर पुढचें वाक्य जें लिहिलें आहे तें पाहण्यासारखें आहे. ग्रंथकार लिहितो कीं, 'या विषयासंबंधीं फारसा अभ्यास झालेला नाहीं. जो झाला आहे त्यावरून असें अनुमान निश्चित निघतें आणि हें आज पुढें येत असलेलें मत धर्म-शास्त्रकार मनूला नक्की माहीत होतें' ( पृ. ९५ ) म्हणजे माहिती अपुरी पण अनुमान मात्र निश्चित आणि तें मनूला माहीत होतें याविषयीं तर ग्रंथकाराला संशयच नाहीं !

उपलब्ध झालेल्या माहितीचा जो सारांश दिला आहे, त्यांत तो लिहितो कीं, " बाल्टिक समुद्राभोंवतीं उत्पन्न होणारा जो नॉर्डिक वंश त्याचा वंशाभिमानानें उत्तर अमेरिकेमध्यें नाश होत चालला आहे. इंग्लंड-मध्यें देखील समुद्रकिनारीं त्याची चलती दिसत असली तरी इतर सर्व ठिकाणीं उद्योगधंद्यांतून त्याची हकालपट्टी होत आहे. तसेंच डच लोकांची जावामध्यें भरभराट होत नाहीं. क्वीन्सलंडमध्यें इंग्रजांपेक्षां इटालियन जास्त टिकाव धरतात. इंग्रज वंशाचा माणूस अमेरिकेमध्यें नाश पावत चालला आहे व आफ्रिकेंतून जे असंख्य चिनी युरोपमध्यें नेले होते त्यांचा वंशज आज औषधालाहि सापडत नाहीं वगैरे " येवढाच काय तो पुरावा.

हा पुरावा किती डळमळीत आहे हें सांगावयास नकोच. या पुराव्यावरून येवढेंच झालें तर सिद्ध होतें कीं, निरनिराळ्या मानववंशांना सर्वच ठिकाणचें हवापाणी मानवेल असें नाहीं. यांत नवीन असें कांहींच नाहीं. पण येवढाच मुद्दा सांगावयाचा असेल तर देशांतर केलें असतां वंशनाश होतो असला घाबरट सिद्धान्त प्रतिपादण्याचें अवडंबर कशाला ? नॉर्डिक वंशाची इंग्लंडमध्यें व्यापारांत चलती नसेल, समुद्रकिनारीं आहेच; पण इतरत्र नाहीं याचें कारण केवळ तो वंश बाहेरून आला येवढेंच असूं शकेल काय ? हिंदुस्थानपुरतें पाहिलें तर गुजराथी व्यापाऱ्याचा जम हिंदुस्थानांत कोठेंहि बसतो आणि महाराष्ट्रीयांचा बसत नाहीं, उलट मुलूखगिरी करीत महाराष्ट्रीय कोठेंहि गेले तरी फत्ते होतात, पण इतर होत नाहींत. या प्रकाराचा उलगडा वंश व

देशान्तर यांची सांगड घातल्यानें होतो काय? निग्रोचा मूळ देश आफ्रिका त्यांतून ते युरोपांत गेले असतां नष्ट झाले, पण अमेरिकेंत ते नष्ट झालेले नाहींत. अर्थात् वरील पुराव्यावरून 'देशान्तराच्या पोटीं वंशनाश'अशासारखा व्यापक सिद्धान्त मुळींच निष्पन्न होत नाहीं. तो निष्पन्न होत नसतां तर्कशास्त्राची रजा घेऊन आधीं तो काढावयाचा आणि मग तो मनूच्या गळयांत बांधावयाचा हें निवळ धाष्टर्य होय. असला असिद्ध सिद्धांत मनूनें कोठेंहि प्रतिपादन केलेला नाहीं. तो त्याच्या गळयांत बांधणें म्हणजे शुद्ध अन्याय होय.

या बाबतींत मनूचे टीकाकार काय सांगतात तें पाहूं. कुल्लुक भटानें मनूच्या श्लोकांचा फारसा विस्तार केला नाहीं. पण मनूचा सर्वांत ज्येष्ठ व श्रेष्ठ टीकाकर जो मेधातिथि त्याचें मनूच्या श्लोकावरील भाष्य वाचण्याजोगें आहे आणि तें श्री. जोशी यांना सर्वस्वीं विरुद्ध आहे. मनूच्या श्लोकांतील आर्यावर्त आणि म्लेंच्छदेश यांची फोड करताना मेधातिथि लिहितो कीं, 'अर्थद्वारेण अयं शब्द प्रवृत्तः म्लेंच्छदेशः इति। तत्र यदि कथंचित् ब्रह्मावर्तादि देशमपि म्लेंच्छा आक्रमेयुः तत्रैव अवस्थानं कुर्युः भवेदसौ म्लेंच्छदेशः। तथा यदि कश्चित् क्षत्रियादि जातीयः राजा म्लेंच्छान् पराजयेत् चातुर्वर्ण्यं वासयेत् तदा सोपि स्यात् यज्ञीयो देशः। यतः न भूमिः स्वतो दुष्टा। संसर्गात् हि सा दूष्यति। अतः अकृष्णमृगचरणेऽपि देशे यष्टव्यमेव।'

मेधातिथीचा आशय असा कीं, म्लेंच्छ देश आणि आर्यावर्त हीं नांवें भूमीचीं घ्यावयाचीं नसून तत्रस्थ परिस्थितीवरून ठरवावीं. समजा, उद्यां ब्रह्मावर्त देशावर म्लेंच्छानीं आक्रमण केलें व ते तेथेंच स्थायिक झाले तर तोच म्लेंच्छ देश होईल. उलट एखाद्या क्षत्रिय राजानें म्लेंच्छांचा पराजय करून तेथें चातुर्वर्ण्य स्थापन केलें तर तोहि यज्ञीय देश होईल. कारण भूमि ही स्वतः चांगली-वाईट नसून संसर्गानें बरी-वाईट होते. यामुळें इतर रीत्या अनुकूलता असेल तर कृष्णमृग ज्या ठिकाणीं सापडत नाहीं अशा ठिकाणींहि यज्ञ करावा.

मेधातिथीच्या वरील भाष्यावरून देशांतर म्हणजे वंशनाश हें तत्त्व त्याला तरी पटलेलें दिसत नाहीं. उलट आर्य लोक बाहेर म्लेंच्छांना जिंकून चातुर्वर्ण्य स्थापन करतील तर तोहि यज्ञीय देश होईल असेंच तो म्हणतो. राजसत्ता

पाठीशीं असेल तर कोठेंहि निर्भयपणें जाण्यास हरकत नाहीं असा त्याचा स्पष्ट अभिप्राय आहे. वंशनाशाच्या भीतीचा तो ओझरता उल्लेखहि करीत नाहीं. खुद्द मनुस्मृतींतहि तसा उल्लेख नाहीं. तरी पण ग्रंथकार ठासून लिहितो कीं, " आज शास्त्रज्ञांमध्यें पुढें येत असलेलें हें मत धर्मशास्त्रकार मनूला नक्की माहीत होते" मनूची ग्रंथकारावर कांहीं विशेष कृपा असावी एरवीं मनूचें हृद्गत त्यानें कसें ओळखलें हें सांगणें कठीण !

इतिहासाची साक्ष घेतली तर भारतीय लोक, वैदिक कालापासून तों थेट दहाव्या शतकापर्यंत, दिग्विजयाकरितां म्हणून, वाणिज्याकरितां म्हणून, धर्मप्रसाराकरितां म्हणून, हमेष परदेशांत जात आलेले आहेत अशीच ती आढळून येते. जावा, सुमात्रा वगैरे बेटांतून भारतीय स्थायीकहि झाले. त्यांचा वंश तर नष्ट झाला नाहींच, उलट त्यांनीं भारतीय संस्कृति पर ठिकाणींहि शतकानुशतकें रक्षण केली; मनूचा आर्यावर्त म्हणजे विंध्याच्या वरचा प्रदेश. मनूचा दंडक पाळावयाचा तर येथील द्विजांनीं हा प्रदेश केव्हाहि सोडावयास नको होता. पण इतिहासाची साक्ष अशी आहे कीं, या प्रदेशांत बौद्धांचें प्राबल्य झाल्यावर येथील अनेक ब्राह्मण कुटुंबें दक्षिणेकडे आलीं. शेंकडों वर्षांपूर्वी दक्षिणेंत आलेल्या या लोकांचें वंश आजतागायत दक्षिणेंत सुखानें नांदत आलेले आहेत.

परदेशगमनाचा निषेध हा आचारशुद्धीकरितांच असला पाहिजे.

पराशरस्मृतीचाहि याच अनुमानाला दुजोरा आहे. पराशर लिहितो कीं, ' वसन् वा यत्र कुत्रापि स्वाचारं न विवर्जयेत् । नापद् कर्माणि कुर्वीत इति धर्मस्य निश्चयः ' म्हणजे पृथ्वीवर कोठेंहि राहावें, पण आपले आचार सोडूं नयेत हाच धर्माचा निश्चय होय. अर्थात् स्मृतिकारांचा रोख आचारशुद्धीवर आहे असेंच दिसतें.

मनूच्या सिद्धान्ताचें समर्थन होईल असा कांहीं भाग पाश्चात्य ग्रंथांत आढळला कीं तो भाग सिद्ध असिद्ध न पाहतां स्वीकारावयाचा, त्यावरून ऐसपैस हवा तो सिद्धान्त काढावयाचा व तो पुन्हा मनूच्या माथीं मारावयाचा असा हा सर्व प्रकार आहे.

आणखी एक प्रकार पाहा—

'न शूद्राय मतिं दद्यात्' असा पूर्वीचा दण्डक होता. त्याला पोषक आधार कोठें सापडतो का पाहतां पाहतां श्री० जोशी यांना रसेलचें वाक्य दृष्टीस पडलें कीं, उद्यांच्या भावी समाजांत पुष्कळसें शास्त्रीय ज्ञान, फार थोडे लोक सोडून, इतरांपासून गुप्त ठेवण्यांत येईल. हें वाक्य दृष्टीस पडतांच मनूचें मनोगत नेमकें हेरणाऱ्या ग्रंथकारानें कयास बांधला कीं, मनूचाहि हाच अभिप्राय असला पाहिजे. वेदविद्या म्हणजेच शास्त्रीय ज्ञान. अर्थात् तें शूद्रापासून गुप्त ठेवण्यांत मनूचा दूरदर्शीपणाच दिसून येतो! पण वेदविद्या म्हणजे शास्त्रीय-विद्या कशी व तें दिल्यानें समाजावर आपत्ति काय कोसळणार होती त्याविषयीं खुलासा मात्र कांहीं एक केलेला नाहीं. आजचें शास्त्रीय ज्ञान वाटेल त्याच्या हातीं पडलें तर तें कसें घातक होईल याची कल्पना अमेरिकेंतील दरवडेखोर चळवळीवरून करतां येईल. पण वेदविद्या शूद्रांनीं शिकल्यानें काय अनर्थ झाला असतां हें उकलून सांगितल्याशिवाय समजणें कठीण.

पण जो अभिप्राय मनूच्या गळ्यांत बांधण्यांत आला आहे तो मुळांतच खरा आहे म्हणून कशाकरून? शूद्राला मति देऊं नये असें मूळचें मनूचें वचन आहे. त्यांतील मति ह्या शब्दाचा अर्थ वेदविद्या येवढाच घ्यावा याला गमक काय? ग्रंथकारानें गमक कांहींच दिलेलें नाहीं तेव्हां टीकाकार काय म्हणतात तें पाहूं. सर्वांत जुना टीकाकार मेधातिथि लिहितो कीं 'शूद्रस्य दृष्टादृष्टविषये हितोपदेशो न कर्तव्यः' म्हणजे अदृष्ट फल अशा वेदविद्येविषयींच तेवढा उपदेश करूं नये असें नव्हे तर दृष्ट गोष्टीविषयींहि उपदेश करूं नये. उलट जोशी म्हणतात, शिक्षण हें लौकिक, वैदिक व आध्यात्मिक. त्यांपैकीं लौकिक ज्ञान समाजाला मिळत नव्हतें अगर देऊं नये असा दंडक स्मृतिशास्त्रांत कोठेंहि घालून दिलेला आमच्या वाचनांत नाहीं. मेधातिथींचा वरील उल्लेख जोशी यानीं पाहावा. बाकीच्या सर्व टीकाकारांनीं तर मति ह्याचा अर्थ दृष्टार्थबुद्धि म्हणजे लौकिक ज्ञान एवढाच घेतला आहे. मेधातिथींसारखा दृष्ट आणि अदृष्ट असा दुहेरी अर्थहि घेतलेला नाहीं. सर्वज्ञ नारायणाचे शब्द 'मतिं दण्डनीतिशास्त्रादि विषयम्' व नंदनाचे शब्द 'मतिं परेण अविज्ञातम् उपायम्' हें वाचलें म्हणजे या टीकाकारांच्या मतें मति याचा अर्थ लौकिक ज्ञान होय याविषयीं संशय राहत नाहीं. आतां ग्रंथकारालाच मनूचें मनोगत अधिक यथार्थ तऱ्हेनें कळतें असें म्हटल्यास बोलणें नाहीं. पण तसें धरलें तरी मेधा-

तिथीच्या वेळेपासून तरी म्हणजे सुमारें गेलीं हजार वर्षे तरी शूद्राला कोणतीच विद्या शिकवूं नये असें मत रूढ होतें हें मानावें लागतें. हें मत शास्त्रीय नसून अनुवाद वृत्तीचें अपत्य होय असें न मानावें तर काय करावें ?

स्वतःचें काडीचेंही नुकसान न होतां दुसऱ्याला देण्यासारखी एखादी विद्या असली तर ती अध्यात्मविद्या, पण तीहि देण्यास लोक तयार नसत असें स्पष्ट दिसतें. दधीचि ऋषीजवळ जी अध्यात्मविद्या होती ती दुसऱ्यास दिली तर तुझा शिरच्छेद होईल, असें इंद्रानें त्याला बजावलें होतें. असो. यामुळें शूद्राला विद्या नाकारण्यांत समाजरचनेचें मोठें तत्त्व पाळलें गेलें असें होत नाहीं.

वरील विवेचनावरून आपल्या रूढ समजुतींना पाश्चात्यसमाज शास्त्राचा आधार आहे हें म्हणणें कसें फोल आहे हें ध्यानीं येईल.

---

# स्त्री-पुरुष-समता
## आणि
# अनुवंशशास्त्राचें बुजगावणें

स्त्री आणि पुरुष हे समाजाचे तुल्यबल घटक होत हें मत छेदून टाकण्यास पूर्वी जें शस्त्र वापरण्यांत येई तें धर्मशास्त्राचें. 'न स्त्री स्वातंत्र्यमर्हति' एवढें शस्त्र प्रतिपक्षाच्या अंगावर फेकलें म्हणजे तें युक्तिवादाचें सर्व चिलखत फोडून विद्ध करी. स्त्रियांना वारसाहक्क नसावा असें सिद्ध करावयाचें झाल्यास कौन्सिलमध्यें मोठा वाद घालण्याची आवश्यकता नसे; तर दाराः पुत्रश्च दासश्च त्रयएव सधना स्मृताः। एवढें वचन काढून दाखविलें म्हणजे वाद जिंकला जाई. पण हीं शस्त्रें आतां बोथट झालीं आहेत. युक्तिवादाची लहानशी कपचीहि त्यांनीं उडत नाहींशी झाली आहे. हें पाहून रिकाम्या झालेल्या भात्यांत आतां नवीं शस्त्रें साठविलीं जात आहेत. त्यांपैकीं एक शस्त्र अनुवंश-शास्त्र हें होय. समतावादाच्या दृष्टीनें या नव्या शस्त्राचें अंतरंग निरखणें आवश्यक झालें आहे. तें निरखिलें म्हणजे हें शस्त्रहि समतेच्या शरीरावर ओरखडा काढण्यासहि समर्थ नाहीं असें दिसून येईल. तें पाहण्याकरितां प्रथम अनुवंशप्रक्रिया समजून घेऊं.

## अनुवंश-प्रक्रिया

गेल्या पन्नास वर्षांत भौतिक शास्त्रान्तर्गत विविध शाखांमध्यें जें अव्वल दर्जाचे व क्रांतिकारक असे शोध लागले आहेत त्यांत प्राणिशास्त्रांतील अनुवंश प्रक्रियेच्या शोधासहि महत्त्वाचें स्थान आहे. भौतिक शास्त्रांना दिवसेंदिवस विलक्षण तेज येत चाललें असून सृष्टीचीं गूढ रहस्यें मानवाच्या बुद्धीस हळूहळू उकलूं लागलीं आहेत. अनुवंश-प्रक्रिया हेंहि पन्नास वर्षांपूर्वी असेंच एक मोठें गूढ होतें. आईबापा-सारखीं मुलें व्हावींत ही गोष्ट सहज वाटे, पण एकाच आईबापापासून झालेल्या

भावंडांत जुळीं सोडलीं असतां सर्वतोपरी सारखीं भावंडें कां सांपडूं नयेत आणि आईबापाशींहि कोणतेंच साम्य नसलेलीं मुलें तर दृष्टीसच कां पडावीं? जसें पेरावें तसें उगवावें हा सामान्य न्याय. गव्हाच्या शेतांत नाचणी बनणार नाहीं आणि शाळूच्या शेतांत उडीद उगवणार नाहीं या न्यायानें उंच मातापितरांच्या पोटीं उंच मुलें निपजावींत आणि नकट्या नाकाच्या मातेच्या पाळण्यांत नकटें मूल दिसावें ही स्वाभाविक अपेक्षा. पण कांहीं वेळां सुंदर मातेच्या कडेवर बसून कुरूप मूल वरील अपेक्षेला लाथाडत असलेलें आढळून येतें.

असें कां व्हावें याचें उत्तर देण्यास जननप्रक्रिया समजून घेतली पाहिजे. जननप्रक्रियेमध्यें पुरुषबीज आणि स्त्रीबीज यांचा संगम व एकीकरण व्हावें लागतें एवढें ज्ञान पूर्वीपासून रूढ आहे. पण प्रत्येक अपत्याच्या गर्भसंभवामध्यें एकाच प्रकारचें बीजयुगुल असतांहि भावंडाभावंडांमध्यें भिन्नता उत्पन्न कां व्हावी याचा उलगडा होत नसे. तो उलगडा होण्यास स्त्रीबीज व पुरुषबीज हे जे उत्पत्तीचे स्थूल घटक त्यांचेंच नुसतें ज्ञान होऊन भागत नाहीं.

हे दोन्ही घटक म्हणजे दोन सूक्ष्म पेशी असून त्या सूक्ष्मदर्शकयंत्राच्या साहाय्यानें प्रत्यक्ष डोळयास दिसूं शकतात. शरीरांतील कोणताहि एखादा भाग तपासला तरी त्याचे अंतिम घटक या पेशींचेच बनलेले आढळून येतात. म्हणजे जड द्रव्याचे सूक्ष्म घटक जसे अणूंचे बनलेले आढळून येतात तसे सजीव द्रव्याचे सूक्ष्म घटक पेशींचे बनलेले आढळतात. कोणताहि एखादा सूक्ष्म तंतु घेऊन तपासला तरी तो पेशींचा बनलेला आढळतो. एखादी इमारत जशी विटांची रचलेली असावी तसे प्राणिद्रव्याचा कोणताहि भाग पेशींनीं रचलेला असतो. आपलें शरीर म्हणजे असल्या लाखों सूक्ष्म पेशींचा बनलेला प्रासाद होय. आतां अपत्यसंभूतीला लागणारें पुरुषबीज व स्त्रीबीज हेंहि या असंख्य पेशींपैकींच दोन पेशी होत. अशा प्रकारच्या जननपेशी किंवा बीजें सर्व पुरुषांमध्यें असंख्य असतात. त्यांपैकीं एक पुरुषबीज व एक स्त्री-बीज यांच्या संगमानें अपत्य निर्माण होतें. झाडावर हजारों फुलें आलीं असतांहि फळें फार थोडीं धरतात, बाकीच्या फुलांचा खालीं सडा पडून तीं व्यर्थ जातात. तद्वत् स्त्री-पुरुषांतील बाकीच्या असंख्य जननपेशी फुकट जात असतात.

नुसत्या पेशींचेंच ज्ञान शास्त्रज्ञांस झालेलें होतें तोंपर्यंत अनुवंशाचें रहस्य

त्यांच्या हस्तगत झालेलें नव्हते. कारण अपत्यसंभवास लागणाऱ्या असंख्य जननपेशी सूक्ष्मदर्शक यंत्राखालीं तपासल्या तरी त्या सर्व सारख्याच दिसतात. त्यामुळें भावंडा-भावंडांत वैसदृश्य कां उत्पन्न व्हावें हें सांगतां येत नसे. तसेंच मातापितरांतील अनेक विशेष अपत्यांत उमटतात तेंहि या दोन सूक्ष्मपेशींच्या द्वाराच उमटत असल्यानें हे विशेषहि या पेशींत कसें सांठविलेलें असतात हेंहि सर्व गूढ असे. पण रसायनशास्त्रांत ॲटमचे घटकावयव दर्शविणारा इलेक्ट्रॉनचा जसा अत्यंत क्रांतिकारक शोध अलीकडे लागला आहे त्याचाच तोडीचा शोध प्राणिशास्त्रानेंहि लावला आहे. तो म्हणजे प्राणिजद्रव्याचा अंतिम घटक जो पेशी समजला जात असे त्या पेशींच्या आंत क्रोमोसोम (Chromosomes) अथवा रंगपरमाणु असतात हा होय. हा शोध इलेक्ट्रोनच्या शोधाइतकाच महत्त्वाचा असतांहि इलेक्ट्रोनला जशी प्रसिद्धि मिळालेली आहे तशी यास मिळालेली नाहीं. या रंगपरमाणूच्या शोधानें अनुवंशप्रक्रियेवर फार महत्त्वाचा प्रकाश पडलेला आहे.

अणूचें पृथक्करण केल्यावर जसे इलेक्ट्रॉन आढळतात तसें पेशीचें पृथक्करण केलें म्हणजे प्रत्येक पेशींत रंगपरमाणु आढळून येतात. हे रंगपरमाणु पेशीच्या आंतील पातळ पदार्थांत पोहत असलेले आढळून येतात. आतां निरनिराळ्या पदार्थांच्या ॲटममध्यें इलेक्ट्रोनची संख्या जशी भिन्न भिन्न आढळते तशी भिन्न भिन्न प्राण्यांच्या शरीरपेशीमध्यें या रंगपरमाणूंची संख्या भिन्न भिन्न आढळते. आणि या संख्येवरच या पेशीचा विनायक बनावयाचा कीं वानर बनावयाचा हें अवलंबून असतें. खुद्द आपणा माणसांच्या पेशींत या रंगपरमाणूंची संख्या अठ्ठेचाळीस असते. शरीरांतील प्रत्येक पेशींत हे अठ्ठेचाळीस परमाणु हजर असतात. त्यांतहि हे सर्व भिन्न नसून एकेका जातीचे दोन अशा एकंदर चोवीस जोड्या करून राहत असतात.

या रंग परमाणूंशीं शास्त्रज्ञांची अधिक जानपछान झाल्यावर त्यांना त्याचें कार्यस्वरूप वगैरे हळूहळू कळूं लागलें. त्यावरून ह्या रंगपरमाणूचें मंडळ म्हणजे सूक्ष्मदर्शक यंत्रानें दिसणाऱ्या पेशींच्या चिमकुल्या खोलींत बसून अफाट देहसाम्राज्याचीं सूत्रें चालविणारें जणों मंत्रिमंडळ होय असें शास्त्रज्ञांना आढळून आलें. मंत्रिमंडळांत जशीं खातीं वाटलेलीं असतात तशीं या रंगपरमाणूमध्येंहि शरीरांतील घटकावरील हुकमत वाटलेली असते. कोणी

रंगपरमाणु शरिराची उंची ठरवितो, कोणी डोळयांचा काळा, निळा, घारा वगैरे रंग ठरवितो. कोणी केसांचा कुरळेपणा वा राकटपणा हा ठरवितो. रंगपरमाणूंचीं हीं कामें कळून आलीं म्हणजे अनुवंशप्रक्रियेचा उलगडा होऊं लागतो. तो असा कीं मातापितरांचे गुणावगुणविशेष जे अपत्यांत संक्रमित होतात ते या रंगपरमाणुद्वारें होत असतात. मातापितरांच्या प्रत्येक पेशींत अठ्ठेचाळीस रंगपरमाणु असतात व अपत्यांच्या पेशींमध्येंही मातापितासदृशच रंगपरमाणु उतरावे हें साहजिकच. तर मग वैसदृश्य कसें निर्माण होतें ? तेंच आतां पाहूं.

परमाणूंची संख्या सर्व पेशींत अठ्ठेचाळीस असते हा जो सामान्य नियम त्याला एक महत्त्वाचा अपवाद आतां सांगितला पाहिजे. तो म्हणजे अपत्योत्पादक पेशी होत. या पेशींमध्यें मात्र रंगपरमाणूंची संख्या इतर पेशींतील संख्येच्या बरोबर निम्मी असते. आपणा माणसांमध्यें ही संख्या चोवीस असते. आतां बीजपेशींमध्यें ही संख्या निम्मी कां असावी हें थोडा विचार केला असतां सहज ध्यानीं येईल. तशी ती नसेल तर घोटाळा उत्पन्न होईल. कारण नवीन मूल जें जन्मास यावयाचें त्याच्या शरीरांतील पेशींमध्येंहि रंगपरमाणूंची संख्या अठ्ठेचाळीसच असली पाहिजे. मूल जन्मास येतें तें पुरुषाची एक पेशी व स्त्रीची एक पेशी अशा दोहोंच्या एकीकरणानें येते. आतां या दोन्ही पेशींमध्यें जर अठ्ठेचाळीस रंगपरमाणु असले तर नवीन संयुक्त पेशीमध्यें त्यांची संख्या शहाण्णव होईल. ही अडचण टाळण्याकरितां निसर्गानें असा मार्ग काढला आहे कीं, शरीराच्या इतर असंख्य पेशींमधील रंगपरमाणूंची संख्या जितकी असेल त्यांच्याबरोबर निम्मी संख्या बीज परमाणूंमध्यें असावी. या प्रक्रियेप्रमाणें स्त्रीबीज आणि पुरुषबीज एकत्र आलीं असतां जो गर्भ निर्माण होतो त्याच्या पेशींतील रंगपरमाणूंची संख्या फिरून अठ्ठेचाळीस होते. गर्भ उत्पन्न होतो तेव्हां तो फक्त एकपेशी असतो. तो वाढीस लागला म्हणजे या एक पेशीच्या फुटून दोन पेशी होतात, पुढें दोहोंच्या चार, चारच्या आठ, आठाच्या सोळा, अशा क्रमाने शरीरांतील असंख्य पेशींचें जाळें निर्माण होतें. या जाळयांतील प्रत्येक पेशींत रंगपरमाणूंची संख्या ठराविकच असते. आणि ही संख्या अशी साधली जाते कीं, जेव्हां एक पेशी फुटून त्याच्या दोन होतात तेव्हां मूळच्या पेशींतील रंगपरमाणूंच्याहि दोन वाटण्या केल्या जातात. पण त्या

निम्मे एकांत व निम्मे दुसऱ्यांत अशा धर्तीच्या नसून अठ्ठेचाळीस परमाणूं-पैकीं प्रत्येकाचा निम्मा भाग पहिल्यांत व प्रत्येकाचा दुसरा भाग दुसऱ्यांत. येणेंप्रमाणें असंख्य पेशी निर्माण होत असतां प्रत्येक नव्या पेशींत जुन्या पेशींतून निर्माण झालेले व संख्येनें तुल्यबल असे रंगपरमाणू अंतर्भूत होत जातात. पेशींचें हें जाळें विणलें जात असतां जेव्हां बीजपेशी निर्माण होण्याची वेळ येते तेव्हां मात्र रंगपरमाणूंची संख्या निम्मी करण्यांत येते.

आतां ही संख्या निम्मी करतांना जी क्रिया होते ती समजून घेणें फार महत्त्वाचें आहे. हे जे अठ्ठेचाळीस रंगपरमाणू असतात ते सर्व भिन्न प्रकारचे नसतात. तर एका एका प्रकारचे दोन अशा त्याच्या चोवीस जोड्या असतात; हें वर सांगितलेंच आहे. प्रत्येक पेशींत या अशा चोवीस जोड्या असतात. या चोवीस जोड्यांपैकीं प्रत्येकींत एक रंगपरमाणू मातेकडून आलेला व एक पित्या-कडून आलेला असा असतो. आतां बीजपेशी निर्माण होत असतां या चोवीस जोड्यांपैकीं प्रत्येकांतून एकएक परमाणू घेतला जातो, पण तो कोणता घेतला जाईल, मातेकडील कीं पित्याकडील, हें सर्वस्वीं दैवावर अवलंबून. बीजपेशींत जे चोवीस रंगपरमाणू यावयाचे त्यांत चोवीस जातींचे चोवीस यावयाचे हें निश्चित. पण हे चोवीस ज्या अठ्ठेचाळिसांतून निवडावयाचे त्या अठ्ठेचाळि-सांत चोवीस जातींचे चोवीस मातेकडून आलेले आणि तशाच चोवीस जातींचे चोवीस पित्याचे असल्यानें बीजपेशीमध्यें जे उतरावयाचे त्यांत पित्याचे किती आणि मातेचे किती उतरावयाचे याला नियम असा कोणताच नाहीं. यामुळें कांहीं बीजपेशींत पित्याचे दहा आणि मातेचे चवदा, दुसऱ्यांत पित्याचे वीस आणि मातेचे चार, तिसऱ्यांत पित्याचा एक आणि मातेचे तेवीस, अशा रीतीनें या चोवीस संख्येची घटना अनेक तऱ्हेनें बनत असते. पुरुषाची बीजपेशी अशा रीतीनें बनते आणि स्त्रीची बीजपेशीहि पण अशा रीतीनें बनते आणि हीं दोन्ही एकत्र आलीं असतां जी नवीन अठ्ठेचाळिसांची गर्भपेशी बनते त्यांत पित्याचे चोवीस आणि मातेचे चोवीस असे मिळून अठ्ठेचाळीस रंगपरमाणू फिरून हजर होतात. पण पुरुष व स्त्री यांमध्यें बीजपेशी जेव्हां तयार होतात तेव्हां अठ्ठेचाळिसाचे चोवीस होत असतांना अनेक तऱ्हेनें होत असतात. त्यामुळें पुरुषांतील प्रत्येक बीजबिंदु आंतील रंगपरमाणूंच्या दृष्टीनें तंतोतंत सारखा नसतो. आणि

हीच गत स्त्रीबीज बिंदूची. ही गोष्ट नीट ध्यानीं घेतली म्हणजे भावंडाभावंडां-मध्यें फरक का असतो ह्याचा उलगडा होऊं लागतो.

सर्व भावंडें एकाच मातापितरापासून निर्माण झालेलीं असतात; पण पहिल्या भावंडाचा जन्म पित्याच्या ज्या बीजपेशीपासून झाला ती बीजपेशी (sperm) ही दुसऱ्या भावंडाचा जन्म त्याच पित्याच्या ज्या दुसऱ्या बीजपेशीपासून झाली तिच्याशीं रंगपरमाणूंच्या दृष्टीनें सर्वस्वीं सारखी नसते. पहिल्या भावंडाच्या वेळेचे चोवीस रंगपरमाणु अठ्ठेचाळिसांतून चोवीस होत असतांना मातेचे दहा आणि पित्याचे चौदा असे उतरले असतील तर दुसऱ्याच भावंडाच्या पुरुषबीजांतील चोविसांत पित्याचे वीस आणि मातेचे चार असे रंगपरमाणु उतरलेले असतील. यामुळें दोन्ही भावंडांमध्यें एकाच पित्याचें बीज असलें तरी तें प्रत्येक वेळीं आंतील रंगपरमाणूंच्या दृष्टीनें तंतोतंत सारखें नसतें. हीच स्थिति स्त्रीबीजाची. दोन्ही भावंडांच्या वेळीं स्त्रीबीज एकाच मातेचें असलें तरी तें दोन्ही वेळीं रंगपरमाणूंच्या दृष्टीनें सर्वस्वीं सारखें नसतें. आणि व्यक्तिवैशिष्ट्य हें तर सर्वस्वीं रंगपरमाणूंवरच अवलंबून आहे. यामुळेंच एकाच मातापितरांच्या पोटीं आलेल्या अपत्यांमध्येंहि संपूर्ण साम्य असें कधींच आढळत नाहीं.

संपूर्ण साम्य आढळतें तें फक्त जुळया भावंडांमध्यें. जुळया गर्भाच्या उत्पत्तीविषयीं सामान्य समजूत अशी असते कीं, एकाच प्रसंगीं कदाचित् फार थोड्या वेळाच्या अंतरानें दोन पुरुष-बीजांचा दोन स्त्री-बीजांशीं संयोग होऊन दोन गर्भ निर्माण होत असावेत. ही समजूत खरी असती तर या जुळयामध्येंहि साम्य सापडावयास नको होतें. कारण हीं बीजें सर्वस्वीं सारखींच कां असावीं हें सांगणें कठीण. म्हणून शास्त्रज्ञांची उपपत्ति अशी आहे कीं, जेव्हां जुळें जन्मास येतें तेव्हां दोन पुरुष-बीजांचा दोन स्त्री-बीजांशीं संयोग होऊन दोन गर्भ निर्माण होत नाहींत, तर एका पुरुष-बीजाचा एका स्त्री-बीजाशीं संयोग होऊन प्रथम एकच गर्भ निर्माण होतो व नंतर त्याचे फुटून दोन गर्भ निर्माण होतात. त्यामुळें त्यांचे गुणावगुण तंतोतंत उतरतात. रंगपरमाणूंची ही घडामोड कळली म्हणजे जुळीं सारखीं कां असतात आणि बिनजुळीं सारखीं का नसतात ह्या दोन्ही प्रकारांचा उमज पडतो. हे रंगपरमाणु म्हणजे अनुवंशप्रक्रियेच्या मातृकाच होत. रंग या अर्थी वर्ण शब्द

वापरल्यास या मातृकांना मानवी शरीरान्तर्गत **वर्णमाला** असें अन्वर्थक नांव देण्यास हरकत नाहीं. अनन्तपार शब्दशास्त्र बावन वर्णमालेंत जसें अन्तर्भूत होतें तसें सर्व अनुवंशशास्त्र शेवटीं या अठ्ठेचाळीस वर्णमालेंत समाविष्ट होतें.

एवढ्यानेंच अनुवंशप्रक्रियेंतील सर्व रहस्य गवसलें असें मात्र नाहीं. कांहीं अत्यंत महत्त्वाचे प्रश्न अद्याप आपणांस पहावयाचेच आहेत. उदाहरणार्थ, अठ्ठेचाळीस रंगपरमाणूंच्या चोवीस जोड्या असतात; त्यांत प्रत्येक जातीचे परमाणु दोन असतात. एक मातेकडून आलेला आणि दुसरा पित्याकडून आलेला. या दोहोंचाहि अंमल शरीरावर चालतो. उदाहरणार्थ डोळ्याचा रंग घेऊं. डोळ्याच्या रंगावर रंगपरमाणूंची हुकमत असते असें शास्त्रज्ञांनीं शोधून काढलें आहे. आतां या रंगपरमाणूंपैकीं एक घारे डोळेवाला आहे व दुसरा काळे डोळेवाला आहे असें समजा. तर या घाऱ्या डोळ्यांच्या व काळ्या डोळ्यांच्या व्यक्तींच्या अपत्यांचे डोळे कोणत्या रंगाचे व्हावे? हा प्रश्न फार महत्त्वाचा व तसाच मनोरंजकहि आहे. कारण जी गोष्ट डोळ्यांची तीच इतर अनेक गुणावगुणविशेषांची. पण तो सोडविण्यास नुसतें रंगपरमाणूंशीं हित-गुज करून भागत नाहीं. त्याचें रहस्य समजण्यास पुष्कळच खोल पाण्यांत म्हणजे मेंडेलच्या प्रयोगांत व रंगपरमाणूंचे विभाग जे Jene ‘जेन’ त्यांच्या तपाशिलांत शिरावें लागेल.

तूर्त रंगपरमाणूंचें जें ज्ञान आपण आतां करून घेतलें तेवढ्याचाच स्त्री-पुरुष उच्चनीचत्वविषयक सामाजिक रूढ समजुतीवर काय प्रकाश पडतो तें पाहूं. रंग-परमाणूंविषयीं विवेचन करतांना आपण हें पाहिलें कीं, मातापितरांचे गुण अपत्यांत उतरतात ते या रंगपरमाणूंच्या द्वारें. म्हणजे अनुवंशप्रक्रियेचें मुख्य साधन म्हणजे हे रंगपरमाणु असून यांचा जो वाटा अपत्यास मिळतो तो मातेकडून व पित्याकडून समसमान मिळतो. पुरुषाकडून जास्त व स्त्रीकडून कमी असा मिळत नाहीं. दोघांच्याहिकडून बरोबर चोवीस-चोवीसच रंगपरमाणु मिळतात व त्या दोहोंचे मिळून मानवशरीरास अवश्यभूत असे अठ्ठेचाळीस परमाणु तयार होतात. आतां हा जो समसमान वांट्याचा प्रश्न आहे तो समाजशास्त्राच्या दृष्टीनें महत्त्वाचा आहे. कारण त्यावरून अनुवंशप्रक्रियेमध्यें स्त्री आणि पुरुष यांचें महत्त्व समान आहे असें सिद्ध होत नाहीं का?

या सिद्धांतानें कांहीं रूढ समजुती कशा निर्मूल ठरतात पहा. रूढ समजूत अशी

आहे कीं, जननप्रक्रियेमध्यें पुरुष हाच प्रभावी असून स्त्री ही गौण आहे. साधारण समजूत अशी असते कीं, स्त्रीबीज हें फक्त पोषक द्रव्य असून पुरुषबीज हेंच काय तो जीव असतो. स्मृतिकारांनीं जे 'बीज-क्षेत्र' हे जे शब्द वापरले आहेत त्यावरून असाच ध्वनि निघतो. स्त्री-अंश ही जमीन आणि पुरुष-अंश हें बीज. आतां शेतांत जें पिकवावयाचें त्याचे गुण सर्वस्वीं बीजावर अवलंबून. जोंधळा पेरला तर जोंधळा येईल, गहूं पेरला तर गहूं येईल. जमिनीचें कार्य एवढेंच कीं, जमीन कमीअधिक कसदार असेल त्या मानाने धान्य कमीअधिक पोसलें जाईल एवढेंच. पण जमिनींत कोणतें धान्य उगवावयाचें हें सर्वस्वीं बीजावर अवलंबून. हा न्याय स्त्रीपुरुषांसंबंधीं खरा मानला म्हणजे साहजिक असें मानण्याची प्रवृत्ति होते कीं, अपत्यांत गुण कोणते उतरावयाचे हें सर्व पित्यावरून ठरावयाचें आणि मातेचें कार्य म्हणजे त्याचा कमीअधिक परिपोष करणें एवढेंच. ही समजूत खरी मानून कांहीं लोक पूर्वीच्या शास्त्रकारांनीं अनुलोम विवाह हा प्रतिलोम विवाहापेक्षां श्रेष्ठ होय असें जें ठरविलें तें या तत्त्वावरच ठरविलें असावें असें त्याचें समर्थनहि करतात. अनुलोम पद्धतींत पुरुष श्रेष्ठ जातीचा म्हणून अपत्यांत श्रेष्ठ गुण उतरतात आणि प्रतिलोमांत पुरुष निकृष्ट जातीचा म्हणून अपत्यांत निकृष्ट गुण उतरतात. अतएव शास्त्रकारांनीं प्रजेंत उत्तम गुणांची वाढ व्हावी म्हणूनच अनुलोम प्रशस्त ठरविला असें प्रतिपादण्यांत येतें. येथें उत्कृष्ट जात आणि निकृष्ट जात हें जें तत्त्व स्वीकारलें आहे तेंच मुळीं आधीं निर्दोष नाहीं पण तो सध्यां मुद्दा नाहीं. उत्कृष्ट आणि निकृष्ट अशा जाती आहेत असें गृहीत धरलें तरीहि अनुलोम पद्धतीनें झालेली प्रजा ही प्रतिलोम पद्धतीनें झालेल्या प्रजेहून श्रेष्ठ होय ह्याला शास्त्रांत तरी आधार नाहीं. कारण वर आपण पाहिलें आहे कीं, अनुवंशप्रक्रियेमध्यें माता-पितरांचा वांटा समसमान असतो.

अनुलोम–प्रतिलोमाप्रमाणें पुनर्विवाहाचा निषेधहि कांहींजणांकडून याच मुद्द्यावर म्हणजे जननक्रियेमधील पुरुषाच्या श्रेष्ठत्वाच्या मुद्द्यावर केला जातो. त्या निषेधांत स्त्री ही केवळ क्षेत्र व पुरुष हाच बीज, स्त्रीअंड हें निर्जीव व पुरुष-शुक्रबीज हाच चैतन्य जीवात्मा वगैरे सामान्य रूढ समजुतीच्या जोडीला एक नवीनच विशिष्ट अशा समजुतीचाहि आधार घेतला जातो. ही समजूत अशी कीं, स्त्रीचा पुरुषाशीं एकदां संबंध घडून आला म्हणजे त्या पुरुषाचा त्या स्त्रीच्या पिंडावर कायमचा परिणाम होऊन जातो आणि मग

तिचा दुसऱ्या अनेक पुरुषांशीं संबंध झाला तरी पुढील अपत्यांत प्रथम पुरुषाचे कांहीं विशेष उमटलेले आढळून येतात. हें खरें असेल तर त्यावरून निघणारें अनुमान हेंच कीं, जननप्रक्रियेंत स्त्रीपेक्षां पुरुष हा अधिक प्रभावी होय आणि पुरुषाचा कायम स्वरूपाचा परिणाम जर स्त्रीवर होत असेल तर स्त्रीनें आपल्या शुद्धतेसाठीं पुनर्विवाह टाळावा हें रास्त. वरील समजुतीला इंग्रजींत telegany 'परोक्ष संस्कार' म्हणतात व हा प्रकार संभवनीय आहे असें खुद्द डार्विननेंहि त्याच्या काळीं आपलें मत दिलें होतें. पण शास्त्रीय संशोधनानें हाहि प्रकार असिद्ध होय असेंच ठरविलें आहे.

प्रथम पुरुषाचा परिणाम स्त्रीवर कायमचा होतो ही समजूत एके काळीं जारी होती. तिला आपातत: पोषक अशी कांहीं उदाहरणेंहि आढळून आलीं होतीं. अशा उदाहरणांपैकीं एक सुप्रसिद्ध म्हणून लॉर्ड मॉर्टन यांच्या घोडीचें उदाहरण अनेक पुस्तकात दिलेलें आहे. ही घोडी अस्सल अरब जातीची होती. तिला पहिल्या खेपेस एका अंगावर पट्टे असलेल्या झेब्रा नांवाच्या घोड्यापासून एक शिंगरू झालें. या शिंगराच्या अंगावर झेब्रासारखे पट्टे होते व त्यांत अस्वाभाविक वाटण्यासारखें कांहींच नव्हतें. पण पुढें मात्र एक कुतूहलजनक प्रकार घडून आला; तो असा कीं, दुसऱ्या खेपेला या घोडीला तिच्याच जातीच्या म्हणजे अस्सल अरबी घोड्यापासून दुसरें शिंगरू झालें आणि चमत्कार असा आढळून आला कीं, या दुसऱ्या शिंगराच्या अंगावरहि झेब्रा जातीचे पट्टे आढळून आले. या चमत्काराचा उलगडा व्हावयाचा तर तो फक्त टेलिगनीचा प्रकार मानून होण्यासारखा होता. म्हणजे पहिल्या झेब्रा घोड्याचा अरबी घोडीवर कांहीं तरी कायमचा परिणाम झाला असला पाहिजे व त्यामुळें दुसऱ्या शिंगरावर पट्टे उमटले असले पाहिजेत असें अनुमान काढण्याशिवाय गत्यंतर नव्हतें. कांहीं शास्त्रज्ञांनीं मध्यंतरीं असें सुचविलें कीं, पहिल्या झेब्रा घोड्याचीं कांहीं बीजें घोडीच्या पोटांत पहिलें शिगरूं जन्मास आल्यानंतरहि दडून सुप्तास्थितींत असावीं व दुसऱ्या खेपस या झेब्रा बीजाशीं संयोग होऊनच शिंगरूं झालें असावें; पण हा खुलासा समाधानकारक नव्हता.

शास्त्रज्ञांचें खरें समाधान व्हावयाचें तर त्यास प्रयोग करून प्रत्यंतर पुरावा गोळा करणें हाच मुख्य उपाय. आणि मनुष्यावर असले प्रयोग

करणें साध्य नसले तरी पशूवर असले प्रयोग करणें सुलभ असतें. तेव्हां तोच मार्ग पत्करून या प्रश्नाची कायमची तड लावण्याचा निश्चय एका इवर्ट नांवाच्या शास्त्रज्ञानें केला. याकरितां अरबी घोडी आणि झेब्रा घोडा अशा अनेक जोड्या मिळवून त्यानें पुष्कळ प्रयोग केले. त्या सर्व प्रयोगांचा आढावा घेतला असतां त्याला प्रथम अढळून आलें तें हें कीं, झेब्राचे पट्टे नेहमींच उठतात असें नाहीं, तर कांहीं प्रयोगांत मॉर्टनच्या घोडीच्या प्रयोगाप्रमाणें दुसऱ्या शिंगरावर झेब्राचे पट्टे आढळून येतात, तर कांहीं प्रयोगांत असे पट्टे मुळींच आढळून येत नाहींत. इवर्टच्या प्रयोगांत एवढेंच निष्पन्न झालें असतें तर त्यावरून उलटसुलट कांहीच ठरविणें अशक्य होतें. किंबहुना थोड्या प्रयोगांत तरी दुसऱ्या शिंगरावर पट्टे उमटले यावरून झाली तर टेलिगनीची समजूत खरीच ठरली असती. पण इवर्टच्या प्रयोगांत कांहीं शिंगरांत पट्टे आढळतात व कांहींत आढळत नाहीत. याच्या जोडीला एक तिसरें अत्यंत महत्त्वाचें व आश्चर्यकारक प्रमेय आढळून आलें तें हें कीं, झेब्राशीं पूर्वी केव्हाहि संयोग झाला नसतांहि अस्सल अरबी घोड्यापासून अस्सल अरबी घोडीच्या पोटीं झालेल्या शिंगरांतहि कांहीं प्रयोगात पट्टे उमटलेले आढळून आले ! या चमत्काराचा उलगडा कसा करावयाचा ? झेब्राशीं जन्मांत केव्हांहि गांठ पडली नाहीं अशा अरबी घोडीच्या शिंगरांत पट्टे आढळले ते कां आढळावें ? येथें टेलिगनीचा काडीइतकाहि संबंध नाहीं. तथापि यावरून इवर्टनें अनुमान काढलें तें हें कीं, पट्टे आढळणें आणि झेब्राशीं संयोग होणें या दोन्ही गोष्टी समव्याप्त नाहींत.

मग पट्टे उमटले याची उपपत्ति काय ? याची उपपत्ति अन्य तऱ्हेनें देतां येते : ती म्हणजे मातापितरांच्या ठिकाणीं सुप्त असलेले अनेक विशेष अचानकपणें अपत्यांत प्रगट होतात ही होय ! ते कसे प्रगट होतात एतद्विषयक प्रयोग झालेले असून त्यासंबंधी कांहीं नियमहि शास्त्रज्ञांनीं बसविले आहेत. तूर्त टेलिगनीच्या समजुतीस शास्त्राचा आधार नाहीं येवढेंच आपणांस समजून घ्यावयाचें आहे. इवर्टच्या प्रयोगानंतर शास्त्रज्ञ आतां या समजुतीचा उल्लेख करतात तो फक्त एक भोळसट समजूत म्हणून. सुप्रसिद्ध इंग्रज ग्रंथकार वेल्स यांचा जो 'सायन्स ऑफ लाइफ' म्हणून सुप्रसिद्ध ग्रंथ आहे त्यांत त्यानें स्पष्ट लिहिलें आहे कीं, टेलिगनी ही समजूत केवळ निराधार मिथ्या भ्रम होय हें

आतां शास्त्रीय शोधांनीं निःसंदिग्धपणें सिद्ध केलें आहे. ( Today it is possible to assert without any question that telegony is a mere fable which could only have gained ground in the days when men were ignorant of the mechanism of fertilization and reproduction—P. 310 ).

अर्थात् शास्त्रज्ञांच्या इतक्या स्पष्ट इन्कारानंतर स्त्रियांचा गौणपणा सिद्ध करण्याकरितां किंवा स्त्री-पुनर्विवाहाचा निषेध करण्याकरितां टेलिगनी-सारख्या लौकिक समजुतीचा पुरावा न दिलेला बरा हें ध्यानीं येईलच. असल्या समजुती ह्या पुरावा म्हणून मानल्यावर पुरुषांच्या पुनर्विवाहाच्या निषेधाला पोषक अशाहि समजुती दाखवितां येतील. उदाहरणार्थ, पशूंचा–खास अवलादीची निपज करणारांमध्यें नराचा–मादीवर परिणाम होतो ही जशी समजूत आहे तशीच मादीचा नरावर परिणाम होतो अशीहि समजूत रूढ आहे. या समजुतीमुळेंच ते आपल्या वळूचा वाटेल त्या निकृष्ट जातीच्या मादीशीं संबंध येणार नाहीं याविषयीं फार जपत असतात. ही समजूत खरी ठरली तर पुरुष-पुनर्विवाहाचाहि तितकाच निषेध करावा लागेल. कारण पुरुषाचा प्रथम ज्या स्त्रीशीं संबंध येईल त्या स्त्रीचा त्याच्या पिंडावर कायमचा परिणाम होतो असें मानावें लागेल. अतएव त्यानें फिरून विवाह करूं नये असें प्रतिपादन करावें लागेल. मात्र तसें कोणी निकरानें प्रतिपादन करीत नाहीं. वस्तुतः वरील दोन्ही समजुतींना शास्त्राचा आधार नसल्यानें त्यावरून जननक्रियेंतील पुरुषांचें श्रेष्ठत्व व त्यावर अवलंबून असणारें प्रतिलोमावरील अनुलोम विवाहाचें श्रेष्ठत्व अथवा स्त्री-पुनर्विवाहनिषेध यांपैकीं कोणतीच गोष्ट सिद्ध होत नाहीं.

अनुवंशप्रक्रियेंत मातापितरांकडून अपत्यास जी जिंदगी मिळते तींत मातेचा भाग पित्याच्यापेक्षां कोणत्याहि रीतीनें कमी नसतो व ज्या रंग-परमाणूवर अनुवंशप्रक्रिया अवलंबून असते त्या रंगपरमाणूंचे बरोबर सारखी म्हणजे चोवीस अशी संख्या अपत्यास कशी मिळते हें सांगितलें. आणखीहि कांहीं पुरावा स्त्रीचें कार्य जननप्राक्रियेमध्यें पुरुषापेक्षां कांकणभरहि कमी नसतें याला पोषक म्हणून दाखल करतां येण्यासारखा आहे आणि तो चांगला ठसठशीतहि आहे.

स्त्री-बीज हें केवळ पोषक द्रव्य व पुरुष-बीज हा जीव, किंवा स्त्री-बीज ही

कुडी, पुरुष-बीज हा आत्मा, अथवा स्त्री-अंश ही भूमि व पुरुष-अंश हें बीज वगैरे लौकिक समजुती रंगपरमाणूंच्या अभ्यासानें तर फोल ठरतातच; पण या समजुतीवर अगदीं मूले कुठार बसेल असेहि कांहीं प्रयोग शास्त्रज्ञांनीं केले आहेत. वरील समजुतीला थोडा आधार आहे तो एवढाच कीं, स्त्री-बीज हें स्थिर स्थाणु असून पुरुष-बीज हे चळवळ्ये असतें, आणि या दोन बीजांचें एकीकरण होण्याचे प्रसंगीं पुरुष-बीजच स्त्री-बीजापर्यंत वळवळत जाऊन त्यांत जोरानें घुसते. यामुळें पुरुष-बीज हे चैतन्यमय व स्त्री-बीज हें जड अशा समजुतीस आभासात्मक तरी आधार मिळतो. पण समजा अशी कांहीं उदाहरणें आढळलीं, कीं ज्यामध्यें पुरुष स्पर्शाशिवाय स्त्रीला स्वतंत्रपणेंच अपत्यास जन्म देतां आला तर मग तरी पुरुष-बीज हें चेतनामय व स्त्री-बीज हें केवळ जड या मताचा पायाच ढासळेल ना ?

पण असला प्रकार संभवतो कीं नाहीं, ही बाब आतां चर्चेची राहिलेली नसून आजच्या शास्त्रज्ञांना संशोधनामध्यें जीवसृष्टींत असे प्रकार आढळले आहेत; इतकेंच नव्हे तर आपल्या प्रयोगशाळेंत हे प्रकार प्रयोगांनी सर्वमान्यहि करून दाखविले आहेत. पुरुष-बीजविरहित नुसत्या मादीनें घातलेल्या अंड्यांतून नूतन जीव बाहेर येणें या प्रकाराला शास्त्रज्ञ Parthenogenesis असें म्हणतात व याला अयोनिज ह्या शब्दाच्या धर्तीवर 'अशुक्रजनन' असें म्हणतां येईल. असलें अशुक्रजनन ग्रीनफ्लाय, वाटरफ्लाय रॉटिफर वगैरे जीवसृष्टींत अनेक प्रकारांत सापडतें असें शास्त्रज्ञ सांगतात. शिवाय हा प्रकार स्वतःच्या शरीराचेंच विभक्तीकरण होऊन नवीन जीव उत्पन्न होणाऱ्या प्रकारासारखाहि नाहीं. तसले जीवांचे अनेक प्रकार आहेत; पण त्यांच्यांत नर-मादी असा भेदच नसतो. म्हणजे ते जीव निर्लिंग असतात. उलट पुरुषबीजाशिवाय अपत्योत्पादन करणारी ग्रीनफ्लाय ही तृतीय प्रकृति नसून सर्वतोपरी मादीच असते.

पण याहीपेक्षां अधिक ढळढळीत असा एक प्रकार शास्त्रज्ञांनीं आपल्या प्रयोगशाळेंत प्रत्यक्ष पडताळून पाहिला आहे. लोब ( Loeb ) या शास्त्रज्ञानें १८९९ सालींच असा शोध लावला कीं नरसंगाशिवाय मादीनें घातलेलीं कांहीं प्राण्यांचीं निःशुक्र निर्बीज अंडीं घेतलीं आणि तीं जर कृत्रिम उपायांनीं उबविलीं तर त्या अंड्यांपासून नेहमींप्रमाणें सबीज

अंड्यांतल्याप्रमाणें जीव बाहेर येतो. आणि तो जीव सबीज अंड्यांतून येणाऱ्या जीवापेक्षां कोणत्याहि प्रकारें भिन्न नसतो. **म्हणजे शुक्रबीजामुळें अंड्यामध्यें जे फेरफार व चैतन्य उत्पन्न होते तें साधी उष्णता किंवा विजेचा झटका अशा उपायांनींहि उत्पन्न होऊं शकतें.** ह्या तऱ्हेचे प्रयोग कांहीं मासे, गोगलगाईसारखे प्राणी व बेडूक अशा प्राण्यांच्या बाबतींत सिद्ध झाले आहेत. बेडकाच्या अंड्याबाबतींत योजिलेला कृत्रिम उपाय ऐकून तर तुम्ही थक्क व्हाल. तो कोणता—तर एक सुई घेऊन ती रक्तांत बुचकळावयाची आणि त्या सुईनें अंड्याला टोचावयाचें! अर्थात् शुक्र बिन्दु हा मुख्य जीव व स्त्रीअंड हा दुय्यम; इतकेंच नव्हे तर जड घटक होय ही कल्पना सर्वस्वीं चुकीची होय हें स्पष्ट होय.

स्त्री-पुरुषांतील इतर अवांतर भेदांसंबंधानें येथें आपणास विचारकर्तव्य नाहीं. अनुवंशाच्या दृष्टीनें माता आणि पिता हीं तुल्य होत, म्हणजे अपत्यांना गुणावगुणाची जी जिंदगी मातापितरांकडून मिळते त्यांत मातेचा वाटा आणि पित्याचा वाटा सारखाच असतो एवढाच विषय प्रस्तुत असल्यानें स्त्रीपुरुषांतील इतर भेदांसंबंधानें येथें विचार करण्याचें कारण नाहीं. स्त्रियांचें रक्त पुरुषांपेक्षां पातळ असतें, त्यांच्या स्नायूंचें वजन पुरुषांच्या पेक्षां कमी असतें त्यांची पृष्ठमज्जासंस्था शीर्षमज्जासंस्थेपेक्षां अधिक प्रभावी असते वगैरे ज्या गोष्टी मांडल्या जातात त्या स्त्रिया आणि पुरुष यांचीं **कर्तव्यक्षेत्रें** भिन्न असावींत या मताला पोषक म्हणून मांडल्या जातात. अनुवंशप्रक्रियेशीं त्यांचा कांहीं संबंध नाहीं. अर्थात् अनुवंशप्रक्रियेमध्यें असें कांहीं नाहीं, कीं ज्यामुळें स्त्री ही पुरुषापेक्षां हीन दर्जाची समजली जावी.

---

— ४ —

# प्राचीन भारतीयांचे समाजघटनेंतील प्रयोग



'जगाला सुखी करण्यासाठीं सर्व संस्कृतीचें ऐक्य करण्याची शक्ति कोठें असली तर फक्त ती हिंदूंच्या हातीं आहे' अशा मोठ्या स्फूर्तिदायक संदेशाची घोषणा करणारा एक ग्रंथ ज्ञानकोशकर डॉ. केतकर यांनीं जनतेस सादर केला आहे. "भारतीय समाजशास्त्र" हा तो ग्रंथ होय. ग्रंथाचें नामकरण नुसतें समाजशास्त्र असलें तरी समाजशास्त्राच्या अनेक शाखांपैकीं घटनात्मक शाखेचेंच या ग्रंथांत प्रामुख्यानें विवेचन केलेलें आहे. कारण भारतीयांचें वैशिष्ट्य या शाखेंतच विशेष दिसून येतें आणि या वैशिष्ट्याचें परिशीलन करूनच ग्रंथकार विश्वासानें प्रतिपादन करतात, कीं पुढें-मागे सर्व जगाची म्हणून एक संस्कृति होणार असेल तर ती भारतीयांनीं भरतखंडापुरती एक संस्कृति ज्या प्रक्रियेनें बनविली त्याच प्रक्रियेनें होऊं शकेल आणि त्या कामीं प्रत्यक्ष पुढाकार घेण्यास सर्वांत लायक कोणी असेल तर तो भरतखंडांतील ब्राह्मण-वर्ग होय !

सध्यांचा काळ हा समाजसंक्रमणाचा आहे. जुन्या घटनेला नवा घाट येत चालला आहे. समाजांत गति उत्पन्न झालेली आहे. त्या गतीकडे नुसते अगतिकत्वानें पाहत न बसतां तिला इष्ट वळण लावावयाचें असल्यास आपल्या समाजाच्या घटनेचा पूर्व इतिहास अभ्यासिला पाहिजे. इंग्रजी अंमल झाल्यापासून इंग्रजांच्याकडून स्फूर्ति घेऊन समाजसुधारणा करणारे जे समाजसुधारक आपल्याकडे पूर्वीं होऊन गेले व अद्याप आहेत त्यांचे प्रयत्न भलत्याच दिशेनें झाले. म्हणजे असें कीं ज्या गोष्टी बहुजनसमाजाला फारशा खुपतच नव्हत्या अशा क्षुल्लक गोष्टींवर भर देण्यांतच त्यांनीं आपल्या शक्तीचा व्यय केला. पुनर्विवाहाचीच गोष्ट घ्या. पुनर्विवाह रूढ नाहीं असा समाज फार तर शेंकडा दहा टक्के असेल नसेल; अर्थात् पुनर्विवाहाचा प्रश्न हा सार्वराष्ट्रीय होण्याइतका

मोठा नव्हताच मुळीं; पण साहेब पुढारलेला व आपण मागासलेले अशा कल्पनेनें घेरल्यामुळें साहेबाच्या व आपल्या चालीरीतींमध्यें जी जी भिन्नता असेल ती ती जितक्या लवकर काढून टाकतां येईल तितकी टाकावी या इच्छेनें पुनर्विवाह, संमतिवय वगैरे कायद्यांचा प्रयत्न झाला.

असल्या प्रयत्नाविषयीं ग्रंथकार लिहितो कीं, " गेल्या पिढींत समाजसुधारकांचा जो एक वर्ग निर्माण झाला त्या वर्गाची 'समाजसुधारणा' ही इंग्रजांशीं सादृश्य स्थापण्यासाठीं नोकरीपेशांतील लोकांनीं सुरू केलेली चळवळ होती असें म्हटल्यास चूक होणार नाहीं. कॉंग्रेसचें लक्ष ती मवाळ वर्गाच्या ताब्यांत होती तोंपर्यंत केवळ सिव्हिल सर्व्हिसच्या नोकऱ्या हिंदी लोकांस अधिक मिळाव्यात इकडेसच होतें. देशी संस्कृतीचा विकास व्हावा, देशी वाङ्मय वाढावें, सर्व जनतेचा आयुष्यक्रम उच्च व्हावा या प्रकारच्या विचारांचा स्पर्शहि त्या संस्थेंत जोंपर्यंत मॉडरेट लोकांचें प्राबल्य होतें तोंपर्यंत झाला नाहीं. आपल्या लोकांचा कायदेकौन्सिलांत प्रवेश झाल्यावर बराच काळ असा गेला कीं, ज्यांत महत्त्वाचें सामाजिक कार्य कांहींच झालें नाहीं. संमतिवयाचा कायदा, उपवरतेनंतरचें लग्न कायदेशीर करूं पाहणारा कायदा, हे सर्व समाजांत उत्पन्न झालेल्या गरजा पूर्ण करण्यासाठीं नसून विवाहाची मर्यादा मुद्दाम वाढविण्यासाठीं इंग्रजांच्या पढिक शिष्यांच्या प्रयत्नांत झालेले किंवा फसलेले कायदे आहेत. मद्रासेकडे देवळांच्या पैशाच्या सार्वजनिक उपयोगासंबंधाचा झालेला प्रयत्न एवढाच काय तो इष्ट दिशेनें झालेला प्रयत्न होय. इतर बाबतींत असें म्हटलें पाहिजे कीं समाजाचा शास्त्रीय दृष्टीनें विचार करून समाजांत सुधारणा करण्याचा प्रयत्न अजून व्हावयाचा आहे. आजच्या मोहनदासी खटपटीमध्यें शास्त्रशुद्धता मुळींच नाहीं. आजवर समाजसुधारणेसाठीं कायदे करण्याच्या झालेल्या सर्व खटपटी आंग्लशूद्रत्वमूलक आणि त्यामुळें अत्यंत आक्षेपार्ह आहेत."

यासाठीं आपल्या जुन्या परंपरेचा अभ्यास पाहिजे. इंग्रजांना ज्या गोष्टी अनिष्ट वाटतात त्या खरोखरीच अनिष्ट आहेत काय याचा विचार झाला पाहिजे. ब्राह्मणाचें वर्चस्व हें इंग्रजांना वावडें आहे, कारण त्यामुळें इंग्रजांना राजकीय वर्चस्व गाजवतां आलें असतांहि सामाजिक व नैतिक वर्चस्व मिळवितां आलेलें नाहीं. पण आपणास ब्राह्मणांच्या कामगिरीचें खरें स्वरूप पाहावयास नको काय? जातिभेद,

अस्पृश्यता, बालविवाह वगैरे आज अनिष्ट भासणारी प्रत्येक गोष्ट ब्राह्मणांनीं प्रवर्तित केली अशा प्रकारें ब्राह्मणांच्या नांवानें खडे फोडण्याची प्रथा पडली आहे. पण भरतखंडासारख्या एका मोठ्या खंडांतील लोकांना, कीं ज्यांत अनेक वंश, अनेक भाषा, अनेक धर्मपंथ, एकमेकांशीं घासत होते, त्यांना एका संस्कृतीच्या सूत्रांत गोवण्याची क्रिया चालू असतांना आवश्यक व उपयुक्त म्हणून जातिभेदादि घटना या निर्माण झाल्या, कीं कोणा आपलपोट्या ब्राह्मणानें त्या इतरांवर लादल्या याचा विचार करावयास नको काय? ग्रंथकार लिहितो, "आज आपणापुढें धर्मशास्त्राचे नियम तेवढे आहेत. या नियमांच्या पाठीमागें जो समाजहितात्मक विचार असेल तो शोधून काढणें पुष्कळदां कठीण होतें आणि त्यामुळें पुष्कळदां धर्मशास्त्राविषयीं गैरसमज उत्पन्न होतो. नियम लिहिणारांना जो अनुभव आला होता तो अनुभव आपणास नसला म्हणजे जुने नियम लबाडीचे किंवा दुष्टपणाचे वाटूं लागतात." यासाठीं पूर्वीच्या सामाजिक नियमांचा। सामाजिक अर्थ लावण्यासाठीं जपले पाहिजे. उदाहरणार्थ, ब्राह्मणवर्गाचें वर्चस्व व जातींची अगणित संख्या या दोन बाबतींत ग्रंथकार लिहितो कीं, ब्राह्मणांचें म्हणजे विद्याशील वर्गाचें महत्त्व असणें ही गोष्ट कोणत्याहि समाजाच्या प्रगतीचें लक्षण होय. आणि जाति असंख्य झाल्या याचें कारणहि हिंदु समाजांतील फुटीर प्रवृत्तींत जसें आढळेल तसें त्याच्या अगदीं उलट प्रवृत्ति जी एकीकरणप्रवृत्ति त्यांतहि सापडणार नाहीं काय? म्हणजे अनेक वंशांतील लोक एकत्र करण्याच्या प्रवृत्तींत सापडणार नाहीं काय? ग्रंथकार लिहितो कीं, "भारतीय जनतेंतील मुख्य जाती या एका समाजाचे तुकडे पडलेले नसून अगोदर भिन्न असलेल्या जाती एकीकृत केल्या आहेत असेंच आपणांस आढळून येईल. एकीकृत केलेल्या जाती सर्व आर्यवंशीय होत्या असेंहि नाहीं. कांहीं सेमिटिक वंशाच्या होत्या हें स्पष्ट आहे. तात्पर्य, **एका जनतेचे तुकडे पडून तीनचार हजार जाती झाल्या हें स्पष्टीकरण खरें नसून भिन्न लोकांचे ब्राह्मणी संस्कृतीच्या विकासामुळें एकीकरण झालें हें खरें सत्य होय.**

भिन्न जातींतील लोकांना एका सूत्रांत गोवण्याची जी प्रक्रिया भारतीय ऋषींनीं बसविली तीच त्यांची समाजशास्त्रांतील अत्यंत महत्त्वाची कामगिरी होय हा केतकरांचा मुख्य सिद्धांत होय. असें एकीकरण इतर देशांतहि

संपादले गेलें नाहीं असें नाहीं. पण भरतखंडांतील पद्धति त्या सर्वांहून श्रेष्ठ होय असा त्यांचा अभिप्राय आहे. इतर अनेक बाबतींत आपण पाश्चात्यांच्या मागें असलों तरी समाजसंघटनेच्या बाबतींत आपणच त्यांना चार गोष्टी सांगूं शकूं अशी आपल्या पूर्वजांची कामगिरी आहे असें ग्रंथकाराचें मत आहे. तो लिहितो कीं "आज आपण पाश्चात्यांच्या मागें पडलों आहों तें आपल्या सामाजिक संस्थांच्या दौर्बल्यामुळें मागें पडलों आहों कीं दुसऱ्या कारणानें मागें पडलों आहों हें न समजतां आपण आपल्या वैशिष्टयास दोष देऊं लागलों आहों आणि आपले सद्गुण तेच दुर्गुण समजून सद्गुणांचा नाश करण्यास प्रवृत्त झालों आहों. कार्यकारण न पाहतां केवळ आगंतुक गोष्टींसच कारण मानण्याची प्रवृत्ति अशा लोकांमध्यें असते आणि त्याच प्रवृत्तीनें गेलीं पंचाहत्तर वर्षें धुमाकूळ माजविला आहे. समाजसंघटनेच्या बाबतींत भारतीयांची प्रक्रिया हीच सर्वश्रेष्ठ होय; व उद्यां सर्व जगाचें एकीकरण करण्याचा उद्योग कोणी आरंभिला, तर त्याला भारतीय ब्राह्मणांच्या पावलावर पावलें टाकीतच जावें लागेल, किंबहुना भारतीय ब्राह्मणच हें काम करूं शकतील."

अनेक जातींना एकत्र गुंफण्याची क्रिया भरतखंडांतच तेवढी झाली असें नव्हे तर इतरत्रहि अनेक देशांत ती झाली. इंग्लंडचेंच उदाहरण घ्या. आजच्या इंग्लंड या राष्ट्रांत अनेक जाती एकत्र विणलेल्या आहेत. त्या भिन्न प्रदेशांतून आलेल्या असून त्यांची बोलीहि मूळची भिन्न होती. पण आज त्या सर्व एकराष्ट्र, एकसमाज म्हणून नांदत आहेत. आज एकजिनसी बनलेल्या समाजांत मूळ कोणकोणते भिन्न घटक होते हें शोधण्याच्या दोन पद्धति आहेत. एक शारीरिक खाणाखुणा म्हणजे डोक्याच्या कवटी, नाक, डोळे केस वगैरेवरून भिन्नत्व शोधणें, व दुसरी म्हणजे भाषेंतील भिन्न भिन्न घटक शोधणें होय. त्या दोनहि पद्धति पूर्ण नसून दोहोंचा एकमेकांस पडताळा बसेल तेव्हांच विशेष निर्णयात्मक मत निश्चित होतें. या दोन्ही पद्धतींनीं अनेक समाजांचें परीक्षण शास्त्रज्ञांनीं केलेलें असून प्रत्येक समाजांत कोणकोणते मूळचे भिन्न समाज एकरूप पावलेले आहेत याचा तलास लावण्याचा प्रयत्न केला आहे. या तलासांतून निघणारे निष्कर्ष सर्वसंमत होण्याइतकें हें शास्त्र अद्याप प्रौढ झालेलें नाहीं; पण ज्या घटना ऐतिहासिक कालांत घडून आल्या

त्यांविषयीं अवांतर पुरावा उपलब्ध आहे. उदाहरणार्थ, हिंदुस्थानांत आर्य आणि द्रविड या दोन समाजांचें एकीकरण झालें आहे याविषयीं हिंदु वाङ्मयांत भरपूर पुरावा आहे.

तसेंच इंग्लंडमध्यें सॅक्सन आणि नॉर्मन हे दोन समाज एकत्रित झाले आहेत याविषयीं इतिहासाचीच साक्ष आहे. इंग्लंडमध्यें हें एकीकरण कोणत्या प्रक्रियेनें साधलें गेलें? ग्रंथकार लिहितो कीं "लोक स्वभावतः परजातिसंबंधास पराङ्मुख असावयाचे. पण इंग्लंडमध्यें परजातिसंग्राहकता आणि राष्ट्रीकरण-कौशल्य यांचा विकास नॉर्मन लोकांच्या आगमनानंतर कांहीं विशिष्ट राजकीय परिस्थितीनेंच घडून आला. विल्यम दि कॉंकरर हा अगोदरच नॉर्मंडीच्या ड्यूकचा दासीपुत्र; तोदेखील हेरलेव्हा नांवाच्या कातडी कमावणाऱ्या कनिष्ठ कुळांतील स्त्रीपासून झालेला! त्याला नॉर्मंडीच्या शिष्ट समाजांत स्थान नव्हतें. तो इंग्लंडचा विजेता झाला. त्याच्याबरोबर बरेच साहसी लोक आले. त्या साहसी लोकांपाशीं संपत्ति नव्हती. तेव्हां विल्यमनें त्यांची आणि देशांतील जमीनदारवर्गाची म्हणजे सॅक्सन व ब्रिटन या जातींच्या जमीनदार लोकांची लग्नें लावून दिलीं. जर विल्यम हा हलक्या कुळांतील नसता तर कदाचित् कुलाभिमान आणि जेतृत्वाचा अभिमान अशीं लग्नें लावून देण्यास आडवा गेला असता. सामाजिक दृष्टया ज्यांचें स्थान हीनतेचें असतें ते लोकच विजयी होतांच मोठे सुधारक होतात असें दिसतें!" रोमन राष्ट्राचीहि हीच कथा. "रोमचें राज्य त्याच्या स्थापनेच्या प्रसंगींच चोराउटारूंचें होतें आणि त्याच्यापाशीं स्त्रिया नव्हत्या; त्यामुळें परजातीय स्त्रिया त्यांना दंगेबाजी आणि दगेबाजी करूनच मिळवाव्या लागल्या. अशा राष्ट्राच्या ठायीं परजाति-विवाहजुगुप्सा कशी उत्पन्न होणार? त्यामुळें रोमन लोकांचे हक्क इतरांस देऊन आपल्या जातींत त्यांना घ्यावयाचें या प्रकारची क्रिया त्यांच्या इति-हासांत घडून आली."

ह्या दोन्ही ठिकाणीं एकीकरणाचे प्रयत्न झाले ते राजकीय सत्तेनें केलेले होतें. फ्रान्सच्या इतिहासांतहि अशा तऱ्हेच्या प्रयत्नांचें उदाहरण आहे तें कार्डिनल रिशेल्यूच्या काळांतील. त्यानें फ्रान्सची शेती व उदिमी सुधारण्या-करितां हॉलंडमधून मुद्दाम पाचारण करून कांहीं शेतकरी व इतर धंद्यांतील तज्ज्ञ आणले व त्यांची देशी कुटुंबांत सोयरीक घडवून आणून त्यांना

फ्रेंच करून घेतलें. राजकीय सत्तेनें घडवून आणलेल्या या एकीकरणाचा एक आत्यंतिक प्रयोग ग्रंथकारानें उल्लेखिला आहे. तो पोर्तुगीजांनीं दक्षिण आफ्रिका पोर्तुगीजमय करण्याविषयीं केला तो होय. पोर्तुगालनें जिंकलेल्या देशांत नेहमींप्रमाणें धर्मप्रसार तर जारी केलाच, पण विशेष काय केलें तर आफ्रिकेंतील सिद्दी लोकांशीं विवाह करून तेथें जें स्थायिक होतील त्यांना फुकट जमिनी देण्याचें जाहीर करून एक लाख पोर्तुगीज स्त्रिया आफ्रिकेंत पाठवून दिल्या व त्यांचें तेथील सिद्द्यांशीं लग्न लावून दिलें!

आतां हिंदुस्थानांत असल्या रक्तमिसळीचा प्रकार युरोपसारखाच सर्रास कां घडून आला नाहीं? तर त्याला ग्रंथकाराच्या मतें मुख्य कारण बालविवाह हें होय. 'कुमारी स्वतंत्र असत्या तर अडचणींतील कुमारींनीं लग्नाच्या बाबतींत जातीचा निर्बंध केव्हांच तोडून टाकला असता. बालविवाहाची सक्ती आपणाकडे जशी अनेक शतकें होती तशी युरोपांत नसल्यानें व्यवसायभिन्नतेमुळे जें समाजभिन्नत्व उत्पन्न होतें तें भिन्न जाती तयार करणारें झालें नाहीं. हिंदुस्थानामध्यें जुन्या जाती मोडून नव्या जाती तयार करणें व राजकारणाच्या दृष्टीनें जातीचा विचार करणें ह्या गोष्टी होऊन गेल्या आहेत. तथापि या प्रयत्नास यश फार कमी आलें याचें एक कारण बालविवाह आणि त्यामुळें वैवाहिक बाबतींत पितृगणाकडून होणारें नियमन हें होय.

एकीकरणाच्या क्रियेमध्यें राजकीय सत्तेबरोबर ज्या दुसऱ्या सत्तेनें कामगिरी बजाविली ती सत्ता म्हणजे धर्मसत्ता होय. या सत्तेमुळेंच म्हणजे ख्रिश्चन धर्माच्या प्रसारामुळेंच रशियापासून इंग्लंडपर्यंतचें सर्व युरोप खंड एकसंस्कृतींत गुंफलें गेलें. राष्ट्रीय अथवा वांशिक जाती मोडण्याच्या बाबतींतहि धर्मानें प्रयत्न केला. उदाहरणार्थ, कॅथॉलिक मनुष्यानें भलत्या राष्ट्राची मुलगी करण्यास हरकत नाहीं, फक्त मुलगी कॅथॉलिक पंथाची आहे कीं नाहीं एवढेंच पाहावें अशी कॅथॉलिक पंथाची शिकवण असे. एवंच, युरोपमध्यें एकीकरणाचा प्रयत्न झाला तो राजकीय व धार्मिक अशा दोन्ही सत्तेच्या जोरावर झाला.

भारतीयांनीं हा प्रश्न सोडविला तो अगदीं निराळ्याच पद्धतीनें. म्हणजे राजकीय एकीकरणाच्या दृष्टीनें नव्हे किंवा धार्मिक एकीकरणाच्या दृष्टीनेंहि नव्हे; तर सांस्कृतिक एकीकरणाच्या दृष्टीनें. भरतखंड हें एक मोठें खंडच

होय. तें एका राजसत्तेखालीं केव्हांच नव्हतें. आणि एकाच धर्माचा अंमलहि कधीं जारी नव्हता. शेंकडों लहानमोठीं संस्थानें आणि राज्यें हिंदुस्थानांत एकमेकांशेजारीं असत. त्यांच्यामध्यें अधिराज्याबद्दल नेहमीं कटकटी चालू असत. पण एकाचें अधिराज्य जाऊन दुसऱ्याचें आलें तरी सामान्य जनतेच्या आयुष्यक्रमांत कांहींच फरक पडत नसे. निरनिराळे धर्महि एकमेकांशेजारीं गुण्यागोविंदानें नांदत. वैदिक, बौद्ध, जैन, शाक्त वगैरे पंथांपैकीं कोणत्याहि पंथाचा राजा असला तरी तो इतर पंथीयांचाहि योगक्षेम चालवी व त्यांना योग्य तो मान देई. अशा रीतीनें राजकीय सत्ता भिन्नभिन्न, धर्मपंथ भिन्नभिन्न, भाषा भिन्नभिन्न असें असतांहि सर्व भरतखंडाची म्हणून एक स्वतंत्र अशी संस्कृति आहे, अशा प्रकारची भावना मात्र यशस्वी रीतीनें उत्पन्न करण्यांत आली होती.

हिंदुस्थानांत व्यापारनिमित्ताने आणि दिग्विजयाच्या निमित्तानें अनेक परकीय आले व ते तेथील जनतेंत मिसळून गेले. त्या सर्वांचीं एकसमाजाचे घटक म्हणून व्यवस्था लावणें हा भारतीय समाजशास्त्रज्ञांपुढें मुख्य प्रश्न होता. आजच्या हिंदु जनतेंत कोणकोणतीं रक्तें सापडतात याविषयीं ग्रंथकारानें कीनचें पंचवीस वर्षांपूर्वीचें मत दिलें आहे, कीं निग्रिटो किंवा कृष्ण-वामनाचे कोलेरियन, द्राविडी, आर्यन आणि मंगलेरियन अशीं पांच वंशांचीं रक्तें येथें सापडतात. यांपैकीं कोलेरियन आणि निग्रिटो यांच्या रक्ताविषयीं कीनचें मत खानेसुमारीच्या अधिकाऱ्यांना मान्य झालेलें नाहीं, येवढेंच ग्रंथकारानें नमूद केलें आहे. तूर्त आपणास येवढेंच पहावयाचें आहे कीं, या निरानिराळ्या वंशांचें एकीकरण प्राचीन शास्त्रकारांनीं कसें केलें.

या एकीकरणक्रियेंतील कांही महत्त्वाच्या बाबी ग्रंथकारानें उल्लेखिल्या आहेत त्या पुढीलप्रमाणें :—जिंकणाऱ्या राजानें जिताच्या आचार्यास आपला आचार्य बनविणें. ही पद्धत वैदिक कालांतील दिवोदास राजानें अमलांत आणली. या वैदिक कालांतच आर्य आणि अनार्य यांच्या संस्कृतींच्या एकीकरणास प्रारंभ झाला. ऋग्वेदांत लिंगपूजकांचा शिश्नदेव म्हणून उपहास आहे; तर यजुर्वेदांत पार्वती, षडानन, गणपति यांसहित शिवदैवताचा स्वीकार करण्यांत आला आहे. तसेंच यज्ञसंस्थेंत प्राचीन वीरकथांना स्थान देऊन देशांच्या प्राचीन वाङ्मयाचा स्वीकार करण्यांत आला. एकीकरणाचा आणखी एक प्रकार व्रात्यस्तोम विधि हा होय. हा विधि मगधांत उत्पन्न झाला

असावा. यजुर्वेदाच्या पुरुषमेधामध्यें मगधांतील लोकांना उभें जाळावें असा आदेश आहे तर अथर्ववेदांतील सूक्तें सांगतात कीं, मगधांतील व्रात्यांचा स्वीकार करावा, कारण तेहि ब्राह्मण आहेत. व्रात्यस्तोमविधींतील एक महत्त्वाची बाब म्हणजे हा विधि मोठ्या प्रमाणांत करीत ही होय. म्हणजे कुटुंबेंचीं कुटुंबें या विधीनें पुनीत करून घेत. यामुळें लग्नादि व्यवहाराला अडचण भासत नसे. एकीकरणाची आणखी एक दिशा म्हणजे निरनिराळ्या जातींच्या उत्पत्ती-विषयीं काल्पनिक इतिहास तयार करून, सर्व जातींना एका सूत्रांत ओवणें ही होय. आंध्रादिकादि जाती या प्रकारें विश्वामित्रपुत्र मधुछंद याची प्रजा होय असें वर्णन केलेलें आहे. निरनिराळ्या शाखांतील पुरोहितांचें एकीकरण हीहि एक महत्त्वाची बाब वैदिक कालींच साध्य केली गेली. लहानसहान याग बंद पाडून मोठमोठीं सत्रें सुरू करण्यांत आलीं व त्यांत चारी वेदांच्या आचार्यांचा समावेश करण्यांत आला. तसेंच पूर्वीचा याजक आर्य आणि अयाजक अनार्य हा भेदहि नष्ट करण्यांत आला, आणि याजकांचा म्हणजे ब्राह्मणांचा एक खास वर्ग तयार झाला व पूर्वींचें याजक व अयाजक हें द्वैत जाऊन समाजाची चातुर्वर्ण्यात्मक मांडणी सुरू झाली.

ह्या सर्व क्रियांचा पुढाकार ब्राह्मणवर्गाकडे होता. ते जेथें जात तेथील राजांना क्षत्रिय करून घेत. ही प्रथा हिंदुस्थानच्या बाहेर थेट इंडोचायनापर्यंत त्यांनीं नेऊन भिडविली. राष्ट्रास एकरूप देण्याचे बाबतींत ब्राह्मणांची कामगिरी अव्वल दर्जाची होय. हिंदुस्थानांत आर्यन, मंगोलियन, द्राविड वगैरे अनेक रक्तांचे लोक आहेत. या सर्व भिन्न लोकांना एका परंपरेस चिकटविणें ही कामगिरी लहानसहान नाहीं. लोकांच्या वन्य देवतांचें शिवविष्णूशीं ऐक्य स्थापणें, त्यांच्या पूजाअर्चांस पौराणिक वळण देणें, देशांतील अनेक भाग अपवित्र होते तेथें तीर्थें निर्माण करणें वगैरे प्रयत्नांनीं समाजघटनेबाबत ब्राह्मणांनीं फार मोठी कामगिरी बजावली आहे असें ग्रंथकारानें कंठरवानें प्रतिपादलें आहे.

या समाजघटनेंतील कांहीं बाबी आज समाज-सुधारकांच्या टीकेचा विषय होऊन राहिल्या आहेत. पैकीं जातिसंस्था व जातिनिष्ठ चळवळ ही एक महत्त्वाची बाब होय. सध्यां सर्व लहानथोर जातींत संघटनात्मक चळवळ सुरू आहे. ग्रंथकाराच्या मतें ती रास्तहि आहे. म्हणजे सर्व हिंदी समाज

एकजिनसी जेव्हां होईल तेव्हां होवो, तोंपर्यंत ज्या त्या जातीनें आपआपल्या जातीच्या कल्याणाची काळजी वाहणें हें उच्चतर ऐक्याला विघातक नसून एकंदर समाजाच्या हिताचेंच आहे. आपल्या जातीचें कल्याण साधण्यांत इतर जातींचें अकल्याण करण्याची किंवा त्यांच्या हितसंबंधांवर आक्रमण करण्याचा उद्देश नसला म्हणजे जातिनिष्ठ चळवळींत वावगें असें कांहीं नाहीं. ज्या समाजांत जाती नाहींत तेथेंहि लहानमोठे गट असतातच आणि त्या त्या गटांच्या हितरक्षणाच्या चळवळी चालू असतातच. या गटांतील व्यक्तीला आपल्या कांहीं गाऱ्हाण्यांची दाद लावून घ्यावयाची झाली तर त्या गटाकडूनच ती प्रथम मिळूं शकते.

उदाहरणार्थ, बेकारीचा प्रश्न घ्या. हा प्रश्न सोडविण्यास सरकारला जोंपर्यंत आपणांस भाग पाडतां येत नाहीं तोंपर्यंत जातीजातींनीं तो आपआपल्यापुरता सोडविण्याचा प्रयत्न करणें हें एकंदर समाजघटनेच्या विरुद्ध तर नव्हेच पण उलट पोषकच होय. ग्रंथकार लिहितो, " जातिभेद मोडण्यास अवधि लागणार तोंपर्यंत संघटना उपेक्षावयाची कीं काय ? नुसता जातिभेद मोडला म्हणजे समाज संघटित होतो असें नव्हे. उलट संघटना अधिकाधिक झाली म्हणजेच जातिभेदाची तीव्रता कमी होईल. एवढेंच नव्हे तर संघटना ही जातिभेद मोडण्यासहि कारण होईल; यासाठीं समाजसंघटना हें हिंदूंचें सामाजिकदृष्ट्या आद्य कर्तव्य होय." तात्पर्य, ग्रंथकाराच्या मतें जाति जोंपर्यंत सुसंघटित व कार्यक्षम अशी असते तोंवर जाति-संस्था ही ऐक्यविघातक आहे असें म्हणतां येणार नाहीं.

## जातिपरत्वें भिन्न नियम

पूर्वीच्या समाजशास्त्रकारांवर दुसरा एक आक्षेप घेतला जातो तो हा कीं, त्यांनीं समाजाच्या सर्व घटकांना एकच धर्म अथवा नियम लागू न करतां जातिपरत्वें वेगवेगळे नियम सांगितले आहेत. कांहीं गुन्ह्यांबद्दल वरिष्ठ वर्गांना कडक शिक्षा सांगितलेली आहे तर दुसऱ्या कांहींबद्दल कनिष्ठांना कडक शिक्षा सांगितलेली आहे. तात्त्विक समतेच्या दृष्टीनें हा प्रकार दिसतांना गैर दिसतो पण भिन्नभिन्न परिस्थिति आणि संस्कार यांनीं बद्ध असलेल्या समाजघटकाकरितां कायदेकानू करावयाचे तर सर्वांना एकाच कडक शिस्तींत न ओवतां कायदा लवचिक ठेवणें हीच खरी समाज-

हितकारक दृष्टि होय असें सूक्ष्म विचारांतीं दिसून येईल. ग्रंथकार लिहितो, " सर्व लोकांस सारखाच कायदा लागू करणें म्हणजे शक्याशक्यतेचा विचार सोडून देणें होय. उदाहरणार्थ, वणिग्वर्गास माल नेण्याकरितां व त्यांचा क्रय-विक्रय करण्याकरितां दूरवर जावें लागतें. त्यामुळें ब्राह्मण आणि मुत्सद्दी वर्ग यांच्यामध्यें असणाऱ्या नीति-कल्पनांची अपेक्षा त्यांच्यामध्यें करणें योग्य होणार नाहीं. जो वर्ग आपल्या घरांत सुखानें राहतो त्याच्या घरांतील कुटुंब-व्यवस्थेचे नियम, हे व्यापार, खलाशीपणा यांसारख्या उद्यमांत गुंतलेल्या लोकांच्याकडून पाळले जाणार नाहींत आणि त्यामुळें ब्राह्मणादि जातींस कठोर नियम; तर वैश्यशूद्रांस अधिक स्वातंत्र्याचे नियम लावणें योग्य होईल. ख्रिस्ती धर्मानें हा विवेक राखला नाहीं. सर्वांना एकच कडक शिस्त उपदेशिली. त्याची प्रतिक्रिया रशियातील आजच्या शूद्र सत्तेंत दिसून येत आहे. पण स्त्री-पुरुष-संबंध अनियंत्रित व्हावे हें रशियाचें मत निव्वळ प्रतिक्रिया रूप असल्यानें टिकणारें नाहीं. कौटुंबिक स्वास्थ्य व स्त्री-पुरुषसंबंधसातत्य या गोष्टी अपत्य-संगोपनास अवश्य आहेत. यामुळें रशिया किंवा दुसरा कोणताहि देश स्त्री-पुरुषसंबंधाच्या परंपरागत आलेल्या नियमाविरुद्ध बंड करूं लागला तर तें बंड फार दिवस टिकावयाचें नाहीं. शिक्षकवर्गाचे सामाजिक नियम सर्व जनते-वर लादण्याविरुद्ध जें समाजाचें बंड झालें तें रशियन प्रयत्नांत आज दृश्य होत आहे. कालांतरानें सर्व युरोपांत स्थिरस्थावर होईल आणि भिन्न वर्गास भिन्न धर्मशास्त्र या ब्राह्मणी तत्त्वाचा स्वीकार युरोपांतहि होईल."

## संततिनियमन हा आपद्धर्म

स्त्री-पुरुषस्वातंत्र्याशीं कांहींसा संलग्न असलेला विषय म्हणजे संततिनियमन होय. समाजसुधारणेच्या कार्यक्रमांत संततिनियमनाच्या शिक्षणासहि अलीकडे स्थान मिळूं लागलें आहे. पण संततिनियमन हा एक केवळ आपद्धर्म होय. संततीस पोटभर खावयास देतां येत नसेल, किंवा शरीरस्वास्थ्यास अपाय होत असेल, किंवा रोगट वंश नष्ट करावयाचा असेल तर अशा ठिकाणींच संतति-नियमन हें आपद्धर्म म्हणून स्वीकारावयाचें आहे. पैकीं दारिद्र्यावर खरा उपाय संततिनियमन हा नसून दारिद्र्य नष्ट करणें हाच होय. बरें जाति-सुधारणेच्या दृष्टीनें संतनिनियमनाचा उपाय अमलांत आणला जातो म्हणावें

तर तसेंहि नाहीं. कारण ज्या वर्गाला संततिनियमनाची जरूरी नाहीं म्हणजे ज्यांची प्रजा वस्तुतः वाढावयासच पाहिजे आहे त्या बुद्धिमान मध्यम वर्गांतच संततिनियमनाचा फैलाव होत आहे. अर्थात् आजच्या संततिनियमनाचा सर्वच प्रकार अशास्त्रीय व भलत्याच दिशेनें चाललेला आहे. यासंबंधीं ग्रंथकार लिहितो कीं, "संततिनियमनाच्या विचारानें मध्यम वर्ग काय तो मारला जाणार व तो मारून टाकणें तर समाजास अहितकारक आहे. तेव्हां संततिनियमनाच्या तत्त्वांचा प्रसार करणें हें राष्ट्रीय पुढाऱ्यांचें कर्तव्य नाहीं; तर संततिनियमनाच्या तत्त्वास कारणीभूत होणारी सांपत्तिक अनिष्ट स्थिति दूर करणें हें त्यांचें खरें कर्तव्य आहे."

चातुर्वर्ण्य, दानधर्म वगैरे आपल्या प्राचीन समाजशास्त्रांतील कल्पनाहि एकंदरीनें उपयुक्त आहेत, असें ग्रंथकाराचें मत आहे. चातुर्वर्ण्य हें तर एक जागतिक तत्त्व आहे; व श्रमविभागाच्या तत्त्वावर तें अधिष्ठित आहे. लेखक म्हणतो कीं, "श्रमविभागाच्या दृष्टीनें नियुक्त कर्म करावें आणि त्याशिवाय दान करावें हेंच प्रत्येकाचें कर्तव्य होय. ही जी मांडणी प्राचीनांनीं केली तीच खरी असें प्रस्तुत लेखकाचें मत आहे." दानाची आणि धार्मिक भावनेची जी सांगड घालण्यात आली आहे तीहि ग्रंथकाराच्या मतें ढासळूं देऊं नये; कारण धार्मिक भावनेशिवाय दानाचा ओघ सारखा टिकणार नाहीं व सार्वजनिक कार्याला जरूर तो पैसा मिळणार नाहीं.

## केतकरांची भूमिका

ग्रंथकाराच्या मताची ही जी मांडणी येथवर केली त्यावरून भारतीय समाजशास्त्राकडे पाहण्याची ग्रंथकाराची दृष्टि वाचकाच्या ध्यानीं येईल. भिन्नभिन्न मानवी समूहांना एका संस्कृतिसूत्रांत ओवण्याकरितां भारतीय समाजशास्त्रकारांनीं ज्या युक्त्या योजिल्या, चातुर्वर्ण्याचें व नियुक्तकर्म करण्याचें जें तत्त्व प्रतिपादिलें, भिन्न जातींना भिन्न धर्म लागू करावा अशी जी मांडणी केली व दानाचें जें महत्त्व गायिलें त्या सर्वांची उपयुक्तता ग्रंथकारानें दाखविली आहे. तसेंच आजमितीसहि जातिसंस्थेचा समाजाचा संघटित एक गट या दृष्टीनें उपयोग करून घेतां येईल व जातिविशिष्ट चळवळ ही एकंदर समाजाच्या संघटनेस मदतच करील असें प्रतिपादिलें आहे.

या प्रतिपादनावरून ग्रंथकार डॉ. केतकर हे समाजसुधारकाच्या गटातून निघून सनातन्यांच्या गटांत केव्हांपासून सामील झाले असा प्रश्न वाचकांच्या मनीं येईल तर त्यावर मात्र एकदमच सांगून टाकतों कीं, तसा प्रकार कांहींच झालेला नाहीं. चातुर्वर्ण्य, जातिभेद वगैरेंचें वर जें समर्थन ग्रंथकारानें केलें आहे तें या संस्थांची ऐतिहासिक उपयुक्तता व तत्कालीन अपरिहार्यता यांना अनुलक्षून केलेलें आहे.

या संस्था आज ज्या स्वरूपांत स्थिर झाल्या आहेत तें स्वरूप ग्रंथकारास मान्य आहे असें मुळींच नाहीं. जातिसंस्थेचें आजचें मुख्य लक्षण म्हणजे ती जन्मावर अधिष्ठित असून तिच्यांत नवीन व्यक्तीचा समावेश करण्याची किंवा अनिष्टाची हकालपट्टी करण्याची लवचिकता बिलकूल उरलेली नाहीं. ही स्थिति ग्रंथकारास बिलकूल मान्य नाहीं.

चातुर्वण्याचेंहि असेंच आहे. नियुक्तकर्म केलेंच पाहिजे ही प्राचीन विचारसरणीच खरी होय असें ग्रंथकारानें म्हटलें तरी त्यावर ग्रंथकाराचें भाष्य असें आहे कीं, नियुक्त याचा अर्थ मात्र जन्मानें नियुक्त असा न करतां समाजानें नियुक्त असा करावा! तीच गोष्ट गोत्र संस्थेची. पूर्वपरंपरेची आठवण म्हणून गोत्रसंस्था कायम ठेवण्यास हरकत नाहीं, पण गोत्राची व विवाहनिषेधाची जी सांगड घातली आहे ती टिकविण्याची आवश्यकता मुळींच नाहीं असेंहि ग्रंथकारानें सांगून टाकलें आहे! बालविवाहहि ग्रंथकारास मान्य नाहीं. स्त्रीपुरुषांचें विवाह बालपणींच उरकून टाकण्यांत आले नसते व त्यांना विवाहाबाबत अधिक स्वातंत्र्य असतें तर अडचणींत सापडलेल्या स्त्रीपुरुषांनीं जातीचीं बंधनें झुगारून दिलीं असतीं व जातींच्या एकीकरणास त्यामुळें इष्ट ती मदतच झाली असती असें प्रतिपादलें आहे.

मिश्रविवाह हा तर ग्रंथकारास मान्य आहे इतकेंच नव्हे, तर त्यानें हिंदु संस्कृतीचा विकास होईल असें त्यानें प्रतिपादिलें आहे. तो लिहितो, "हिंदु आहेत ते ब्राह्मणाचा सन्मान ठेवणारे राहिले आणि त्यांनीं अहिंदूशीं लग्नें केलीं आणि तीं हिंदु संस्कारांनीं केलीं तर ब्राह्मणगौरवाचा प्रसार अन्यधर्मीयांत देखील होईल. ब्राह्मण व युरोपियन यांचीं लग्नेंदेखील ब्राह्मणगौरवसाह्यकच होतील. या लग्नांपासून होणारा वंश हिंदु होईल व ब्राह्मणांस मानणारा होईल." तसेंच ग्रंथांत

सर्वत्र हिंदु संस्कृतीचा उल्लेख ब्राह्मणी संस्कृति असा केला असला व ब्राह्मणांचा गौरव अनेक स्थलीं गायिला असला तरी ब्राह्मणेतरांच्या चळवळीविषयीं त्याची वृत्ति सनातन्याची नसून सुधारकाचीच आहे. तो लिहितो, "कांहीं ब्राह्मणेतरांचें असें एक गाऱ्हाणें आहे कीं, संस्कार करण्याचा अधिकार ब्राह्मणासच कशाला? हें गाऱ्हाणें रास्त आहे व ब्राह्मणेतरांची इच्छा असल्यास त्यांना हें क्षेत्र खुलें करण्याचा विचार केला पाहिजे." तसेंच ग्रामजोशाची वृत्ति काढून टाकण्याचा जो कायदा झाला त्यास अनुलक्षून लिहिलें आहे कीं, "जोशाची बिदागी ऐच्छिक करून त्यास बाजूला टाकण्याचा हक्क व्यक्तीला कायद्यानें दिलाच आहे आणि माझ्या मतें ही ब्राह्मणेतरांची हिंदुसंघटनेसाठीं अत्यंत विघातक कामगिरी झाली आहे." यावरून ग्रंथकाराची सुधारकी वृत्ति लक्षांत येईल.

## सुधारक वर्गावर ताशेरे

मग ग्रंथकारानें आपल्याकडे सुधारक म्हणून जो वर्ग ओळखला जात असे त्या सुधारक वर्गावर ताशेरे झाडले आहेत, ते कां? असा प्रश्न साहजिकच सुचेल. तर ग्रंथकाराची त्यांच्याविषयीं मुख्य तक्रार अशी कीं त्यांची समाज-सुधारणेची चळवळ स्वयंप्रेरितहि नव्हती व समाजशास्त्राच्या अभ्यासावरहि अधिष्ठित झालेली नव्हती. तर पाश्चात्यांपेक्षां आपण ज्या ज्या बाबतींत भिन्न असूं त्या त्या बाबतींत मागासलेले आहों अशा चुकीच्या समजुतीवर आधारलेली होती. पण ग्रंथकाराच्या मतें समाजसंघटनेच्या बाबतींत आपणाला पाश्चात्यांपासून फारसें शिकावयाचें नाहीं. दुसरी तक्रार अशी कीं ब्राह्मण वर्ग हा लबाड हें जें राज्यकर्त्यांनीं स्वतःचें महत्त्व वाढावें म्हणून आम्हांस शिकविलें तें आम्ही निर्भेळ सत्य मानून चाललों व प्रत्येक दोषाचें खापर ब्राह्मण वर्गाच्या माथीं मारून समाजांत फूट पाडण्यास कारणीभूत झालों. याला कारण काय तर स्वतःच्या समाजाच्या इतिहासाचें अक्षम्य अज्ञान हें होय!

अर्थात् समाजसुधारणा करावयाची ती भोळसट भावनेनें प्रेरित होऊन न करतां पूर्वपरंपरेचा अभ्यास व समाजाच्या प्रत्यक्ष चालू गरजा या दोहोंवर दृष्टि ठेवून केली पाहिजे. या दृष्टीनें मागच्या पिढीच्या सुधारकांस ग्रंथकारानें दोष लावला आहे. पूर्वपरंपरेच्या इतिहासाचें परिशीलन केलें म्हणजे ब्राह्मणांचे

दोष जसे नजरेस येतात तशी त्यांची समाजसंघटनात्मक कामगिरीहि ध्यानीं येते. या कामगिरीविषयीं ब्राह्मणांची ग्रंथकर्त्यांनें स्पष्टपणें अनेक ठिकाणी स्तुति केली आहे. राजसत्तेचें पाठबळ पाठीशीं नसतांहि केवळ बुद्धिमत्तेच्या, सहिष्णुतेच्या व संग्राहकतेच्या बळावर अनेक धर्मपंथातील विधींची व आचारांची सांगड घालून, आर्थिक हितविरोधाला मुरड घालून, तेहतीस कोटि प्रजेला एका संस्कृतिसूत्रांत ओवण्याची जी क्रिया ब्राह्मणांनीं केली ती जगांत या दृष्टीनें अपूर्व होय असें केतकरांचे प्राचीन वाङ्मयाच्या परिशीलनानें बनलेलें मत आहे.

---

— ५ —

# समाजशास्त्रांतील विवेकवाद



मन्वन्तराचा जुना पुराणोक्त अर्थ कांहीं असो, इंग्रजी अंमल सुरू झाल्यापासून आणि पौर्वात्य व पाश्चिमात्य संस्कृतीच्या अहर्निश गांठी-भेटी होऊं लागल्यापासून आपल्या देशांत एक नवें मन्वंतर अवतीर्ण होऊं घातलें आहे हें खचित. ज्या ज्या काळीं समाजाच्या घटनेंत, ध्येयांत, शासननियमांत कालांतरानें सांचत आलेल्या दोषांची जाणीव उदय पावते, ज्या ज्या काळीं आपणाहून स्वरूपतः भिन्न असणाऱ्या व पूर्वी अपरिचित असलेल्या समाजाची ओळख झाल्यानें सामाजिक प्रश्नाचें ज्ञान विस्तृत होऊन तें उकलण्याची नवी दृष्टि प्राप्त होते, व ज्या ज्या काळीं समाज-संघटनेविषयीं नवीन तत्त्वज्ञान आस्तित्वांत येऊं पाहतें त्या त्या काळाला मन्वंतर हें नांव सार्थ होय. या अर्थी गेल्या पन्नास-पाऊणशें वर्षांचा काल हा चालू नवीन मन्वंतराचा प्रभातकाल होय असें मानण्यास हरकत नाहीं.

प्राचीन दंतकथांच्या धूसर धुक्यांत दडलेला काल सोडून दिला तर इतिहासाच्या स्वच्छ प्रकाशांतील कालांत तीन मन्वंतरें नजरेस येतात. पहिलें गौतमबुद्धाच्या पावलांवर पाऊल टाकून आलेलें. दुसरें महंमदी समशेरीच्या खणखणाटांतून अवतीर्ण झालेलें. तिसरें पाश्चात्य चिकित्साप्रधान संस्कृतीनें पश्चिमेकडे वाढविलेलें व पूर्वेच्या उमाळ्यावर नुकतेंच उदयास येऊं पाहत असलेलें चालू मन्वंतर. प्रत्येक मन्वंतराच्या सुरुवातीस जुन्या विचारसरणीला, चालीरीतींना, कायदे-कानूंना धरणीकंप झाल्याप्रमाणें एकामागून एक धक्के बसतात. या धक्क्यांबरोबर कांहीं चालीरीती निष्प्राण, निर्वीर्य व निरुपयोगी होतात. कांहीं आचार-विचारांची पडझड होते. धरणीकंपानें नवीन अस्तित्वांत येणाऱ्या प्रदेशाप्रमाणें जुन्या चालीरीतींच्या समुद्रांतून नवीन चालीरीतींचीं बेटें डोकावूं लागतात व धरणीकंपाशीं सहोदरत्वाच्या नात्यानें जन्मास

येणाऱ्या मन्वंतरकालीन समाज-कलहरूपी ज्वालामुखीच्या तप्त रसाखालीं कांहीं सुंदर व सार्थ आचारविचार गाडले जातात.

बुद्धकालीन मन्वंतराच्या वेळीं नवविचारांचें असें विलक्षण वावटळ सुटलें कीं, त्यानें लांबवर पाळेंमुळें गेलेल्या यज्ञसंस्थेचा अश्वत्थ वृक्ष संपूर्ण खिळखिळा झाला. यज्ञमंडपाचीं पाळें उडून जाऊन यूप मोडून पडले व स्थंडिलावरून उडालेल्या विभूतीनें माखल्यामुळें अंगाला राख फासून संन्यस्त होण्याची वृत्ति जनतेंत बळावली.

महंमदी मन्वंतराच्या वेळींहि राष्ट्राला जबरदस्त धक्के बसले, लाखों प्रजा जबरदस्तीनें व फसगतीनें धर्मांतराला बळी पडली आणि वेष व भाषा बहुतांशीं परकी बनली. पण महंमदी वीरांची भिस्त शास्त्रापेक्षां शस्त्रावर अधिक असल्यानें समाजघटनेंत किंवा सामाजिक तत्त्वज्ञानांत मात्र फारसा फरक झाला नाहीं. धार्मिक तत्त्वज्ञानांत फरक झाला तो येवढाच कीं, बुद्धधर्माच्या शिकवणीनें आधींच निवृत्तिपर झालेला समाज मुसलमानांच्या जबर माऱ्यानें पूर्ण निवृत्तिपर किंबहुना हताश होण्याच्या पंथाला लागला.

## मन्वंतराचा उदय

आतां वरील दोन्हीहून विलक्षण असें नवीन मन्वंतर उदय पावलें आहे. त्याच्या उदयाबरोबर जे विचारांचे उल्कापात होऊं लागले आहेत, पूर्वपरंपराविषयक श्रद्धेची जी वृष्टि अनावृष्टि होऊं लागली आहे, जीवित-ध्येयाबाबत वादविवादाचे जे प्रभंजन सुटूं लागले आहेत त्यांवरून भविष्य वर्तवितां हा ग्रह बलिष्ठ असून त्याच्या दशेंत, समाजाच्या घटनेंत, आचार-विचारांत, कायदे-कानूंत महत्त्वाचे फरक घडून येणार अशीं चिन्हें सर्वत्र दिसत आहेत. आचारांना अथवा चालीरीतींना नवे धुमारे फुटण्यास नव्या विचारांचें नवपर्जन्यजल मिळावें लागतें. कांहीं कांहीं खांचरांत परिस्थितीच्या दाबानें अपक्व विचाराचे वळवी पाऊस पडून जुन्या चालीरीतींतून नवीन कोंब आजच डोकावूं लागले आहेत. पण अद्याप नवविचारमेघांचा गडगडाटच फार ऐकूं येत आहे. शांत जलस्वरूपी हिंदी संस्कृति व जयिष्णु ज्योतिःस्वरूपी युरोपियन संस्कृति यांच्या संमिश्रणानें बौद्धिक नभोमंडळांत नवविचार-मेघांची गर्दी उसळली आहे. सुभाषितकारानें म्हटल्या-

प्रमाणें योग्य काल आला असतां हे वारिधर पडल्याशिवाय राहणार नाहींत. लवकरच हा काल प्राप्त होऊन नवीन विचार सरांस कृतींत येण्याचा पर्जन्य-मोसम सुरू होईल. अशा वेळीं आपल्या समाजक्षेत्राचें परीक्षण करून त्यांत कोणतें पीक येऊं शकेल, कोणत्या पिकानें जमिनीची नासाडी होईल, कोणतें बीं रुजणारच नाहीं याची माहिती करून घेणें आवश्यक आहे.

## दप्तरींचें धर्मरहस्य

या धोरणाचें निदर्शक असें समाजघटनेचें व ध्येयाचें अथवा व्यापक शब्दांत बोलावयाचें असल्यास धर्माचें निरीक्षण-परीक्षण करणारे ग्रंथ गेल्या पन्नास वर्षांत निर्माण होत आहेत; व आगरकर, चिपळूणकर, गोळे, लोकहितवादी, केळकर, केतकर, भाटे, माटे, दिवेकर यांचे स्फुट निबंध, टिळकांचें गीतारहस्य, भटांचा महाराष्ट्रधर्म, गोविंदसुतांचें आधिभौतिक सुधारणा व आध्यात्मिक धारणा संतोजीमहाराजांचे प्रोत्साहनानें निर्माण झालेला सनातन-धर्मप्रदीप वगैरे ग्रंथ हे समाजाच्या आचार-विचारांत म्हणजेच धर्मांत होऊं घातलेली क्रान्ति कोणत्या स्वरूपाची होईल व कोणत्या स्वरूपाची व्हावी ह्याच्याच ऊहापोहाला वाहिलेले आहेत. या ग्रंथमालिकेंत नाशिकच्या संस्कृत विद्यापीठाचे आचार्य व महाभारतीय युद्धकालनिर्णय, वैदिक कालगणनापद्धति, चिकित्सा, परीक्षण, करणकल्पलता वगैरे ग्रंथांचे कर्ते श्रीयुत दप्तरी यांनीं **'धर्मरहस्य-विचार'** या ग्रंथानें चांगली भर टाकली आहे.

ग्रंथांतील प्रमाणविचार या अध्यायांत ग्रंथकाराला जुन्या रूढ समजुतींशीं चांगला सामना करावा लागला आहे. उपनिषदें व गीता यांचा अर्थ लावण्याच्या अधिकारित्वाचा मान ज्याप्रमाणें सूत्रकार बादरायण व भाष्यकार शंकराचार्य वगैरे यांच्याकडे जातो त्याप्रमाणें संहिता व ब्राह्मण या ग्रंथांचा अर्थ लावण्याचा, विशेषतः चोदनालक्षण धर्माच्यापुरता अर्थ लावण्याचा मान, सूत्रकार जैमिनी व भाष्यकार शबरस्वामी यांच्याकडे येतो. पैकीं गीतेचा शंकराचार्यांनीं काढलेला मथितार्थ वाजवी आहे कीं तत्कालीन निवृत्तिप्रवण परिस्थितीला जुळेलसा ओढून-ताणून बसविलेला आहे ह्या वादग्रस्त व रूढ समजुतीला बोचक अशा प्रश्नांचा ऊहापोह गीतारहस्यकारांनीं केला तर धर्मरहस्यकारांनीं जैमिनीच्या सूत्रांचा शबरस्वामीनें लाविलेला अर्थ हा पुष्कळ ठिकाणीं

पूर्वापर संदर्भास सोडून अतएव अग्राह्य आहे, व वेद हे अपौरुषेय होत या समजुतीला उपबृंहक म्हणून योजिलेले युक्तिवाद पोचट व भ्रामक आहेत अशा मताचा ऊहापोह केला आहे.

## सूत्रग्रंथाचा अर्थ

पूर्वीच्या सूत्रग्रंथाचा अर्थ लावणें हें करपुतळींत पाहून भविष्य वर्तविणें किंवा पाहणाऱ्याच्या दृष्टिकोनाप्रमाणें भिन्न स्वरूप धारण करणाऱ्या मेघाचा आकार ठरविणें यासारखेंच कांहींसें अनिश्चित स्वरूपाचें आहे. मागें मुंबईस भरलेल्या प्रदर्शनांत तांदुळाचे सूक्ष्म दाण्यावर कोरलेली एक मुरलीधराची मूर्ति ठेवलेली असून ती सूक्ष्मदर्शक यंत्राचे साहाय्यानें पाहावी लागते असें वर्णन आलें होतें. पूर्वीच्या सूत्रकारांचीहि महत्त्वाकांक्षा आपला सर्व ग्रंथ तांदुळाच्या सूक्ष्म दाण्यावर कोरून मावला जावा अशीच असावी! एका पदाचा वा पदाक्षरांचा संक्षेप करतां आल्यास पुत्रजन्मतुल्य आनंदानें नाचणाऱ्या सूत्रकारांनीं संक्षेपाच्या चरख्यावर इतकें तलम सूत काढलें आहे कीं, असल्या सुताचें वर्णन करतांना सातआठ कपडे एकावर एक चढविले तरी लज्जारक्षण होऊं नये असें जसें अतिशयोक्तीनें वर्णन करावें तद्वत् मूळ सूत्रांत अनेक बाह्य शब्दांची भर घालूनहि मूळ अर्थाचें लक्षण करणें अवघड जाते. अशा स्थितींत शबरस्वामींना उमगणारा अर्थ खरा, कीं दतरी यांना वाटणारा अर्थ खरा हें त्या प्रकारच्या वाङ्मयांत निरंतर अवगाहन करणाराशिवाय इतरांना आकलन होणें दुर्घट. पण हा शास्त्रीय मुद्दा सोडून दिला तर जुन्या ग्रंथांचा स्वतंत्र दृष्टीनें नवा अर्थ बसविण्यांत त्यांच्या बुद्धीची कुशाग्रता दिसून येते. प्राचीन ऋषि व आचार्यांप्रमाणें अर्वाचीन कालाच्या विद्वत्श्रेष्ठांना व समाजनेत्यांनाहि धर्मग्रंथांचा अर्थ लावण्याचा अधिकार आहे हें मत सक्रिय प्रतिपादण्यांत जें धैर्य दाखविलें गेलें आहे त्याबद्दल ग्रंथकारांचें अभिनंदन करणें वाजवी होय.

या 'प्रमाणविचार' अध्यायांतल्याप्रमाणें अन्यत्रहि ग्रंथकर्त्याचें विवेचन उद्बोधक आहे. धर्माच्या प्रांतांत शिरलें कीं, धर्माचे प्रमाणग्रंथ श्रुतिस्मृति व त्यांचे प्रणेते ऋषि यांच्याविषयींच्या अवास्तव आदरानें धार्मिक प्रश्नाभोंवतीं एक प्रकारचें गूढ तेजोवलय उत्पन्न होतें व त्याच्या प्रकाशानें

दिपल्यानें स्थिर दृष्टीनें त्यांच्याकडे पाहणें अशक्य होऊन बसतें. चिकित्सा-दृष्टीवरील हें पटल नाहीसें करण्याच्या हेतूनें ग्रंथकारानें इंद्र व मन्वन्तरकालीन शास्त्रप्रणेते सप्तर्षि हे कोण याचा खुलासा केला आहे. "आतां देव म्हणजे कोण? मला वाटतें, देव म्हणजे इंद्र; म्हणजे त्या त्या वेळचा आर्यभूमींतील अत्यंत बलवान् सार्वभौम किंवा चक्रवर्ति मानला गेलेला राजा असावा. इंद्र हा शब्द इंद्र म्हणजे बलवान् असणें या धातूवरून निघाला आहे. यावरून असें वाटतें कीं, अत्यंत बलवान् अर्थात् सार्वभौम राजा हाच इंद्र होय व यालाच येथें देव म्हटलें आहे. वायुपुराणांत तर ब्रह्मदेव सप्तर्षींची नेमणूक करी असें स्पष्ट म्हटलें आहे आणि ब्रह्मदेव तर आर्यांचा अधिपति होय हें मागें दाखविलेंच आहे. तात्पर्य, सार्वभौम राजा सप्तर्षींची नेमणूक करी व ते चोदनालक्षण धर्म निर्माण करीत."

## धर्माचा विकास

श्रुतींचें अपौरुषेयत्व अशा रीतीनें हिरावून घेतल्यावर श्रुति ह्या सनातन व अचल होत हें मत सोडून श्रुतिप्रणीत धर्मनियमांत विकास, उत्क्रांति व चलनशीलता मानणें हें ओघानेंच येतें व ग्रंथकारानें हा मुद्दा स्पष्ट शब्दांत मांडला आहे. "आणि अधिकृत असे जे संत त्यांनीं केलेले नियम ह्याच श्रुति असून श्रुतींत वेळोवेळीं बदल करणें जरूर आहे. हे बदल करणें सुरू असेल तर, किंवा शास्त्राप्रमाणें शक्य असेल तर, त्या अवस्थेला श्रुतीची प्रागतिक अवस्था म्हणूं, व बदल करणें शास्त्राप्रमाणें मना असेल तर त्याला श्रुतीची स्थिरावस्था म्हणूं. वैदिक धर्माचा विचार केल्यास असें दिसून येतें कीं, श्रुतींना स्थिरावस्था शबरानें भाष्य केलें त्याच्या बऱ्याच काळापूर्वी आली असली पाहिजे. कारण शबरानें जैमिनीय सूत्रांच्या आधारानें जें शास्त्र उत्पन्न केलें त्याप्रमाणें श्रुतीमध्यें बदलच होऊं शकत नाहीं असें चुकीचें भाष्य करणें पुरातन खरें मत लोपून बराच काळ गेल्याशिवाय शक्य नाहीं; पण श्रुतीला स्थिरावस्था प्राप्त झाली म्हणून राष्ट्र कांहीं स्थिर राहूं शकत नाहीं. म्हणून पुढील काळांत राष्ट्राची प्रगति खुंटूं नये, म्हणून श्रुतीचें महत्त्व कमी करून आचाराचें महत्त्व वाढविण्यांत आलें. 'व्यवहारो बलवान् धर्मस्तेनावहीयते' या नारद-स्मृतींतील वचनात याचा पुरावा पाहावयास मिळतो."

धर्माचीं जीं दोन अंगें प्रवृत्ति व निवृत्ति त्या दोहोंत विरोध उत्पन्न झाला असतां कोणतें अधिक प्रभावी समजावें याविषयीं रामदासांनीं 'प्रपंच सोडुनी परामार्थ केला। तरि अन्न न मिळे खायाला। मग तया करंट्याला। परमार्थ कैचा' अशा स्पष्ट वाणीनें जो निर्णय दिला आहे त्याचाच अनुवाद ग्रंथकारानें केला आहे. "निवृत्ति व प्रवृत्ति या धर्माच्या दोन अंगांत विरोध येईल तेव्हां निवृत्त्यंगापासून उत्पन्न झालेल्या कर्मांचा त्याग करावा. कारण 'अंधं तमः प्रविशन्ति येऽविद्यामुपासते । ततो भूय इव ते तमो ये विद्यायां रताः ॥' या ईशावास्योपनिषदातील वचनाप्रमाणें केवळ निवृत्तीचा स्वीकार करणारे, केवळ प्रवृत्तीचा स्वीकार करणारे जातात, त्यापेक्षां जास्त भयंकर अंधकारांत जातात. समजा कीं, एका मुलाला गुरूजवळ आत्मज्ञान शिकावयाचें आहे; परंतु उदरनिर्वाहाचें कोणतेंच साधन उपलब्ध नसल्यामुळें कांहीं धंदा करणें प्राप्त आहे, तर अशा वेळीं आधीं त्यानें धंदाच करावा. ईश्वरचिंतन हें धर्माचें निवृत्त्यंग आहे. हें करण्याचे वेळींच वृत्तीच्या साधनाचें अत्यंत आवश्यक कर्तव्य उपस्थित झालें तर हें दुसरें कर्तव्य आधीं स्वीकारलें पाहिजे."

धर्माचें निवृत्त्यंग फाजील बळावणें हें राष्ट्राच्या प्रस्तुत अवनतीच्या कारणांपैकीं एक प्रमुख कारण होय. धर्माचें रहस्य आकलन न झाल्यामुळें राष्ट्राच्या हातून इतरहि अनेक प्रमाद घडत आले आहेत व त्या सर्व संचिताचा विपाक म्हणजे चालू हीनावस्था होय. 'ग्रंथकारानें आपल्या मताप्रमाणें पांचसहा प्रकारचे प्रमाद वर्णिले आहेत ते असेः— आत्मत्राणे वर्णसंकरे वा ब्राह्मणवैश्या शस्त्रमाददीयाताम्' या वसिष्ठवचनांत ब्राह्मणवैश्यांनींहि प्रसंगविशेषीं लढावें असें सांगितलेलें आहे. या पुरातन नियमाकडे दुर्लक्ष होत आलेलें आहे, ही पहिली चूक. पृथ्वीराजाचा पराभव झाला तेव्हां ब्राह्मणवैश्यांनीं कांहींच केलें नाहीं. कनोजचा राजा जयचंद वेडेचार करूं लागला त्या वेळींहि ब्राह्मण स्वस्थच बसले. दुसरी चुकी म्हणजे ब्राह्मणाच्या कर्मामध्यें अध्ययन-अध्यापनापेक्षां यजन-याजनाचें स्तोम फार वाढलें. धर्मग्रंथ जे स्मृति ते वाचणारे देखील ब्राह्मणात कोणी सापडत नाहींत. मग ब्राह्मणांनाच धर्म न समजल्यामुळें सर्वांचीच दिशाभूल होत गेली. तिसरी चुकी म्हणजे आरंभीं जे सर्व वर्णांमध्यें अन्नव्यवहार व विवाहव्यवहार होत असत ते बंद करण्यांत आले. हे व्यवहार बंद पडल्यानें भिन्न वर्णांमध्यें संघटन कमी होऊन

कोणतेंहि कार्य एकदिलानें करणें अशक्य झालें. चौथी चुकी म्हणजे वर्णांतराची व्यवस्था नाहींशी झाली. ही व्यवस्था नष्ट झाल्यानें ज्यांना जें शिक्षण मिळावयास पाहिजे तें मिळालें नाहीं. उदाहरणार्थ, मराठे जरी वास्तविक क्षत्रियच होते तरी ते धर्मदृष्टीनें क्षुद्रच मानले जात असल्यामुळें, क्षत्रियांना आवश्यक जें शिक्षण तें त्यांना मिळालें नाहीं व राष्ट्राचें नुकसान झालें. आणखी एक महत्त्वाची चूक म्हणजे वर्णांतराशिवाय वर्णांतराचीं कृत्यें लोक करूं लागल्यामुळें वर्णाचें वर्णत्व जाऊन त्याला जातित्व प्राप्त झालें व नंतर एकच धंदा करणारांत जसा मत्सर उत्पन्न व्हावा तसा होऊं लागला. उदाहरणार्थ, पेशव्यांचे वेळीं पुष्कळ ब्राह्मण वर्णांतराशिवाय क्षत्रियांचें कर्म करावयास लागले. मराठेहि क्षत्रिय कर्म करणारे पूर्वीपासून होतेच. त्यामुळें ब्राह्मण योद्धे ही जात निराळी व मराठे योद्धे ही जात निराळी होऊन मत्सर उत्पन्न झाला. पूर्वीच्या काळीं कर्म बदलतांच वर्ण बदलण्याचीहि व्यवस्था असे.

या दिग्दर्शनावरून धर्मप्रश्नाकडे पाहतांना ग्रंथकारानें कोणती दृष्टि राखली आहे याची अटकळ करतां येईल. ती दृष्टि ही कीं, एकीकडे प्राचीन ग्रंथांत शतकानुशतकांच्या अनुभवांचा विचार साठविला असल्यानें त्याचा आस्थापूर्वक अभ्यास करून आपल्या समाजाच्या प्राचीन परंपरेशीं परिचय करून घेणें, पण दुसरीकडे त्याचबरोबर ती परंपरा पुढील काळाला सर्वस्वीं बंधनकारक होय ह्या आग्रही मताचा त्याग करणें ही होय.

## धर्माचे तीन नेत्र

व्यक्ति व समाज या दोहोंना सुस्थिति प्राप्त करून देणें हें धर्माचें रहस्य होय. प्राचीन धर्मशास्त्रांचें ग्रंथ जे स्मृति त्यांत धर्माचा व्यक्ति व समाज या दोनहि अंगांनीं विचार केलेला असे. दान व प्रायश्चित्त यांचेंच तेवढें वर्णन करणाऱ्या कांहीं लघुस्मृति सोडल्या तर सर्व प्रमुख स्मृतिग्रंथांत राजशासन ऊर्फ व्यवहार, वर्णजातिशासन ऊर्फ समाज-घटनानियमन आणि श्राद्धव्रतादि पारलौकिक धर्मानुशासन हे धर्मपुरुषाचे तीन नेत्र कल्पिले आहेत. पण कालांतरानें पृथ्वीवरील समाजाच्या व्यवहारांकडे पाहणाऱ्या नेत्रांची दृष्टि मंदावली व पारलौकिक स्वर्गाकडे पाहणारा ऊर्ध्वमुख नेत्र हाच धर्मपुरुषाचा

मुख्य नेत्र अशी समजूत बळावली. स्मृतीच्या काळांत विशेषतः मुसलमानांच्या परकीय अमलाच्या प्रवाहांत व्यवहार अथवा कायदेकानू करणें व बजावणें हें धर्माचें अंग स्वकीयांच्या हातून सुटल्यानें व्यवहार आणि धर्म यांचा कांहीं अन्योन्यसंबंध असूं शकतो ही जाणीवहि नदीप्रवाहांत पायांखालून सरणाऱ्या वालुकाकणांप्रमाणें हळूहळू नष्ट होत गेली व धर्म या शब्दाचा "धारणाद्धर्ममिति आहुः" (समाजाची धारणा अथवा सुस्थिति राखणारा तो धर्म) हा व्यापक अर्थ संकोच पावत जाऊन धर्म म्हणजे व्यक्तिनिष्ठ, पारलौकिक, सुस्थिति प्रेरक पण ऐहिक समाजसुस्थितीविषयीं उदासीन आचार असा एकांगी अर्थ रूढ झाला. प्राचीन ग्रंथांत राजकारण,समाजकारण व परलोककारण हीं धर्माचीं अन्योन्यसंलग्न अशीं तीन अंगें गणलीं जात व धर्मशास्त्राचे प्रणेते त्या तीनहि अंगांचा आपल्या ग्रंथांत विचार करीत. आतां हीं तीनहि अंगें स्वतंत्र तरी मानलीं पाहिजेत वा अन्योन्याश्रित तरी मानलीं पाहिजेत. पण सध्यां स्थिति संदिग्ध झाली आहे. धर्म शब्दाच्या अर्थाचा संकोच पावत असतां राजकारणाचें एक अंग साफ बाहेर फेकलें गेलें पण दुसरें समाजकारणाचें अंग हें व्यक्तिनिष्ठ मोक्षधर्माला अर्धवट बिलगून राहिलें आहे.

## व्यापक धर्माचा संकोच

म्हणजे असें कीं, वर्णांतर, जातिभेद, अस्पृश्यता वगैरे ज्या बाबी केवळ समाजकारणाच्या होत त्या पूर्वीच्या धर्मग्रंथांत वर्णिल्या असत व पूर्वीच्या व्यापक धर्माच्या त्या अंगभूत असत, म्हणून सध्यांच्या संकुचित अर्थानें पारलौकिक मोक्षधर्माच्याहि अंगभूत मानण्यात येत आहेत. याचा परिणाम असा कीं, अस्पृश्यांशीं व्यवहार करणें किंवा निषिद्ध जातींत आपली मुलगी देणें ह्या गोष्टी समाजधर्माच्या विरुद्ध म्हणून त्याज्य समजण्यांत न येतां पारलौकिक मोक्षधर्माच्या विरुद्ध म्हणून गर्हणीय मानल्या जाऊं लागल्या आहेत. आतां 'इष्टं धर्मेण योजयेत्' या न्यायानें इष्ट असणाऱ्या सर्व गोष्टी मग त्या समाजकारणाच्या, राजकारणाच्या किंवा आरोग्यकारणाच्या असोत; सर्वच धर्माच्या चक्राशीं निगडित कराव्या म्हणजे धर्माच्या पालनाबरोबर इतर सर्व इष्ट नियमांचें पालन स्वतःसिद्धच होईल ही विचारसरणी वावगी नाहीं. पण तिच्या बजावणीचे कांहीं अनपेक्षित परिणाम कसे उद्भवतात हें पाहणें जरूर आहे.

मुख्य परिणाम असा कीं, पारलौकिक म्हणजे इंद्रियातीत अतएव तर्कानें असाध्य व केवळ आप्तवाक्यसाध्य अशा धर्माशीं इतर गोष्टींची सांगड घातली गेल्यानें पारलौकिक धर्मांतील सनातनत्व, अचलत्व व सर्वगामित्व हे लौकिक बुद्धि-गम्य व परिस्थित्यनुरूप चलनशील अशा राजच्या व्यवहारांतील गोष्टींशीं येऊन भिडले व समाजाच्या व्यवहाराला सांचलेल्या जलाशयाप्रमाणें कृत्रिम स्थिरत्व प्राप्त होऊन त्यावर अर्थशून्य चालीरीतींचें शेवाळें माजलें व जातिवैमनस्याची घाण मारूं लागली.

## परक्यांच्या लाथांचें पाप

बरें, पूर्वीच्या धर्मग्रंथांत लौकिक व पारलौकिक धर्माचरणाचा एकत्र विचार केला जात असे म्हणून आजहि सामाजिक व पारलौकिक धर्म हा अन्योन्यमिश्रित समजावयाची तर पूर्वीच्या त्रयींतील राजकारणालाहि धर्माच्या अमलांत योग्य स्थान देऊन त्याचीहि पापपुण्यात्मक कल्पनेशीं गाठ घालून द्यावयास नको काय? **अस्पृश्याला स्पर्श केला तर जर पाप लागतें तर राजकारणांत परक्यांच्या लाथा खाण्यांत पाप कां मानूं नये? जाती बुडविल्यानें पारलौकिक धर्माच्या दृष्टीनें पतित व पापी ठरणारा माणूस हा स्वातंत्र्य बुडविल्यानें पापी म्हणून मानला जाणें जरूर नाहीं काय?** जाती बुडविणाऱ्याला वाळींत टाकणें ज्या विचारसरणीनें योग्य ठरेल त्याच विचारसरणीनें राष्ट्र बुडविणाऱ्याला बहिष्कृत करणें शतपटीनें योग्य ठरूं नये काय? 'इष्टं धर्मेण योजयेत्' हें सूत्र जर सर्वांना लागूं करावयाचें तर सामाजिक गुन्ह्याप्रमाणें राजकीय गुन्ह्याचीहि पापपुण्यात्मक कल्पनांशीं सांगड घालून देणें आवश्यक नाहीं का?

तशी सांगड घातली गेली नाहीं. उघड कारण असें कीं राजधर्म, वारसा फसवेगिरी वगैरे शासनात्मक अथवा व्यवहारप्रकरणांतर्गत धर्मनियम हे कालमानानुसार बदलणें अत्यावश्यक असतें व ते बदलत आलेहि. हे नियम प्रत्येक राजवटींत बदललेले स्पष्ट दिसत म्हणून त्यांना सनातन मानण्यांत आलें नसावें. उलट सामाजिक चालीरीतींतहि फरक पडत असतोच. पण तो कायद्यानें घडून आणलेल्या फरकाइतका शीघ्र व स्पष्ट नसतो आणि सामान्यतः त्याला अवधीहि फार लागतो. यामुळें प्राचीन धर्मग्रंथातील तीन प्रकरणांपैकीं राजशासनात्मक धर्म हा धर्माच्या कक्षेंतून निसटला

व समाजघटनात्मक धर्म हा धर्मांच्या म्हणजे पारलौकिक पापपुण्यात्मक धर्माशीं बिलगून बसला. यावरून पापपुण्यात्मक कल्पनांचें लौकिक गोष्टींशीं साहचर्य जोडण्यांत सुसंगति न राहता बिऱ्याऱ्यांची गुंतागुंत झाली आहे, हें दिसून येईल.

ही गुंतागुंत विंचरून काढण्याचे दोन मार्ग; एक म्हणजे राजशासनात्मक व आर्थिक नियमांनाहि सामाजिक नियमाप्रमाणे पापपुण्याच्या कक्षेत समाविष्ट करणें, व सर्व लौकिक कायदेकानूंना पारलौकिक धर्माची विभूति फासून सर्वांच्या जटा वळणें, किंवा व्यवहार, समाजघटनानियमन व पारलौकिक धर्माचरण ही तीनहि अलग राखणें हा होय. यांपैकीं दुसरा मार्गच श्रेयस्कर होय हें सांगणें नकोच.

वर सांगितल्याप्रमाणें धर्माचीं तीन अंगें स्वतंत्र मानलीं म्हणजे त्यांच्या विशिष्ट प्रांतातील प्रश्न सोडविणें कांहींसें सोपें होतें. पैकीं राजशासन-प्रधान कायदेकानू कालमानानुसार ठरत असल्यानें त्यांच्या मार्गांत जुने शास्त्रीय ग्रंथ फारसे आडवे येऊं शकत नाहींत. चोराला शिक्षा करावयाची असल्यास पांच अंगुळें लांबीच्या लोखंडी तापलेल्या खिळ्यानें करावी किंवा अन्य तऱ्हेनें करावी हें पाहण्याकरितां मनुस्मृतींत दाखला पाहण्याचा कोणी आग्रह धरीत नाहीं. तसेंच दुसरा पारलौकिक धर्माचरणाचा म्हणजे यज्ञयागाचा व जप जाप्याचा धर्म पूर्ण व्यक्तिनिष्ठ असल्यानें जुन्या शास्त्रीय ग्रंथांवर पूर्ण सोप-विण्यांत येतो व त्याच्या आड कालपरिस्थित्यनुरूप राष्ट्रधर्म होतां होईतों येऊं इच्छीत नाहीं. तेव्हां उरलासुरला धर्मांचा तिसरा घटक जो समाजघटना-धर्म त्याचे बाबतींत मात्र जुन्या शास्त्रीय ग्रंथांत ग्रथित असलेले नियम व बदलणाऱ्या कालपरिस्थितीप्रमाणें इष्ट वाटणारे नवे नियम यांच्यांत झगडा सुरू होतो. अशा वेळीं जुन्या धर्मग्रंथाकडे कोणत्या दृष्टीनें पाहावें ह्या प्रश्नाला मोठें महत्त्व प्राप्त होतें.

## नवी विचारसरणी

जुन्या धर्मग्रंथाच्या प्रामाण्यासंबंधीं वाद निघाला कीं, एका प्रकारची मनोवृत्ति कपाळाला आठ्या घालून कांहींसे झिटकारून बोलूं लागते कीं, चालू समाज-व्यवस्थेंत काय फेरफार इष्ट आहेत याचा विचार कर्तव्य असतांना जुन्यापुराण्या युगांतरीच्या स्मृतिग्रंथाची भाषा काढावीच कशाला? आज आपल्यापुढें सर्व

परिस्थिति ढळढळीत उभी आहे. ती समजून घेण्याची अक्कल असलेलीं माणसें आपणांत आहेत. नवीन कायदेकानूंचे सुष्टदुष्ट परिणाम भोगण्याची धमक आमच्यांत आहे. अशा परिस्थितींत जुन्या स्मृतिग्रंथाचे, कीं ज्याच्या काळीं सध्यांच्या युगांतील दळणवळणाच्या साधनांचा मागमूसहि नव्हता व समाजशास्त्राचा शास्त्रीय दृष्ट्या विचार करण्यास लागणारें अनेक भिन्नभिन्न समाजसंस्कृतींचें तुलनात्मक ज्ञानहि उदयास आलें नव्हतें, त्या स्मृतिग्रंथाच्या परिशीलनानें मेंदूस नसता शीण आणणें हा वेळेचा व ज्ञानाचा अपव्यय नाहीं का? जुन्या काळच्या ग्रंथांत आजच्या समाजस्थितींत मार्गदर्शक होणारीं वचनें सापडतील या आशेनें तीं धुंडाळीत बसणें व्यर्थ नव्हे काय? क्वचित् केव्हां तरी चुकूनमाकून अस्पृश्याची सावली पडली तर सचैल स्नान करून स्मृतिकारांच्या आज्ञेचा मान ठेवणें पूर्वी शक्य होतें. पण नव्या काळांत अंतरिक्षांतून स्वैर संचार करणाऱ्या विमानांत बसलेल्या अस्पृश्यांची सावली टाळावयाची झाली तर पुराणांतरींच्या कालेय राक्षसाप्रमाणें बारामास अष्टौप्रहर एखाद्या समुद्रांत किंवा नदींतच बसून राहावें लागेल. तात्पर्य काय कीं जी परिस्थिति पूर्वी कल्पनेंतहि नव्हती त्या सध्यांच्या नव्या मनूंतील परिस्थितीचा विचार जुन्या ग्रंथांतरीं शोधीत बसणें हा जुन्याचा अवास्तव अभिमान होय.

## पुराणप्रिय विचारसरणी

ही विचारसरणी पाहून पुराणप्रिय व श्रद्धावती वृत्ति हेटाळणीच्या स्वरानें उद्गारील कीं, नवी परिस्थिति नवा परिस्थिति म्हणून जी उद्घोषणा आजकाल सर्वत्र ऐकूं येत आहे ती नवी परिस्थिति म्हणजे आहे तरी काय? नवी परिस्थिति म्हणजे अनाचाराचा फैलाव हाच अर्थ ना! मग तो आमच्या त्रिकालज्ञ ऋषींनीं फार पुरातन काळींच हेरून ठेवला आहे. कलियुगांत अनाचार सर्वत्र माजणार ही गोष्ट नवी नसून ती पूर्वींच्या धर्मशास्त्रकारांना पूर्ण अवगत होती, इतकेंच नव्हे तर त्या परिस्थितींत सुज्ञांनीं कसें वर्तन ठेवावें याचें दिग्दर्शनहि त्यांनीं करून ठेवलें आहे. आणि म्हणूनच पूर्वींचे धर्मग्रंथ आजच्या स्थितींतहि पूर्ण प्रमाण आहेत. कालचक्राच्या भ्रमणाबरोबर चालीरीतींत फरक पडत चालला आहे. स्पर्शास्पर्श व जातिनिर्बंधनें शिथिल होत चाललीं आहेत. बाटगे ठरलेले पुनः परत येऊन मिसळत आहेत. निषिद्ध धंदे उच्चवर्णीय लोक अहमहमिकेनें करूं लागले आहेत. हें सर्व अपरिहार्यपणें घडून येत आहे व तें थांबविणें कदाचित्

शक्यहि नसेल. पग कालप्रवाहाला थोपवून धरणें शक्य नसलें तरी त्यांत स्वतःला स्वैर वाहूं दिलें जावें का कर्तव्याला स्मरून अल्पस्वल्प विरोध करावा? पूर्वीच्या धर्मग्रंथांचीं वचनें जेथें स्पष्ट असतील तेथें त्यांच्यावर विसंबून नव्या परिस्थितीला रोखून धरण्याचा प्रयत्न करणें हेंच धर्माभिमानी गृहस्थाचे कर्तव्य होय. पाश्चात्यांत धर्मशास्त्राचें अथवा समाजशास्त्राचें अध्ययन अलीकडे चालू आहे. पण त्या नव्या समाजशास्त्रानें हुरळून जाण्याचें कांहींच कारण नाहीं. ह्या शास्त्राचा अभ्यास शेंसवाशें वर्षांहूनहि अधिक वडील नाहीं. उलट आपल्या स्मृतिकारांचा अनुभव व ज्ञान हजारों वर्षें परिणत होत आलेलें आहे. अशा स्थितींत पाश्चात्यांच्या नादानें आम्हीहि नाचूं लागून जुने धर्मग्रंथ निरुपयोगी म्हणून प्रलाप काढावे हें स्वाभिमानविघातक होय.

## तोंड वळेना, सत्य गवसेना

वरील दोनहि मनोवृत्ति ह्या नेहमीं विरुद्ध बाजूंस तोंड करून उभ्या असल्यानें त्यांच्या पाठीशीं पण त्यांच्यामध्यें उभ्या असणाऱ्या सत्याची व त्यांची कधींच दृष्टिभेट होत नाहीं. एक मनोवृत्ति वडिलोपार्जित घराबाहेर एकहि पाऊल टाकणें हें वांकडें पाऊल पडण्याइतकें गर्ह्य समजते, तर दुसरी मोडकळीस येऊन पडूं लागलेल्या घरांतून बाहेर पडण्याप्रमाणें जुन्या शास्त्रांतून बाहेर निसटणें हें सावधगिरीचें लक्षण मानते. ह्या दोनहि मनोवृत्तींचा खरा मिलाफ व दिलसफाई झाल्याविना पूर्वीच्या धर्मग्रंथांचें खरें परिशीलन व त्यापासून मिळणारें उपयुक्त ज्ञान केव्हांहि पदरांत पडणार नाहीं.

जुने ग्रंथ आजकालचे सामाजिक प्रश्न सोडविण्यास सर्वस्वीं निरुपयोगी होत, असें समजणाऱ्या विचारसरणीस हें बजावलें पाहिजे कीं, इतर शास्त्रांत जुन्या ग्रंथांची योग्यता एकपट असली तर समाजशास्त्रात ती कमी तर नाहींच, तर उलट दसपट आहे. कारण असें कीं, रसायन, पदार्थविज्ञान वगैरे शास्त्रांतील जुने ग्रंथ नष्ट झाले व कांहीं प्रयोगांचें ज्ञान लुप्त झालें तर त्या प्रयोगांचें प्रयोगशाळेंत पुनः पुनरुज्जीवन करतां येतें. पण समाजशास्त्रांतील प्रयोगांचे प्रयोग हे अलोट संपत्ति किंवा अमर्याद सत्ता यांनाहि असाध्य आहेत. अविभक्त कुटुंबपद्धति व विभक्त पद्धति, असगोत्र विवाह व सगोत्र विवाह, जातिनिर्बंध व जाति-स्वातंत्र्य, एकपत्नीत्व व बहुपत्नीत्व, समाईक दौलत व खासगी दौलत, राजसत्ता व प्रजासत्ता वगैरे जे समाजशास्त्रांतर्गत प्रश्न आहेत त्यांचे प्रयोग

केवळ सत्तेच्या जोरावर कोणी करूं पाहील तर ते चक्रवर्तीलाहि अशक्य होत. ते जगाच्या पाठीवर हजारों वर्षें घडत आलेले आहेत व ते तत्कालीन ग्रंथांवरूनच समजून घेतले पाहिजेत.

दुसरें असें कीं निवळ ग्रंथप्रामाण्यावर विसंबून बसण्यापेक्षां प्रत्येक गोष्ट तर्क व युक्ति यांनीं पारखून घेणें युक्त खरें; पण तर्क झाला तरी ज्या मुद्द्यांपत्त्यांवरून अनुमानें बांधावयाचीं किंवा ज्या ऐतिहासिक पुराव्यांवरूनन धोरण आंखावयाचें त्या मुद्द्यांपुराव्यांशिवाय तो आंधळाच होय. आणि तर्काला आधारभूत असा जुना ऐतिहासिक पुरावा गोळा करावयाचा तो जुन्या ग्रंथांतूनच हुडकावयाचा असतो. अमुक गोष्ट समाजांत नवीन जोम उत्पन्न करील किंवा अमक्यानें त्याला कीड लागेल हें ठरविण्याचें एक साधन म्हणजे तत्सदृश धोरणाचा पूर्वी झालेला परिणाम ध्यानांत घेणें हाच होय. एकाच्या हुबेहूब दुसऱ्याचा तोंडवळा आढळणें जितकें कठीण, त्याहूनहि एका प्रसंगासारखा तंतोतंत दुसरा प्रसंग गवसणें दुर्मिळ; पण तंतोतंत नसला तरी तत्सदृश प्रसंगाचें अवलोकन करून अनुमानें बांधणें शक्य असल्यामुळेंच जुन्या इतिहासाचें सर्वत्र आस्थेनें परिशीलन केलें जातें.

या दृष्टीनें विचार केल्यास जुन्या स्मृतिग्रंथांचें अध्ययन उपयुक्त कां आहे हें सहज लक्षांत येईल. या ग्रंथांत हजारों वर्षांत समाजांत ज्या उलाढाली व स्थित्यंतरें झालीं, तसेंच त्या त्या कालांत समाजाला कांहीं विशिष्ट वळण लावण्याकरितां जे कायदे-कानू प्रचलित केले गेले त्यांचें यथार्थ प्रतिबिंब आपणांस उपलब्ध होतें. आणि या प्रतिबिंबाच्या निरीक्षणानेंच समाजचक्राचें अंतरंग उकलणें साध्य होतें. म्हणूनच श्रुति-स्मृतीसारख्या प्रौढ ग्रंथांचेच काय, पण आफ्रिकेंतल्या झुडपांत राहणाऱ्या रानटी लोकांचे किंवा नरमांस-भक्षक पशु-वृत्तीच्या लोकांचेहि विचार समजून घेण्याचा प्रयत्न समाजशास्त्र-जिज्ञासूकडून केला जातो. तात्पर्य, आज समाजापुढें असणाऱ्या प्रश्नांचा विचार करणारास आपल्या समाजाचा पूर्वीचा इतिहास ज्यांत संचित केला आहे त्या स्मृति-ग्रंथांचें परिशीलन आवश्यक होय.

आतां हें परिशीलन कोणत्या भावनेनें करावयाचें यांत वर उल्लेखिलेल्या दुसऱ्या म्हणजे नितान्तपुराणवादी मनोवृत्तीला उत्तर मिळणारें आहे. परिशीलनाची एक पद्धतिही श्रुतिस्मृति-द्रष्टे व कर्ते हे 'कर्तुमकर्तुमन्यथा कर्तुं' अशा लोकोत्तर

सामर्थ्याचे व सर्व कालाला व सर्व विश्वाला व्यापून दशांगुळें उरणाऱ्या अतर्क्य व अनंत ज्ञानाचे पुतळे होत असें समजून त्यांच्या डोळ्याशीं डोळा न भिडवितां अधोमुख होत्साती त्यांची अमृतवाणी ऐकण्यांतच केवळ स्वतःस धन्य समजते. दुसऱ्या पद्धतीच्या मतांतहि प्राचीन समाजशास्त्रप्रणेत्या विद्वान् व धोरणी ऋषिवर्यांविषयीं योग्य आदर व पूज्यभाव वसत असतो. पण त्यांच्या लोकोत्तर ज्ञानाविषयींच्या अवास्तव कल्पनांनीं ती गांगरून जात नसल्यानें विनीतपणें पण धीटपणें त्यांच्याशीं ती खुली चर्चा करूं शकते.

आणि खुद्द त्या ऋषिवर्यांचीहि अशीच इच्छा नसणार काय? आपले वंशज नेभळे निपजून वाडवडिलांनीं कमाविलेल्या थोरवीवरच त्यांनीं स्वतःस सदैव विकावें, व कालपरिस्थितीप्रमाणें धोरण बदलण्याची अक्कल त्यांच्यांत नसावी, अशी कोणत्या सत्पुरुषाची बुद्धि असणार? आपली संस्कृति ही जगांतील अत्यंत प्रौढ. पुराण संस्कृति होय ह्या कल्पनेनें अभिमान वाटणें साहजिक व वाजवी होय. पण तिच्या पुराणत्वाचा गैरफायदा घेऊन लक्ष्यार्थी नव्हे तर वाच्यार्थी तिला सनातन पदवीनें भूषविणें व तिच्यांतील धर्मनियम हे सनातन अतएव सर्वगामी व अचल ठरवून त्या भूषणांनाच बंधनांची कळा आणणें हें धर्माभिमानाचें लक्षण ठरेल काय?

## सुधारक ऋषि

आपल्या प्राचीन ऋषिवर्यांची धर्माभिमानाची कल्पना अशी अनुदार मुळींच नव्हती. ज्या ऋषिवर्यांचे समाजशासननियम आज आपण सनातन व त्रिकालाबाधित समजतों त्यांनीं स्वतः आपल्या ज्ञानाच्या अनंतत्वाबद्दल केव्हांहि ग्वाही दिलेली नाहीं, किंवा श्रुतीच्या पलीकडे धर्म असूं शकत नाहीं अशी कूपमंडूक वृत्तीहि स्वीकारलेली नाहीं. 'विद्वद्भिः सेवितः सद्भिर्नित्यमद्वेषरागिभिः' 'हृदयेनाभ्यनुज्ञातः' ही मनूची धर्माची व्याख्या सर्वश्रुतच आहे. इतर शास्त्रकारांचींहि वचनें त्यांच्या व्यापक व उदार दृष्टीस शोभण्यासारखींच आहेत. 'यस्त्वार्या प्रशंसन्ति स धर्मः। यद्गर्हन्ते सोऽधर्मः' या आपस्तंबाच्या व्याख्येपेक्षां अधिक व्यापक व्याख्या कोण करूं शकेल? याच धर्मसूत्रकारांच्या ग्रंथांतील पहिलीं तीन सूत्रें महत्त्वाचीं आहेत तीं अशीं:–'अथातः समयाचारिकान् धर्मान् व्याख्यास्यामः। धर्मज्ञसमयः प्रमाणम्। वेदाश्च।' या सूत्रांतील

'समय' म्हणजे शिष्ट विद्वानांच्या सभेनें मान्य केलेला ठराव. सूत्रकाराचा भावार्थ असा कीं, धर्मनियम तयार होतात ते विद्वानांच्या सभेंत मान्यता पावून होतात. विद्वानांची मान्यता हें पहिलें प्रमाण आणि श्रेष्ठ प्रमाण, व वेद हें दुसरें म्हणजे दुय्यम प्रमाण होय. तत्तत्कालपरिस्थित्यनुरूप विद्वानांना योग्य वाटणें हें पहिलें लक्षण आणि त्यालाच श्रुतीचाहि आधार सापडला तर 'अधिकस्याधिकं फलम्.' पण श्रुतींचा आधार दुय्यम समजला पाहिजे असा आपस्तंबाचा रोख दिसतो. एरवीं प्रत्येक शब्द तोलून लिहिलेल्या सूत्रग्रंथांत वेदांचा उल्लेख धर्मज्ञांच्या नंतर असा क्रम आढळता ना. वृद्ध वेदांना हरि हरि म्हणावयास लावून लोकरुचि व कालमान ह्या तरुणांच्या अंगावर जबाबदारी टाकण्याची आवश्यकता याज्ञवल्क्यालाहि पटली होती हें त्याचें वचन 'अस्वर्ग्यं लोकविद्विष्टं धर्ममप्याचरेन्न तु' केव्हांहि बोलून दाखवील. स्मृतिकार नारदाची साक्ष तर याहूनहि अधिक स्पष्ट व निःसंदिग्ध आहे. तो म्हणतो कीं, व्यवहार हाच समाजाच्या घरांतील कर्ता मालक व त्याच्या तंत्रानेंच धर्मनियमांनीं चाललें पाहिजे. "व्यवहारो बलवान् धर्मस्तेनावधीयते." ह्या सर्व स्मृतिकारांना जुन्या श्रुतिकारांच्या उज्ज्वल ज्ञानाबद्दल योग्य आदर असे, पण कालमान व व्यवहार बदलला तरी पूर्वनियम जसेच्या तसे अखंड राखण्याइतके ते भोळसट नव्हते !

येथें हें सांगितलें पाहिजे कीं वरील अनुमान केवळ इतस्ततः पसरलेल्या वचनांवरच अधिष्ठित नाहीं. कारण फुटकळ वचनांवरून एखादा मुद्दा सिद्ध करूं लागले तर उलटसुलट वचनें दाखवून वादीचा मुद्दा वादीच्याच गळ्यांत बांधणें मुळींच कठीण जाणार नाहीं. तर स्मृतिकार हे कालमान ओळखीत असत हें त्यांच्या कृतीवरून म्हणजेच त्यांनीं स्वतः बदललेल्या नियमावरूनच स्पष्ट आहे. आणि त्याकरितां फार खोलांत शिरावयास नको. नुसत्या कलिवर्ज्यांच्या लांबलचक यादीची आठवण. दिली तरी हा मुद्दा ध्यानांत येण्यास अवकाश लागणार नाहीं. जसजसा व्यवहार बदलत गेला तसतसे पूर्वी शिष्ट, सुसंस्कृत व नागर म्हणून ठरलेल्या नियमांची हळूहळू निषिद्ध म्हणून गणना होऊन त्यांना कलिवर्ज्यांच्या तुरुंगांत कायमचें डांबून टाकण्यांत आलें. विधवा निपुत्रिका असल्यास दिराच्याकरवीं नियोगपद्धतीनें पुत्रप्राप्ति करणें हें एके काळीं शिष्ट व अभिजात म्हणून खुशाल मिरवीत असे.

पण कालांतरानें, प्रत्यक्ष वर्तन तर राहोच पण त्याच्या नुसत्या नामोच्चारानेंहि धर्माच्या अंगावर कांटा उभा राहूं लागला. भातांत गोमांस शिजवून खाल्लें असतां बुद्धि तरतरीत होते असा एका काळाचा अनुभव व शिष्ट पाहुण्याच्या स्वागतार्थ गोमांस रांधणें हा तर शास्त्रपूत संप्रदाय ! पण कालांतरानें गोमातेच्या मांसाचा विचार करणारास स्वतःचें मांस अर्पण करण्याचा प्रसंग येऊन ठेपला. यज्ञांत नरमेध करणें एके काळीं प्रशस्त मानलें जात असे, पण कालान्तरानें मानुषवधच नव्हे तर पशुवधहि त्याज्य ठरला. हे फरक बदलत्या कालमाना-प्रमाणें व बदलत्या लोकरुचीप्रमाणें आवश्यक होते व ते तसे श्रुतींच्या आज्ञेचें फाजील स्तोम न माजवितां अमलांतहि आणले गेले.

मात्र स्मृतिकार हे समजंस लोकनायक असल्यानें किंवा श्रुतींविषयीं लोकांत त्या काळीं अत्यादर असल्यानें श्रुतींचा बोज राखण्याकरितां आपल्याकडे गौणपणा घेऊन नवीन फरकांचा श्रुतींशीं मेळ घालीत. उदाहरणार्थ, बदलत्या आर्थिक परिस्थितीनें व नीतिकल्पनांनीं नियोगाची चाल सर्वस्वीं त्याज्य ठरविल्यानंतर तिचा स्पष्ट निषेध करणें प्राप्त होतें; पण पूर्वाचार्यांनीं तर त्यावर प्रशस्ततेचा शेरा मारलेला. या खोड्यांतून आपस्तंब सूत्रकारानें मोठ्या शिताफीनें आपणास सोडवून घेतलें आहे. तो म्हणतो, आपल्या पूर्वजांचें तेज व वीर्य अचाट होतें म्हणून त्यांना अनेक गोष्टी खपत; पण आपण पामर त्यांचें अनुकरण करूं लागलों तर व्यर्थ खोड्यांत मात्र येऊं (द्रष्टो धर्मव्यतिक्रमः साहसं च पूर्वेषाम्। तेषां तेजोविशेषेण प्रत्यवायो न विद्यते। तदन्वीक्ष्य प्रयुंजाना सीदत्यवरः।) तसेच श्रुति अनन्त असून आज त्यांच्यापैकीं पुष्कळशा लुप्त आहेत पण जुन्या स्मृतिकारांच्या वेळीं त्या प्रकाशमान असाव्यात ही कल्पना घ्या, किंवा भिन्न युगांत भिन्न स्मृति प्रमाण मानण्यांत याव्या ही कल्पना घ्या, त्या सर्व कल्पना श्रुतींचा बोज राखण्याकरितांच बसविण्यांत आल्या. प्राचीन ग्रंथांचें प्रमाणत्व वरपांगी कायम राखण्याच्या ह्या प्रयत्नाचें कौतुक करण्यास हरकत नाहीं. पण हा वरपांगी देखावा बाजूस सारला म्हणजे मुद्दा उरतो तो हा कीं, बदलत्या कालमानाप्रमाणें समाजनियंत्रणनियम बदलणें जरूर आहे असेंच स्मृतिकार मानीत व त्याप्रमाणें धर्मग्रंथांत नवीन शोध घालीत. क्वचित् ठिकाणीं तर वेदांच्या विरुद्ध असलेले आचार प्रमाण होत असेंहि आडपडदा न ठेवतां रोखठोक लिहिण्यास ते कचरत नसत. यासंबंधांत वसिष्ठस्मृतींतील

खालील वचन नजरेखालीं घालण्यासारखें आहे. " विहितो धर्मः । तदलाभे शिष्टाचारः प्रमाणम् । प्रागादर्शात्प्रत्यक्कालकवनात् दक्षिणेन हिमवतः उत्तरेण विन्ध्यस्य ये धर्माः ये आचाराः ते सर्वत्र प्रत्येतव्याः नत्वन्ये प्रतिलोमकस्य धर्माः" यांतील प्रतिलोमक म्हणजे वेदविरुद्ध आचाराविषयीं स्मृतिकारांचें सांगणें असें कीं, आर्यावर्तांतील वेदविरुद्ध आचारहि प्रमाण समजावे, इतर ठिकाणचे मात्र तसें समजूं नयेत. वेदविरुद्ध आचारहि प्रमाण होत असें येथें निःसंदिग्ध रीतीनें सांगितलें आहे. बौधायनालाहि दक्षिणेंत व उत्तरेंत वेदविरुद्ध आचार प्रसृत असलेले माहीत होते. तथापि त्या देशांत ते प्रशस्त होत असेंच त्यानें आपलें मत दिलें आहे. " पंचधा विप्रतिपत्तिः पचंधा दक्षिणतः तथा उत्तरतः । तत्र तत्र देशप्रामाण्यमेव स्यात्" तात्पर्य, श्रुत्यंतर्गत समाजशासननियम हें प्रमाण नित्य, अचल व सनातन असें न मानतां परिस्थितिनिष्ठ व चल असेंच स्मृतिकार मानीत व तें योग्य कारणास्तव बदलण्याचा आपला हक्कहि यथान्याय बजावीत. अर्थात् या श्रुतिस्मृति ग्रंथांच्या आजच्या अभ्यासकानेंहि ते देशकालातीत व सनातन समजून गांगरून जाण्याचे कारण नाहीं.

चिकित्सक दृष्टीनें श्रुतिस्मृत्यादि धर्मग्रंथांचें परिशीलन केलें असतां असें आढळून येतें कीं, नीतिविषयक व समाजशासनविषयक कल्पनांत कधीं उन्नति होत गेली तर कधीं साचलेल्या पाण्याप्रमाणें त्यांतील चैतन्य लोपून गेलें. नियोग, नृमेध, गोवध, वगैरे कांहीं बाबतींत प्राचीनकालापेक्षां पुढील कालांत प्रगति दिसते, तर जातींचीं अनंत शकलें होणें व तीं एकत्र बांधण्याचें सूत्र धर्मनियमांच्या फाजील ताणामुळें तुटून जाणें, फुलाचें फळ झाल्यावर फिरून फूल होणें जितकें दुर्घट त्याहिपेक्षां धर्मभ्रष्ट फिरून धर्मस्थित होणें दुर्घट समजलें जाणें, वैदिक कालांतील उत्साह, आशा, हुरूप यांचा प्रकाशकाल संपून निराशा व निरुत्साह यांची कृष्णछाया पसरणें या बाबतींत परागति दिसते. यामुळें अमुक एका काळांत समाज सुधारणेच्या अत्युच्च शिखरावर होता असें गृहीत धरणें व त्यावर दृष्टि स्थिर करून मार्ग आक्रमण करण्याचा उपदेश करणें कठीण आहे. अर्थात् पूर्वग्रंथांच्या अभ्यासानें समाजशास्त्रप्रमेयांचें तात्पर्यात्मक ज्ञान संपादणें व त्यावरून स्वकालानुरूप शासननियम तयार करणें येवढाच मार्ग चिकित्सक सुधारकांच्या पुढें उभा राहतो.

---

— ६ —

# धर्मविचारांच्या नव्या लाटा

पनवेलचे फडके वकील यांनीं लिहिलेला 'नवयुगधर्म' —ब्राह्मसमाजखंड— नांवाचा नऊशें पानांचा प्रचंड ग्रंथ हातांत पडला तेव्हां उत्सुकतेनें वाचावयास घेतला; आणि हा ग्रंथ म्हणजे एक खंड असून असे आणखी दोन खंड प्रसिद्ध व्हावयाचे असून त्या सर्वांत मिळून ब्राह्मसमाज, देवसमाज, आर्यसमाज, थिऑसोफिस्टसमाज व संतसमाज अशा नवयुगांतील विविध धर्ममतांचें दर्शन घडणार व त्यांतूनहि या मताची पार्श्वभूमि म्हणून चरित्राचीहि मांडणी ग्रंथांत येणार हें अनुक्रमणिकेवरून पाहून जिज्ञासा अधिकच दुणावली. ग्रंथाचे तिन्ही खंड प्रसिद्ध होऊन वाग्यज्ञ संपूर्ण होईल तेव्हां वरील अनेक महात्मे यज्ञमंडपांत येऊन आपल्या दिव्यदर्शनाचा व अमृतवाणीचा लाभ जनतेस देतीलच. तथापि, प्रस्तुत प्रसिद्ध झालेल्या ब्राह्म व देवसमाजाचा खंडहि दोन तीन तऱ्हेनें उपयुक्त आहे.

महाराष्ट्रांतील संतांचा परिचय प्रत्यक्ष व ग्रंथद्वारा पुष्कळांना आहे. प्रार्थनासमाजाचा इतिहास प्रसिद्ध झाल्यानें त्याची माहिती जनतेस मिळालीच आहे. आर्यसमाजाची कल्पना येण्यास 'सत्यार्थप्रकाशा'चें भाषांतर व कोल्हापूरचे तुंगार यांचीं 'दयानंदचरित्र' व इतर पुस्तकें उपलब्ध आहेत. श्रीरामकृष्ण, विवेकानंद व रामतीर्थ यांचे ग्रंथ महाराष्ट्रांत तर पूर्वीच लोकप्रिय झालेले आहेत. आणि थिऑसोफिस्टांची माहिती 'धर्मजाग्रति' व महाराष्ट्रांतील थिऑसोफिस्ट लेखकांचे लेख यांच्या द्वारा महाराष्ट्रास मिळत आलेली आहे. ब्राह्म व देवसमाज यांची ओळख करून घेण्यास मात्र 'शांतिनिकेतनमाला' वगळली असतां मराठींत एकहि ग्रंथ उपलब्ध नव्हता. ती सोय प्रस्तुत ग्रंथानें उत्कृष्ट झाली आहे.

दुसरें असें कीं, गेल्या पन्नास-पाऊणशें वर्षांतील बंगालमधील निम्याहून अधिक नामांकित पुढारी हे ब्राह्म होत. पण रवींद्रनाथांसारखी दिगंतप्रसिद्ध व्यक्ति सोडली तर राममोहन, देवेंद्रनाथ, केशवचंद्र सेन, शिवनाथशास्त्री,

आनंदमोहन बोस, सीतानाथ तत्त्वभूषण वगैरे प्रसिद्ध बंगाली व्यक्तींचीं नांवें फक्त कानांवरून गेलेलीं, पण त्यांच्या विचारसंपदेशीं परिचय होण्याचें साधन सुलभसाध्य नव्हतें. तेव्हां सुधारक म्हणून प्रसिद्ध असलेल्या ब्राह्मपुढाऱ्यांच्या चरित्रांच्या व मतांच्या प्रस्तुतच्या चिकित्सक इतिहासद्वारा बंगाल प्रांतीची तीर्थयात्रा करून या थोरथोर व्यक्तींचें दर्शन घेण्यास मोठ्या उत्सुकतेनें निघालों. त्यांतहि सुदैवानें ग्रंथकार वाटाड्या प्रत्येक स्थलीची खडान्‌खडा माहिती असलेला विद्वान् आणि वाणी तर अत्यंत मिष्ठास! मग नऊशें पानां-च्या या विस्तृत ग्रंथांतील प्रवास किती कल्पनारम्य झाला असेल हें काय वर्णावें!

## राममोहनांच्या संगतींत

या प्रवासांत ब्राह्मांच्या आदिब्राह्म, साधारण ब्राह्म, नवविधान वगैरे पंथांच्य मतांचीं तीर्थोपतीर्थें अवलोकन करावयास सापडलीं. राममोहन, रवींद्र, केशवचंद्र, शिवनाथ, सीतानाथ वगैरेंच्या प्रौढ वाङ्मयसरितेंत मनसोक्त अवगाहन करावयास लाधलें. तसेंच ब्राह्मांचीं सदतीस वर्तमानपत्रें, त्यांच्या कलकत्ता कॉंग्रिगेशन, बडानगर कामकरी मिशन, संगत सभा, थिऑलॉजिकल सोसायटी, ब्राह्मबंधु-समाज, ब्राह्म तरुणसंघ, हिमालयांतील रानटी लोकांत काम करणारे नीलमणि, चक्रवर्ती यांचें खासी हिल्स मिशन वगैरे अनेक संस्थांची धूळभेट घेतां आली. यामुळें ब्राह्मांच्या कार्यक्षेत्राचा विस्तार नजरेखालीं घालतां आला व ही सर्व यात्रा चालू असतां तत्तत्स्थलीन व्यक्तींविषयीं अनेक लहानमोठ्या मनोरंजक कथाहि ऐकावयास सापडल्या. राममोहनांच्या बरोबर विलायतेची सफर करून राममोहनांचें तेथील अपूर्व स्वागत, राज्यारोहणसमारंभांतील त्यांचें प्रमुखासन, त्यांचें दर्शन घेण्याकरितां गिरणी बंद पाडून बाहेर लोटणारा मँचेस्टर येथील प्रचंड कामकरी वर्ग, आपल्या मुलाचें राममोहन हें नांव ठेवणारी एका बिशपची पत्नी, प्लेटो, सॉक्रेटीस वगैरेशीं तुलना करून 'राममोहनांचें स्वागत करण्याचा प्रसंग हा सुवर्णाक्षरांनीं लिहिण्यास योग्य' असे गौरवोद्गार काढणारा डॉ. ब्राउनिंग, प्रणवोच्चाराबरोबर होणारें त्यांचें देहावसान, त्या प्रसंगीं स्फुंदून रडणारी मिस् हेअर, व कार्नोव्हेल येथील त्यांची समाधि हीं सर्व अवलोकावयास सापडलीं. तसेंच सर्व धर्मांवरील प्रेम व्यक्त करण्यासाठीं एका मुसलमान मुलास त्यांनीं दत्तक घेतलें होतें व दुसऱ्या एका ख्रिस्ती मुलाचे ते धर्मपिते

होते ही माहितीहि ऐकावयास मिळाली. नंतर देवेंद्रांच्या सान्निध्यांत हिमालयांतील पवित्र मंगलमय एकांतवासांत अनेक वर्षें वास्तव्य करण्यास सापडून निसर्गाचे अनेक दिव्य संदेश आत्मसात् करतां आले, व वडिलांनीं एक कोटीचें कर्ज करून ठेविलें असतां दिवाळें काढून अप्रामाणिकपणाचा मार्ग न स्वीकारतां सर्व कर्ज फेडण्याचें कष्टतर व्रत यांनीं कसें अंगीकारलें ही कथाहि मनांत संग्रहित केली. तेथून पुढें रवींद्रांच्या शांतिनिकेतनांत प्रवेश केल्यावर कविसम्राट् म्हणून दिगंतकीर्ति गाजत असलेल्या या रवींद्रांना साध्या मॅट्रिक्युलेशन परीक्षेंतहि बंगालीचे परीक्षक नेमण्याचें कलकत्ता युनिव्हर्सिटीनें कसें नाकारलें, इतकेंच नव्हे तर, त्यांच्या ग्रंथांतील उतारे शुद्ध करण्याकरितां म्हणून उघडपणें परीक्षेंत कसे घालीत असत, हीहि मनोरंजक माहिती वाटाड्यानें सांगितली !

पुढें ख्रिस्त्यांच्या आहारी गेलेले भावनावश केशवचंद्र सेन हे लिली कॉलेजामागील कमलसरोवराच्या कांठीं शिष्यांना उपदेश करून 'नंतर ज्या तीर्थांतून बुडी मारून निघाल्यावर येशु ख्रिस्त पावन झाला त्या पवित्रोदकांत आपणहि बुडी मारून पावन व्हावें अशा भावनेनें आपल्या अंगास सुगंधी तेलें व अत्तरें लावून ते कमलसरोवरांत कसे उतरले आणि ख्रिस्ती त्रयीचा उच्चार करून त्यांनीं भाविक कर्मठाप्रमाणें तीन वेळ कशी बुडी मारली, नंतर 'जय सच्चिदानंद !' म्हणून या त्रयीचा समन्वय कसा केला, समारोप करीत असतां एका गायक प्रेषितानें त्यांच्या मस्तकावर जलधारा कशी धरली व तें शांतिजल आपआपल्या कलशांत भरून घेण्याची कशी गर्दी उसळली हा सर्व देखावा अवलोकण्यास मिळाला.

तसेंच, जातां जातां ब्राह्मेतर ईश्वरचंद्र व रामकृष्ण यांच्याहि दोन कथा ईश्वरचंद्रांच्या एका मित्रानें आपल्या कुमारिका कन्येस महाशयांस वंदन करावयास सांगितलें असतां 'बाळे, तुला चांगला पति मिळो, पण तुला वैधव्य प्राप्त होऊन तुझा पुनर्विवाह करण्याची संधि मला मिळो' असला विक्षिप्त आशीर्वाद कसा दिला, तसेंच कांचनाच्या नुसत्या सान्निध्यानें श्रीरामकृष्णांच्या अंगास आंकड्या कशा येऊं लागत व कामिनीभाव नष्ट व्हावा म्हणून 'स्त्रीवेषानें स्त्रियांच्या समाजांतच कित्येक दिवस ते कसे राहिले, इतकेंच काय, पण विवस्त्र झालेल्या तरुण स्त्रिया— नव्हे, तरुण व सुंदर दंपत्यांची साक्षात् रतिक्रीडा पाहूनहि आपली ब्रह्मभावना यत्किंचितहि चलित होत

नाहीं, उलट सौंदर्य व आनंद यांच्या दर्शनांत समाधिच लागते' अशी त्यांनीं आपली सत्त्वपरीक्षा कशी पाहिली–याहि कथा वाटाड्यानें ऐकविल्या. आणि या शिळोप्याच्या कथांनीं व आपल्या अमोघ, अस्खलित, अलंकृत व चटकदार रसवंतीनें अध्वखेद मुळींच भासूं न देतां रवींद्रनाथ, हेमचंद्र सरकार, सीतानाथ तत्त्वभूषण वगैरे जबऱ्या लेखकांच्या तात्त्विक गहनगूढ लिखाणाच्या अफाट अरण्यांतहि निर्वेध संचार करून तेथील प्रच्छन्न गुहा, अदृष्ट सरोवरें व अज्ञात धबधबे वाटाड्यानें दाखवून दिले.

## असंतुष्ट वाटाड्या

पण काय असेल तें असो, हा सर्व माझ्या दृष्टीनें मनोरम प्रवास चालू असतां वाटाड्याच्या चेहऱ्यावर मात्र असमाधानाची कृष्णछाया पसरलेली दिसत होती. कित्येक वेळां मी ब्राह्मांच्या विचारसरणींत दंग होऊन गेलों असें भासतांच परस्त्रीचें सौंदर्य पाहण्यांत जणूं कांहीं रंगलों आहे अशा भावनेनें माझा वाटाड्या सुस्कारे टाकी, अनेक ठिकाणीं नाकास हातरुमाल लावी, व पुष्कळ प्रसंगीं वीट आल्याप्रमाणें दृष्टि फिरवी. प्रथम प्रथम मला उलगडा पडेना, कीं इतके विविध देखावे दाखवीत असतां ग्रंथकार असंतुष्ट कां? आणि अशा असंतुष्ट स्थितींत एवढा प्रचंड उद्योग तरी त्यानें कां आरंभिला? हळूहळू संशय येऊं लागला, कीं ब्राह्मांच्या आचारविचाराची बारीकसारीक तपशिलासुद्धां माहिती पुरवून ग्रंथकार शेवटीं म्हणणार कीं, आतांपर्यंत तपशीलवार वर्णिलेलें हें सर्व निषिद्ध किंवा वर्ज्य प्रकरण असून ब्राह्मांची व तत्सम चिकित्सकांची विचारसरणी जितक्या लवकर झिडकारली जाईल तितकें धर्माचें स्वरूप उज्ज्वल होण्यास मदत होईल.

पण पुढें पुढें ग्रंथकारानें मौन सोडून तिखट झणझणीत शब्दांनीं ब्राह्मांची रेवडी उडविण्यास सुरुवात केलेली पाहून संशय खरा ठरला व ग्रंथकाराची भूमिका लक्षांत येऊं लागली. नवयुगांतील सर्व विचारवंतांचे धर्मविचार ग्रंथकारास तीन भागांत संग्रहीत करावयाचे आहेत. पहिल्यांत बहुतांशीं परंपरा झुगारणारे ब्राह्म, दुसऱ्यांत ती बव्हंशीं स्वीकारणारे आर्य व थिऑसोफिस्ट व तिसऱ्यांत निःसीम परंपरावादी साधुसंत अशी ही चढती श्रेणी असून, तिसऱ्यांतील विचारसरणी ही ग्रंथकारास जिव्हाळ्याची व पहिल्या दोहोंतील ही केवळ त्याची

पार्श्वभूमि होय अशी एकंदर मांडणी आहे. ग्रंथाच्या शेवटीं स्पष्ट खुलासा आहे कीं, 'ग्रंथाच्या शेवटच्या खंडांत सर्व संप्रदायांचा साकल्येंकरून विचार होईल, तोंपर्यंत आमचें दोषाविष्करण सनातनीयांच्या विचारसरणीशीं पडताळून केलें आहे असें समजावें.' अर्थात् धार्मिक बाबतीत सुधारकांनीं केलेले नवे प्रयोग सनातनी दृष्टीस कसे दिसतात हे समजून घेण्याच्या दृष्टीनें ग्रंथकाराच्या संगतीत थोडा वेळ घालविणें निष्फळ ठरणार नाहीं.

## चिकित्सेचा पंडुरोग

टिळकांचा क्रांतिकारक रहस्यग्रंथ, कीं ज्यांत निवृत्तीपेक्षां प्रवृत्ति श्रेष्ठ व शंकराचार्यांनीं केलेला गीतेचा व ईशावास्योपनिषदाचा अर्थ हे सांप्रदायिक, अतएव एकांगी होत असें प्रतिपादिलें आहे, तो ग्रंथ प्रसिद्ध झाल्यापासून जुन्या परंपरेंत मोठीच खळबळ उडालीहि व ग्रंथरूपानें या खळबळीला संघटित रूप देण्याचाहि प्रयत्न चालू झाला. गोविंदसुतांच्या 'आधि-भौतिक सुधारणा व आध्यात्मिक धारणा' या पुस्तकद्वारा जुन्या परंपरेनें नवविचारांच्या लाटेस थोपवून धरण्याचा असाच एक प्रयत्न केला व ब्राह्मधर्माचा विवेचक इतिहास लिहिण्याच्या मिषानें प्रस्तुत ग्रंथकारानेंहि परं-परेच्या मोडकळून जाणाऱ्या बंधाऱ्यांत आणखी एक प्रचंड शिला आणून टाकली ग्रंथकार लिहितो कीं, आजपर्यंत म्हणजे निदान गेल्या शतका-पर्यंत जो हिंदुधर्म निवृत्तिप्रधान गणला जात असे, तो या राममोहनयुगांत प्रवृत्तिपर कसा झाला व पाश्चात्यांच्या संसर्गामुळें परंपरेंतून सुटलेली नवशिक्षितां-ची तर्कटी बुद्धि एखाद्या शीलभ्रष्ट स्त्रीप्रमाणें सदाचाररूप धर्माशीं पराङ्मुख कशी झाली, हें या ग्रंथीं अप्रत्यक्ष रीतीनें सिद्ध होईल (पृ. ७). तसेंच, इंग्रजां-च्या संसर्गानें जे कित्येक घाणेरडे व अनीतिजन्य रोग इकडे आले त्याच-प्रमाणें संशोधन व चिकित्सा हे पडुरोगासारखे दोन रोगच आमच्या सुशि-क्षितांच्या मागें लागले आहेत. या रोग्यांच्या पाखंडी मतांना, ईश्वर करील तर, आम्हांस शेवटच्या तुलनात्मक खंडांत उत्तरें द्यावयाचीं आहेत' (पृ. ६२८). हें काम महत्प्रयासाचें आहे हें जाणून ग्रंथकार लिहितो, 'प्रागतिक विचारांचा जोराचा प्रवाह वाहत असतां त्याच्या उलट पोहून जाण्याकरितां दोन हात टाकणें म्हणजे लोकापवादाच्या भोंवऱ्यांत ग्रंथकाराचें मरणच. परंतु बुडतां

बुडतांहि ठाण मांडणाऱ्या श्री स्वामी रामतीर्थांचें धैर्य डोळ्यांपुढें ठेवून टीकेच्या पाणलोटाची पर्वा न करितां आम्ही आमच्या वाडवडिलांच्या विचारांची बैठक अढळ ठेवण्याचा प्रयत्न करणार आहों (पृ. ६७२). अर्थात् परंपरेनें चालत आलेले विचार हे पवित्र, सनातन व त्रिकालाबाधित समजून त्यांना घट्ट मिठी मारून आपली बैठक अढळ ठेवणाऱ्याला नवशिक्षित कसे दिसतात—परंपरेंत अनंतकालचे परिपक्क अनुभव सांठविलेले असले तरी त्यांना बदलत्या परिस्थितींत सांचलेलेपणामुळें वास मारूं नये म्हणून नवीन विचारांचे जिवंत प्रवाह सोडणें जरूर असतें असें मानणारे व तदनुरूप उद्योग आरंभणारे 'नवशिक्षित' कसे दिसतात हें पाहण्यासारखें आहे.

## सुधारणेचे प्लेगजंतु

थोडक्यांत कल्पना येण्याकरितां एकच मासलेवाईक उतारा देतों. ब्राह्म-धर्माला वटवृक्ष कल्पून त्यावर कोणकोणते पक्षी बसले आहेत याचें वर्णन करतांना ग्रंथकार लिहितो, 'या वृक्षावर 'द्वासुपर्णा' पैकीं शिवरूप जातीच्या पक्ष्यांचीं तर वानवाच दिसत आहे; पण दुसऱ्या जातीच्या पक्ष्यांपैकीं ध्यान करणारे बगळे, नेकटायवाले बोलके पोपट, चिकित्सक बुद्धीचे डोळस पिसारे मिरविणारे मोर, मधुर वाणीचे कोकिळ, कधीं वियुक्त नसणारे चक्रवाक्, वर्ण-संकर करणाऱ्या मधुर वाणीच्या साळुंक्या, शिकारी साहेबांच्या अचूक भक्ष्य-स्थानीं पडणारे पारवे, आपल्याच आरवण्यानें उजाडलें या तोऱ्यांत उकिरडा उकरणारे कुक्कुट, मनस्येकं वचस्येकं असले अधलेमधले वाघूळ, मेलेल्यांचीं आंतडीं काढणारे गृध्र, आणि ब्राह्मण्याच्या काकबलीवरच आजपर्यंत जिवंत राहून व्यर्थ कोलाहल करणारे दुसरे कित्येक पक्षी त्यांनींच हा वटवृक्ष भारभूत झाला आहे!' आणि ह्या टीकेचा रोख कांहीं विशिष्ट व्यक्तिविषयकच तेवढा आहे असे नाहीं तर या व्यक्तींनीं प्रतिपादिलेलीं तत्त्वेंहि ग्रंथकाराच्या मतें अत्यंत घातुक आहेत. शिवाय त्यांची व्याप्ति बंगाल पुरतीच नसून हे विषारी जंतु महाराष्ट्राच्या हवेंतहि मिसळले आहेत. इतकेंच नव्हे, तर ग्रंथकाराच्या मतें मोठ्या शरमेची गोष्ट आहे कीं, उच्चपदस्थ असे मोठमोठे विद्वान् आपल्या ग्रंथद्वारा ह्या विषारी धुरानें सर्व वातावरण दूषित करीत आहेत.

वाचक हो! हें ग्रंथ कोणते समजलें का? तर चिकित्सक वाचकांच्या आदरास

पात्र झालेले दिवेकरशास्त्री यांचा 'हिंदुधर्म समर्थ कसा होईल?' व दतरी ह्यांचा 'धर्मरहस्य', हे हें ग्रंथ होत. ग्रंथकार हळहळून लिहितो, 'ब्राह्मसमाज ही संस्था लहान असली तरी तिनें केलेलें कार्य फारच व्यापक स्वरूपाचें आहे असें ब्राह्म म्हणतात. हें त्यांचें म्हणणें एका अर्थी खरें आहे असें म्हणतां येईल. चांगल्या गोष्टीपेक्षां वाईट गोष्टीचा प्रसार फार लवकर होतो. प्लेगदूषित उंदरावरील पिसवा त्या काय, पण त्यांनीं टोचलेलें विष मनुष्याचें सर्व शरीर व्यापतें. तद्वत् ब्राह्मांच्या विचारधुरीनें वैदिक धर्मनिष्ठेच्या सुमनांनींहि आपला रंग पालटला आहे. उदाहरणार्थ, ब्राह्मणशाहींतील काशीक्षेत्र समजल्या गेलेल्या वाई क्षेत्रांतील दिवेकरशास्त्र्यांच्या 'जिज्ञासामारक वेदांताला नमस्कार करून हिमालयांत पाठविलें पाहिजे, मनुष्याला अवतार मानणें हें गुलामगिरीचें द्योतक होय, जन्मतः कोणतीहि व्यक्ति अगर जाति उच्च अगर नीच नाहीं, मात्र देवाची उपासनाच यापुढें हिंदुसमाजानें केली पाहिजे' वगैरे प्रतिपादणारा 'हिंदुधर्म समर्थ कशानें होईल?' हा ग्रंथ, व श्रीरामाच्या पंचवटींतील धर्मविद्यालयाच्या मुख्य अध्यापकांचा 'ब्राह्मणांसच धर्म बरोबर न समजल्यामुळें सर्वांचीच दिशाभूल झाली, आरंभीं जे सर्व वर्णांमध्यें अन्नव्यवहार व विवाह होत असत ते बंद करण्यांत आले व वर्णांतराची व्यवस्था नाहींशी करण्यांत आली, ही चुकी होय' असलीं मतें प्रतिपादणारा 'धर्मरहस्य ग्रंथ' हे वाचले असतां विचारांचा वारा कसा फिरत चालला आहे हें दिसून येईल." वरील ग्रंथ हे प्लेगदूषित पिसवांइतके घातुक असून त्यांतून पसरणाऱ्या विचारसरणीस वेळींच जाळून हिंदुधर्माचें घर शुद्ध केलें नाहीं तर महान् अनर्थ ओढवेल असा या ग्रंथकाराचा एकंदरींत स्पष्ट अभिप्राय आहे.

ग्रंथकाराचें असें मत बनण्यांत ब्राह्मधर्मांत ग्रंथकाराच्या असें काय नजरेस पडलें व जें पडलें त्यावरून त्यानें जीं अनुमानें बांधलीं त्यांत ग्राह्याग्राह्य किती, हें थोडें विस्तारानेंच निरखिलें पाहिजे. आतां चिकित्सक पद्धतीनें निरीक्षण केलेलें पाहून चिकित्सक विचारसरणी ही रक्तपितितुल्य मानणारा ग्रंथकार निरीक्षण-काराला वरील वटवृक्षावरील विविध पक्ष्यांच्या सांगातीं कोठल्या तरी डहाळीवर बसवून ठेवील हें लेखक उमगून आहे! पण पुढील विवेचन हें धर्माच्या अनंत अंतराळांत तर्काच्या पंखांनीं उडूं पाहणाऱ्या समान सुपर्णांकरितां आहे हें आधींच सांगून टाकतों म्हणजे झालें.

# अनाचाराचा कर्दम

पाश्चात्य संस्कृतीची व पौर्वात्य पुराणपुरुषाची भेट बंगालमध्यें महाराष्ट्राच्या पूर्वी पन्नास-पाउणशें वर्षें पडली. त्या वेळी परिस्थितीच अशी होती कीं, पाश्चात्य मोहिनीचा कटाक्ष पुराणभारताच्या जिव्हारीं बसावा. बौद्ध आणि बौद्धांतून उद्भूत झालेला तांत्रिक पंथ याचा अंमल बंगालमध्यें जारी होता. बौद्धधर्माच्या संचारामुळें जातिबंधनें आधींच शिथिल झालीं होतीं, व तांत्रिक पंथांत तर अहिंदु मुलींशीं लग्नें लावण्याची व मद्यसेवनाची मुभा होती. इतिहासप्रसिद्ध राजा नंदकुमार यांची 'शक्ति' म्हणजे स्त्री ही पठाण जातीची होती. पठाणांच्या स्वाऱ्यांमुळें मूर्तिभंजक इस्लामी धर्माचीहि इतकी छाप बसली होती की, भाविक लोकांच्या तोंडींहि गंगास्नानाच्या वेळीं वाल्मीकि मुनींचें गंगाष्टक जाऊन दाराबझागी यांचे दोहरे येऊं लागले होते! वैष्णव धर्माचें विपयी धर्मांत रूपांतर झालें होतें व शाक्तांतील मद्यप्राशन व बलिदान यांचें नुसतें प्रस्थ माजलें होतें. तत्कालीन एक सुप्रसिद्ध राजे कृष्णचंद्रराय यांनीं आपल्या उपास्यदेवतेस त्रेसष्ट हजार पांचशें एकुणनव्वद बकरे गुणोत्तर वाढीनें बळी दिले असें प्रतापचंद्र मुजुमदार लिहितात. शिवाय अग्निनारायणास सतीदान, गंगानदीस अपत्यदान, प्रयागास कर्वत घेणें, आणि जगन्नाथाच्या रथाखालीं देह समर्पण करणें असले अज्ञानमूलक अनाचारहि अगदींच तुरळक नव्हते. विधर्मी लोकांच्या जाचामुळें व सहवासामुळें कुलभ्रष्टता वाढून कुलीन घराण्यांचें माहात्म्य इतकें बेताल वाढलें होतें कीं, कुलीन घराण्यांत मुलगी देण्याच्या हव्यासामुळें एका एका पुरुषास पंधरा-पंधरा, वीस-वीस बायका स्वीकाराव्या लागत. अशा स्थितींत एका बाजूनें गळयांत माळ पडल्यापासून सबंध हयातींत एकदांहि पतीशीं गाठ न पडल्यामुळें अनाचार माजणें, किंवा दुसऱ्या बाजूनें एवढ्या मोठ्या घोळक्यांतील स्त्रिया पति मेल्यानंतर दारिद्र्यामुळें अपरिहार्य होणाऱ्या हालांपेक्षां सती जाणें श्रेष्ठ मानूं लागणें साहजिकच होतें. आर्थिक दृष्टया पठाणांच्या स्वाऱ्यांमुळें दारिद्र्य वाढत चाललें होतें व त्यांतच दुःखावर डागण्या म्हणून ज्या थोड्या जमीनदारांच्या आश्रयाला संपत्ति राहिली होती ते माकडांच्या लग्नासारख्या फंदांत लाखों रुपये उडवून तिची विटंबना करीत होते. राजकीय सत्ता मुसलमानी नबाबांच्या हातीं, आणि त्यांची दानत ही

कीं, यात्रेकरू यात्रेस चालले असतां नदीच्या मध्यभागीं नौका बुडवावी व मग तडफडणारे यात्रेकरू वैकुंठास कसे जातात याची गम्मत पाहावी !

ही कृष्ण पार्श्वभूमि लक्षांत घेतली म्हणजे पश्चिमेकडून आलेल्या नव्या श्वेतवर्ण संस्कृतीस नवशिक्षित कां भाळले व राममोहन रायांच्या तोंडून 'धर्मतत्त्वाचें मीं जें सतत पुष्कळ संशोधन केलें त्यांत ख्रिस्तानुशासन हेंच साऱ्या धर्मांत विशेष नीतिसंवर्धक व बौद्धिक जगास अधिक उपयोगी असें मला आढळलें'; किंवा 'ज्या देशांत केवळ जन्मावर श्रेष्ठ जातीची मान्यता ठरवितात त्या आमच्या देशांत ज्ञानार्जन व नीतिधर्म यांचा ऱ्हास झपाट्यानें झाला असल्यास नवल काय ?' (पृ. ७५-७७) असे क्वचित् उद्गार कां निघावे, अथवा ब्राह्मांतील अत्यंत भावनाप्रधान जे केशवचंद्र त्यांच्या तोंडून 'खरोखर ही मोठी आमच्या भाग्याची गोष्ट कीं, ख्रिस्ती मिशनरी जगदुद्धाराकरितां ख्रिस्ती धर्म शिकविण्यास निघाले, तेव्हां हिंदुस्थानचा त्यांना विसर पडला नाहीं. कारण आम्हां नेटिवांचें अन्तःकरण अत्यंत संकुचित व स्वार्थी असून भावना व आकांक्षा कुरत्या होत'. (पृ. २३०) असले तारे कां तोडले जावेत हें लक्षांत येईल.

## विचारवंतांची भुरळ

पूर्वीच्या मुसलमानी अमलांतील जुलूम व रांगडेपण आणि धार्मिक जीवनांत शिरलेले अज्ञानमूलक अनाचार यांना कंटाळलेल्या लोकांनीं पाश्चात्यांचें उदारब्रुव शिक्षण मिळतांच त्यांचे भाट बनावें हें अगदींच अस्वाभाविक नव्हतें. अलीकडे इंग्लंडचा पायघोळ संतपणा व खरें अन्तरंग पूर्ण कळून आल्यावरहि मिल्ल-मोर्लेसारख्या तत्त्वज्ञान्यांच्या तात्त्विक निःस्वार्थ उद्गारांवर आपल्याकडील प्रो. चिं. गं. भानूसारखा एखादा ज्ञानवृद्ध इतिहासज्ञ विद्वानहि विसंबतांना दिसून येतो, तर त्या वेळची गोष्ट कशाला ? 'विविधज्ञानविस्तारां'त मॅक्स्विनी-च्या 'स्वातंत्र्याचीं मूलतत्त्वें' या ग्रंथाचें परीक्षण करीत असतां प्रोफेसर मजकूर लिहितात 'या ग्रंथांत कोठें कोठें इंग्रज सरकारासंबंधानें अनुदार भावना प्रगट झाली आहे. पण नेपोलियनसारखा जगज्जेता तेलातुपाचे शेठजी म्हणून इंग्लंडची कितीहि कुचेष्टा करो, एक गोष्ट निभ्रान्त आहे कीं, ब्राइट, मिल्ल, ग्लॅडस्टन, मोर्लेप्रभृति निस्सीम स्वातंत्र्याचे व्यास नुसत्या इंग्लंडच्या

स्वातंत्र्याचे नव्हत, ज्या राष्ट्रांत निर्माण होतात, ज्या राष्ट्रानें कुलीन लॉर्डो-पासून कुलीबेगाऱ्यांपर्यंत सर्वांना स्वराष्ट्रांत व्यक्तिस्वातंत्र्य दिलें, ज्या राष्ट्राच्या अनुग्रहानें 'दास' ही संस्था बहुतेक नामशेष झाली, तें राष्ट्र स्वतःच्या फायद्यासाठीं किंवा केवळ इज्जतीसाठींच आयर्लंडसारख्या राष्ट्र होऊं घातलेल्या देशाला स्वातंत्र्याची पायधूळहि लागूं देणार नाहीं हें म्हणणें अनुभवविरुद्ध दिसतें.' अशा प्रकारचे उद्गार एका प्रसिद्ध वयोवृद्ध, ज्ञानवृद्ध लेखकानें अलीकडच्या काळांत, म्हणजे ज्या मॅक्स्विनीवर अनुदारपणाचा ताशेरा झाडण्यांत आला आहे त्या मॅक्स्विनीचेंच ऐशीं दिवसांचें अपूर्व उपोषण व लोकोत्तर अंत इंग्लंडांतील 'व्यासांनीं' डोळ्यांत टिपूस न आणूं देतां निष्ठुर निलाजरेपणानें कसा पाहिला हें कळून आल्यावरहि व उच्चतम स्वातंत्र्यांत जुन्या जगाच्या पुढें आपण भरारी मारली आहे असें बरळणाऱ्या विश्वस्वास्थ्यपुराणकार विल्सन यांच्या अमेरिकेंत आशियांतल्या लोकांना घरदार करणेंहि कायद्यानें निषिद्ध कसें ठरलें आहे हें पक्कें समजून आल्यावरहि काढले आहेत, तर राममोहन व केशवचंद्र हे त्या काळीं भाळून गेले तर नवल कसलें? शिवाय गुलामगिरीविरुद्ध युद्ध त्याच वेळीं सुरू होतें व कोणत्याहि हेतूनें का होईना, पण इंग्लंड गुलामगिरीविरुद्ध लढत होतें. तसच, यंत्रशक्तीबरोबर धडाडत चाललेल्या महत्त्वाकांक्षेचें भीषण भक्षक स्वरूपहि अद्याप नांवारूपास यावयाचें होतें. आणि व्यक्तिशः राममोहन, केशवचंद्र वगैरेंचें विलायतेंतील स्वागत फारच अपूर्व प्रकारचें केलें गेलें. या सर्व गोष्टींचा साकल्यैंकरून परिणाम झाल्याशिवाय कसा राहील?

## उल्लूंचा नंगानाच

आतां विचारवंतांना जेथें भुरळ पडली तेथें भावनाप्रधान उल्लूंनीं तारे तोडावे किंवा हुरळून जाऊन मोकाट स्वैराचार आरंभावा हें ठरलेलेंच. शाक्त पंथामुळें पंच 'मकार' लोकांच्या पूर्वीच परिचयाचे होते. आतां त्यांतील नैमित्तिकपणा लोपून कांहीं काल ते नित्यांतच मोडूं लागले. याच सुमारास भरीस भर म्हणून फ्रेंच क्रांतींतून निघालेल्या स्वातंत्र्यकल्पनांचे वारे प्यालेला व धर्मकल्पनांस कस्पटासमान लेखणारा डेरोझिहो नांवाचा एक तरुण हा प्रोफेसरच्या जागेवर आला. या कलिपुरुषाच्या शिकवणीनें विद्यार्थिवर्ग पार

बहकून गेला. इतका कीं, 'संध्यावंदन, स्तोत्रपाठ वगैरे करण्याच्या प्रसंगीं मुद्दाम उपहासबुद्धीनें ते इलियडमधील कविता म्हणत, आणि आम्हीं सर्व धर्मबंधनें झिडकारलीं हें दाखविण्याकरितां ते वाटेल त्या खाद्यपेयाचें सेवन करीत. एक दिवस तर त्यांनीं कळसच केला. पुढें लवकरच ख्रिस्ती पाद्री झालेल्या बानर्जी नांवाच्या एका बंगाली गृहस्थाच्या नेतृत्वाखालीं ते एका घरांत शिरले व तेथें गोमांसावर यथेच्छ ताव दिला. इतकेंच नव्हे, तर तेच तुकडे हातांत घेऊन भर रस्त्यांतून उद्दामपणें मिरवीत जाऊन कित्येक धर्मनिष्ठ माणसांच्या घरांत मुद्दाम फेकून दिले! या निंद्य अत्याचाराचा परिणाम शेवटीं फौजदाऱ्यांत होऊन कित्येकांस शिक्षाहि झाल्या.' (पृ. ४५).

शिवाय मिशनऱ्यांची कारवाई सुरूच होती. १८४५ च्या उन्हाळ्यांतील एका सकाळीं देवेंद्रनाथ नित्याप्रमाणें वर्तमानपत्रें वाचीत असतां राजेंद्रनाथ घाईघाईनें येऊन रडवेपणानें सांगूं लागला, "गेल्या रविवारीं माझी बायको आणि माझा धाकटा भाऊ उमेशचंद्र याची बायको गाडींत बसून कोठें चाललीं असतां उमेशचंद्र कोठून येऊन त्यानें ती गाडी गाठली व गाडींतून आपल्या अल्पवयी बायकोस जबरदस्तीनें काढून घेऊन दोघेंहि डॉ. अलेक्झांडर डफ या पाद्र्याकडे गेलीं. माझा भाऊ या पाद्र्याच्या शाळेंतील विद्यार्थी आहे. माझ्या वडिलांनीं त्यांना परत आणण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, पण व्यर्थ. मग आम्ही सुप्रीम कोर्टांत फिर्याद दिली. तीहि काढून टाकली. या अल्पवयी मुलांस बाटवूं नका अशी पाद्र्याची आम्हीं पुष्कळ विनवणी केली, पण आमचें कांहीं न ऐकतां त्यानें काल संध्याकाळीं शेवटीं दोघांस बाप्तिस्मा दिला."

मद्यप्राशनाचा तर सुळसुळाट झाला होता. साने गुरुजी यांनीं ईश्वरचंद्र विद्यासागर यांचें जें चरित्र लिहिलें आहे त्यांतहि त्या काळचे प्रसिद्ध कवि मायकेल मधुसूदन दत्त हे दारूच्या निशेंत नेहमीं कसे धुंद असत व तिच्या पायीं वडिलांची गजान्त जिंदगी त्यांनीं कशी उधळली याचें वर्णन आलें आहे. स्वकीयांच्या भावना लक्षांत न घेतां पवित्र मानलें गेलेलें यज्ञोपवीतहि पुष्कळांनीं बेमुर्वतखारपणें तोडून टाकलें. जुन्या वळणांतील लोकांच्या हे प्रकार जिव्हारीं बसत. एकदां तर आपला मुलगा राखलदास हलदर यानें यज्ञोपवीत तोडून टाकलें हें ऐकून त्याचा वृद्ध पिता दुःखानें इतका वेडा झाला कीं, त्यानें तत्काळ सुरीनें आपली मान उतरून टाकली!

## सुधारकांची कामगिरी

पण नवविचारांच्या धरणीकंपांनीं धर्माचा इमला अशा रीतीनें कोसळूं लागला असतां, राममोहनादि ब्राह्म पुढाऱ्यांनीं कांहीं कामगिरी बजावली असेल तर ती हीच कीं, ह्या इमल्याचे कोसळणारे भाग त्यांनीं भरून काढून तो इमला सुरक्षित ठेवला. ही दुरुस्ती चालू असतां कालाच्या तडाख्यांत जीर्ण झालेल्या व आंतून पोखरल्या गेलेल्या कांहीं वासे व तुळया त्यांना काढाव्या लागल्या तर कांहीं नव्या बसवाव्या लागल्या. पण तें अपरिहार्यच असतें. ब्राह्म पुढाऱ्यांपैकीं ख्रिस्ती धर्माच्या मेंढवाड्याच्या रस्त्यावर जास्तींत जास्त पुढें गेलेलें व ख्रिस्ती मेंढपाळांना हें आतां आपल्या कळपांत खास येणार असें वाटूं लागलेलें कोंकरूं म्हणजे केशवचंद्र सेन होय. पण ओंठांवर पडलेलें हें जांभूळहि ख्रिस्त्यांच्या पोटांत गेलें नाहीं! ख्रिस्त्यांची लयी, त्यांचें अघमर्षण, त्यांच्या प्रार्थना, त्यांचें प्रभुभोजन वगैरे अनेक गोष्टी यांनीं उचलल्या, पण प्रार्थनेंत बायबलाऐवजीं उपनिषदांतील वाक्यांनाच अग्रस्थान दिलें. राममोहन, देवेंद्र, रवींद्र, सीतानाथ वगैरे ब्राह्मपुढारी तर उपनिषदांचा हरहमेष उपयोग करीत व करतात. राममोहनांनीं विलायतेंत आपल्याबरोबर ब्राह्मण व दुभत्या गाई नेल्या होत्या. फ्रान्सच्या राजानें त्यांच्या सन्मानार्थ दोनदां दरबारी खान्याचा बेत केला. तेव्हांहि त्यांनीं भात व पाणी यांसच नुसता स्पर्श मात्र केला. अंतकाळीं ते प्रणवाचा जप करीत होते व त्यांचें और्ध्वदेहिक हिंदु पद्धतीप्रमाणेंच उरकण्यांत आलें. देवेंद्रांनीं प्रथम यज्ञोपवीताचा त्याग केला होता, पण मागाहून पुन्हा ते तें धारण करूं लागले. सार्वजनिक प्रार्थनांची टूम प्रथम सुरू करण्यांत आली तेव्हांहि ख्रिस्ती धर्तीच्या प्रार्थनेबरोबरच तेलंगी ब्राह्मणांकडून सामवेदाचें गायनहि करविण्यांत येई. अशा रीतीनें पाहूं गेलें तर ब्राह्मांच्या चळवळीमुळें ख्रिश्चन धर्माच्या हल्ल्यापासून झालें तर सुशिक्षितांचें रक्षणच झालें.

अशिक्षित व रानटी असे जे ख्रिस्त्यांच्या जाळ्यांत अडकूं लागले होते त्यांपैकीं हिंदुस्थानच्या ईशान्य कोपऱ्यांतील डोंगरी सर्वभक्षक जे लोक त्यांना नीलमणि चक्रवर्ति यांच्या खासीहिल्स मिशननें मोठ्या चिकाटीनें परत हिंदुत्वांत आणलें. या गृहस्थानें आपलें सारें आयुष्य या कार्यीं खर्ची घातलें व सतत पंचवीस वर्षांच्या परिश्रमानें पन्नास मैलांच्या डोंगराळ टापूंत चौदा ब्राह्मसमाज, चार शाळा व चार रुग्णालयें स्थापन केलीं.

तसेंच, हेंहि लक्षांत घेतलें पाहिजे कीं, पाश्चात्य संस्कृतींतील विकृत भागाचें आविष्करण करण्यांत ज्यांचे श्रम खर्ची पडत आहेत त्यांतहि विद्यमान ब्राह्म-पुढारी रवींद्रनाथ टागोर यांची प्रामुख्यानें गणना होत आहे. तेव्हां आर्य-धर्मानें उत्तर हिंदुस्थानांत धर्मांतराची लाट थोपविण्याचें जें महत्कार्य केलें तेंच कार्य थोड्याबहुत प्रमाणानें बंगालपुरतें ब्राह्मांनीं केलें. ग्रंथकारालाहि याची जाणीव नाहीं असें नाहीं. तो लिहितो, "पाश्चात्य संस्कृतींतील पहिली लाट थोपविण्याचा राममोहन यांचा बुद्धिपुरःसर प्रयत्न असो अगर नसो, पण त्यांच्या व्यक्ति-माहात्म्यानें व त्यांनीं स्थापन केलेल्या ब्राह्मपंथानें सुशिक्षितांचीं मनें आपल्या-कडे वेधून घेतलीं आणि नंतर मेकॉले साहेबांसारख्या विघ्नसंतोषी मुत्सद्द्यांचें संस्कृतिविजयाचें सुखस्वप्न लवकरच मावळलें एवढें खरें (पृ. ३०). आतां लाट थोपवून धरण्याचा प्रयत्न करीत असतां लाटेचें कांहीं पाणी नाकातोंडांत गेलें तर नवल कसलें ? तेव्हां संक्रमणकालांत धर्माची इमारत कोसळत असतां कांहीं जुना भाग तोडावा लागला व नवा जोडावा लागला तर वाडवडिलांपासून चालत आलेल्या जुन्या वाड्याच्या अभिमान्यांनींहि डागडुगी करणाऱ्याकडे सहानु-भूतीनेंच पाहावयास नको कां ?

पंजाब व बंगाल या दोन भागांतील आर्यसमाज व ब्राह्मसमाज यांच्या कामगिरीवर टीका करतांना महाराष्ट्रीय लेखकांनीं तर हें ध्यानीं बाळगलें पाहिजे कीं, महाराष्ट्रावर आले त्यापेक्षां किती तरी पटीनें अधिक निकराचे परं-धर्मीय हल्ले पंजाब व बंगालवर आले होते. महाराष्ट्रावरहि मुसलमानी अम्मल जारी होतांच व्रतवैकल्यांना छाट मारून 'तोंवरि साधन हरिनाम कीर्तन' असें धर्मास संक्षिप्त रूप देणें प्राप्त झालेंच कीं नाहीं ?

परकीय संस्कृतीचे वादळी वारे ज्या प्रांतीं फार उशिरां पोंचले तो प्रांत मद्रास होय, आणि याच कारणास्तव अस्पृश्यांना सार्वजनिक रस्ते वापरण्यासहि मनाई करणारा अस्सल कर्मठपणाचा गाभा कोठें असतां तर तोहि मद्रासच होय! पण याचा अर्थ मद्रासी लोक धर्मनिष्ठ व पंजाबी धर्मलंड असा नव्हे. परकीयांशीं लढतांना आपणांतील जातिभेद व अस्पृश्यता हीं मर्मस्थानें आहेत हें उत्तरहिंदुस्थानांतील लोकांना चांगलेंच जाणवलें व त्यामुळें या दोहींना आळा घालणें त्यांना अपरिहार्य वाटलें. शिवाय सनातनधर्म व हिंदुसमाज-घटना यांत खोल रुतलेलीं वरील शल्यें आजकालच नव्हे तर पुरातनकालापासूनच

समाजशरीरीं खुपूं लागलेलीं असून गौतम बुद्धापासून तों आजतागायत महानुभाव, लिंगायत, नानक, दादू, आर्य वगैरे अनेक धर्मपंथांनीं हीं शल्यें उपटून टाकण्याचा प्रयत्न केला आहे. हाच इतर धर्मसुधारकांचा कित्ता ब्राह्मांनींहि गिरविला.

पण ब्राह्मांच्या लढ्याला याशिवाय असें आणखी एक स्वतंत्र स्वरूप आहे कीं, ज्यामुळें इतर धर्मपंथांपेक्षां ब्राह्मपंथांत कांहीं वैशिष्ट्य उत्पन्न झालें आहे, आणि या वैशिष्टयामुळेंच ग्रंथकाराचा ब्राह्मांवर विशेष रोष आहे.

## ब्राह्मांच्या लढ्याचें विशिष्ट स्वरूप

ब्राह्मधर्माच्या लढ्यांतील हें विशिष्ट स्वरूप म्हणजे ब्राह्मधर्मास भौतिक शास्त्रसंस्कृतीस तोंड द्यावें लागलें हें होय. आधुनिक शास्त्रीय युगाच्या पूर्वी दोन संस्कृतींची घसट होई तेव्हां सामने होत ते दोहोंतील धर्मांचे मुख्यतः होत. पूर्वीच्या संस्कृतीचा धर्म हाच प्राण समजला जाई व राजकारण, समाजव्यवस्था, वाङ्मय-कला वगैरे मानवी संसारविश्वांतील ग्रहोपग्रह हे सर्व धर्मसूर्याभोंवतींच फिरत व त्यापासून त्यांना तेज मिळे. पण दोन धर्मांचा विरोध आला असतां एकापेक्षां दुसरा सरस किंवा नीरस ठरविण्याच्या कामीं त्रयस्थ युक्तिवादास कोणीच सुपारी देत नसे. प्रत्येक धर्मांतील अंतिम निर्णयाची भिस्त आप्तवाक्यावर, व प्रत्येक धर्माचें आप्तवाक्य स्वतंत्र. यामुळें एका आप्तवाक्याच्या भाल्याची फेक दुसऱ्या तुल्यबल आप्तवाक्याच्या फेकीनें परतवितां येत असे. पण नव्या शास्त्रीय संस्कृतीचा मारा चौफेर असल्यानें एकांगी आप्तवाक्याच्या ढालीनें सर्वांगाचें रक्षण करणें कठीण होऊं लागलें आहे.

पूर्वीच्या धर्मप्रधान काळीं आप्तवाक्याची विशाल ढाल अभंग स्थितींत असतांहि युक्तिवादाचे बाण अगदींच बोथट ठरत असत असें नाहीं. हवापाण्याच्या। अहर्निश माऱ्यांनीं प्रचंड खडकहि झरून जावेत तद्वत् युक्तिवादाच्या व बदलल्या परिस्थितीनें मिळणाऱ्या साक्षात् अनुभवाच्या संतत माऱ्यानें आप्तवाक्यांत भेगा पडत व क्वचित् स्फोटहि होत आणि 'दृष्टो धर्मव्यतिक्रमः साहसं च पूर्वेषां' (आपस्तंब) किंवा 'व्यवहारो बलीयान् धर्मस्तेनावधीयते' (नारद) असें म्हणण्याची पुष्कळ वेळा पाळी येई; पण अशा वेळीं समन्वयाचें धोरण स्वीकारून आप्तवाक्यांतील चिराळलेला भाग नवीन अनुभवाच्या लुकणानें भरून काढला जाई व भिन्न धर्मांच्या युद्धाचा शेवट तडजोडीच्या तहानें गोड करून

घेतला जाई. आर्यावर्तांतील अशा प्रकारचा पहिला लढा आर्य व अनार्य यांत सुरू झाला व आर्यांची प्रथमपासूनच सरशी होत होती, तरीहि कायमचा संबंध ज्यांच्याशीं येणार त्या अनार्यांचें नररुंडमालधर स्मशानवासी शिवदैवत अंतीं त्यांना स्वीकारावें लागलें. सनातनीयांचा दुसरा सामना बौद्धांशीं झाला; त्यांतहि अंतीं सनातनीयांचा विजय झाला. तरीहि या विजयोत्सवप्रसंगीं दशावतारांची पूजा करतांना शत्रूंचा नायक व निःसीम निरीश्वरवादी जो बुद्ध त्याला ईश्वरी अवतार मानावें लागलें. शिवाय यज्ञकुंडांतील अग्नि जो एकदां कोळपला तो कुमारिल-भट्टासारख्याच्या प्रयत्नानेंहि फिरून उज्ज्वल झाला नाहीं व तत्त्वज्ञानाच्या प्रांतांतहि 'नवयुगधर्म'कारांच्या संप्रदायाच्या गुरुस्थानीं असणाऱ्या शंकराचार्यांनाहि बौद्ध तत्त्वज्ञानाशीं इतकें मिळतें घ्यावें लागलें कीं, भिन्न संप्रदायी त्यांना उघड उघड प्रच्छन्नबौद्ध म्हणून संबोधूं लागले.

पण आधुनिक शस्त्रांचा हल्ला जसा अभूतपूर्व तसा नव्या शास्त्रीय संस्कृतीचा हल्लाहि पूर्वीच्या हल्ल्यापेक्षां अधिकें तीव्रतेनें जाणवल्यावांचून राहणार नाहीं. कारण शास्त्रीय युक्तिवादाची पकड कित्येकदां अशी घट्ट असते व पुरावा इतका डोळेफोड बिनतोड असतो कीं, केवळ आप्तवाक्याशीं तो फटकून वागतो एवढ्याचकरितां त्याचा धिक्कार करणें अशक्य होऊन बसतें. उदाहरणार्थ, रेड्याकडून संहितापाठ म्हटला जाणें शक्य आहे कीं नाहीं हें ज्ञानेश्वरांच्या सन्निध असतील त्यांनाच कळणें शक्य; पण शास्त्रीय युगांतील निर्जीव फोनोग्राफ तानसेनी ताना घेऊं शकतो कीं नाहीं हें आतां एखादा गांवढ्याहि सांगूं शकेल; त्याला एडिसनचें आप्तवाक्य जरूर नाहीं. तसेंच रामदास व शिवाजी सज्जनगड व रायगड यांवरून परस्परांशीं बोलत असत हें फक्त त्यांचें त्यासच माहीत; पण रेडिओच्या साहाय्यानें मुंबईचा फ्रामजी शेट कलकत्त्याच्या गोहरजानचें गाणें ऐकूं शकतो ह्यावर विश्वास बसण्यास आतां मार्कोनीच्या श्रुतीची जरूरी नाहीं. पूर्वीच्या योगमार्गीय गूढवादाला कांहींसे पोषक असे हे शोध पाहिले, म्हणजे क्षणभर समाधान वाटतें. पण भूतकालीं मनुष्याचे बापजादे झाडावरून उड्या मारणारे वानर होते, व भविष्यकाळीं पृथ्वीचा गोल थंड होत होत अंतीं कर्मभूमि मानलेला हा भूलोक मानवी वस्तीस अशक्य ठरेल असल्या धार्मिक बुद्धीस डंख मारणाऱ्या कल्पनाहि शास्त्रीय शोधांनीं स्थिर होत चालल्या आहेत, याकडे डोळेझाक कशी करणार ?

## शास्त्रीय ज्ञानाशीं टक्कर

ब्राह्मांच्या परिस्थितीचें निरीक्षण करतांना त्यांनीं नुसत्या ख्रिश्चन धर्माशींच लढावयाचें नसून या नव्या वर्धिष्णु शास्त्रीय संस्कृतीचीहि व्यवस्था लावावयाची होती हें ध्यानांत घेतलें पाहिजे. इकडे राममोहन रायांनीं ब्राह्मधर्माची मुहूर्तमेढ बंगाल्यांत रोवली त्या वेळीं तिकडे युरोपमध्यें जुन्या धर्माच्या मेढी शास्त्रीय शोधांच्या भूकंपांनीं डळमळूं लागल्या होत्या. तुलनात्मकपद्धति व ऐतिहासिक दृष्टि या मुलूख-मैदान व महांकालीच्या साहाय्यानें रूसोप्रभृतींनीं नुसत्या धर्मावरच नव्हे तर जुन्या परंपरेंतील तत्त्वज्ञान, राजकारण, समाजव्यवस्था या सर्वांवर अश्रद्धेचे गोळे टाकण्यास सुरुवात केली होती. हा हल्ला परतविण्याकरितां उलट बाजूचे वीरहि कमरा कसून सन्नद्ध झाले होते. इंग्लंड-मध्यें धार्मिक बाबतींत परंपरा जागविण्याचें कंकण कार्डिनल न्यूमननें बांधलें होतें, तत्त्वज्ञानांत गूढवादाचा पुरस्कार करण्यास कोलरिज बद्धपरिकर झाला होता, व राजकारणांत पूर्वपरंपरेचा कोट रक्षण करण्यास बर्क आपल्या अमोघ वक्तृत्वास्त्राचा वर्षाव करीत होता. या युद्धाच्या चकमकी अद्यापहि संपल्या नसून डार्विनच्या माताचीं वाद्यें जुन्या ख्रिस्ती मशिदींपुढें वाजूं लागलीं कीं, अजूनहि “दीन दीन” “तोबा तोबा” ऐकावयास सापडतो.

थोड्या वर्षींपूर्वीच डार्विनचें मत शिकविणाऱ्या शिक्षकावरील अमेरिकेंतील खटला व इंग्लंडमधील त्याच मतवाल्यावर पाद्र्यांनीं टाकलेला बहिष्कार हे प्रसंग ताजेच आहेत. हें युद्ध आजच संपणार नसून तें केव्हां संपेल हें आज सांगतां येण्यासारखेंहि नाहीं. पण गेल्या शंभर वर्षांतील याचें स्वरूप पाहिलें तर लोकशाहीविरुद्ध कंठशोष करणाऱ्या बर्कच्या पक्षाचा कंठ शुष्क झालेला दिसत आहे. तत्त्वज्ञानांत कोल्रिज, कांट, शोपेनहार वगैरेंचा गूढवाद कॉनन-डॉइल, आलिव्हर लॉज वगैरेंनीं चालू ठेवला असला तरी कांट, स्पेन्सर वगैरे तर्कप्रामाण्य-वाद्यांनाहि निष्ठावंत अनुयायी मिळूं लागले आहेत. धार्मिक बाबतींत 'रोमच्या धर्माध्यक्षाची आज्ञा शब्दशः पाळण्यांतच कल्याण आहे' ह्या मताचा आरंभीं मोठ्या अट्टाहासानें पुरस्कार करणाऱ्या न्यूमनला स्वतःलाच पुढें असे कटु अनुभव आले कीं, रोमन कॅथोलिक धर्माच्या जीर्णोद्धाराकरितां त्यानें ज्या ज्या गोष्टीस हात घालावा त्यांत त्यांत पोपकडूनच त्याचा हिरमोडच व्हावा. जुन्या

धर्माची तळी उचलून धरण्याकरितां त्यानें 'पोपवाक्यं प्रमाणं' हें सूत्र स्वीकारलें होतें; मात्र पोपचें वाक्य हें प्रमाण असलेंच पाहिजे असें न मानतां प्रमाण असणें संभवनीय आहे येवढेंच तो मानी. पण निःसीम सनातनी लोकांना एवढेंहि पसंत न पडून न्यूमनच्या नाकावर टिच्चून पोपभगतांनीं १८७० सालीं एक अखिल खिश्चन पंडितांची सभा बोलावून 'पोपवाक्य हें स्वभावातःच स्वतःप्रमाण व तर्कातीत होय' असा धाडसी ठराव पास केलेला पाहून न्यूमनसारखा परंपराभक्तहि शेवटीं हवालदिल झाला. शिवाय असल्या एकांतिक परंपरावाद्यांना उलट अहेर म्हणून रशिया व तुर्कस्तान यांनीं धर्माला अजीबात बहिष्कृत करून टाकलें आहे हेंहि लक्षांत घेण्यासारखें आहे. आतां धर्म व भौतिकशास्त्र यांच्या झगड्यांत शंभर वर्षांचा काळ हा कदाचित् फार अल्पहि ठरेल; पण या शंभर वर्षांत भौतिकशास्त्रांना दिवसेंदिवस अधिक तेज येत चाललें आहे हें या ठिकाणीं लक्षांत घेतलें म्हणजे पुरे.

## धर्माची पुनर्रचना

आतां राममोहनादि ब्राह्मांनीं सनातन धर्माची जी पुनर्रचना केली त्यांतहि खिश्चन धर्मापेक्षां या नव्या चिकित्सक मतांचाच अधिक संग्रह केलेला आढळून येतो. अनेक धर्मग्रंथांचें वाचन व ग्रीक, हिब्रू, इंग्रजी, आरबी, संस्कृत, पाली वगैरे सतरा भाषांत अप्रतिहत संचार यामुळें त्यांची दृष्टि विशाल झाली होती. परक्या धर्माच्या वाचनानें आपला अभिमान नष्ट होईल ही भीति राममोहनांच्या अन्तःकरणांत उरलेली नव्हती. ते आपल्या शिष्यांना म्हणत, 'मी कुराण पुष्कळ वेळां पढलों आहे, पण मुसलमान कांहीं झालों नाही. तसेंच डॉ. विल्सन पहा, हिंदुशास्त्रांचा अभ्यास करूनहि अद्याप कट्टे खिस्ती आहेत. तेव्हां बायबल वाचण्यास तुम्ही भिऊं नका, तें वाचा व त्याचें सार ग्रहण करा.' इंग्रजी शिक्षणासाठीं त्यांनीं हिंदु कॉलेज स्थापलें त्याबरोबर संस्कृत शिक्षणाकरितां वेदान्त कॉलेज स्थापण्यांतहि पदरमोडीकडे पाहिलें नाही. त्यांच्यावर मुख्य छाप जी बसली ती जुन्या खिस्ती धर्माची नसून सर्वधर्मसंग्राहक व चिकित्सक जो एकेश्वरी पंथ त्याची होय. त्यामुळें सार्वजनिक प्रार्थनेसारखी एखादुसरी बाब त्यांनीं खिस्ती धर्मातून उचलली असली तरी खिस्त्यांच्या आहारीं ते मुळींच गेले नव्हते. उलट खिस्ती धर्मातील तर्कास न पटणाऱ्या गोष्टींचा ते स्पष्ट निषेध करून आपल्या धर्मातील तर्कशुद्ध बाबींचा प्रांजलपणें पुरस्कार करीत. मनुष्यप्राणी

प्रगमनशील असल्यानें एका काळीं ठरलेले धर्मसिद्धांत व विधि हे परिवर्तनशील असून प्रत्येक शास्त्रीय शोधाबरोबर ईश्वराचें स्वरूपहि अधिक सुव्यक्त होत जाणार असल्यानें ईश्वरस्वरूपाबद्दल निश्चित मत केव्हांच बाळगतां येणार नाहीं, अशा प्रकारचीं त्यांचीं मतें होतीं. अर्थात् येशु ख्रिस्ताला परमेश्वराचा अवतार न समजतां स्वलनशील सामान्य मानवच ते लेखीत. हिंदूंतील मूर्तिपूजेची व ख्रिश्चन धर्मांतील त्रयी, पापविमोचनविधि, अक्षय्य नरकवास इत्यादींची त्यांनीं सारखीच हजेरी घेतली आहे. ते म्हणत, 'रामदत्तात्रेयादि माणसासारख्या देवांच्या पांचट कल्पनांचा आम्हांस इतका वीट आला आहे कीं, त्याच कल्पना लूटपाटलेणवाल्या धर्मगुरूंनीं आमच्यापुढें मांडल्या म्हणून त्या आम्हांस पटतील असें मुळींच नाहीं' 'हे ख्रिस्ती धर्मवेडे पाखंड्यांची निंदा करतात, पण ईश्वरास कबूतराचें हास्यास्पद रूप देणारे ते स्वतः पाखंड्यांच्यापेक्षां जास्त सन्माननीय कसे तें समजत नाहीं.' हिंदूंच्या त्रिमूर्तीची कल्पना क्षणभर चिंतनीय तरी आहे, पण ख्रिस्त्यांचा त्रयीवाद त्यांचा त्यांसच उलगडत नाहीं.' 'मूर्तिपूजेपेक्षां मंदिरपूजा श्रेष्ठ होय. कारण मूर्तीप्रमाणें मंदिरास कोणी पूजा, नैवेद्य किंवा इतर अष्टभोग अर्पण करीत नाहींत व बळी द्यावयास रेडे व बोकडहि लागत नाहींत.' 'वेदान्ताप्रमाणें दम, शम, उपरति, तितिक्षा हेच पापक्षालनाचे खरे उपाय होत. आमच्या धर्माप्रमाणें पापक्षालनाकरितां ख्रिस्ती धर्मांतील अखेरच्या निवाड्यापर्यंत थांबावें लागत नाहीं.' 'गायी निरनिराळ्या रंगांच्या असल्या तरी दूध एकरंगीच असतें; तद्वत् निरनिराळ्या ऋषींनीं प्रणीत धर्म भिन्न भिन्न असले तरी सत्यधर्मपरिपालन हेंच सर्वांतील सार होय. आणि धर्म कोणताहि घेतला तरी ईश्वरप्राप्तीचा खरा मार्ग म्हणजे लोकसेवा हाच होय.' या राममोहनांच्या उक्तीवरून ब्राह्मधर्मसंस्थापकांची विचारसरणी कळून येईल. कोणताहि धर्म पूर्णावस्थेस गेलेला न समजतां तर्कास पटेल तेवढेंच सार प्रत्येकांतून मधुमक्षिकान्यायानें घेणें हें यांतील सार होय.

आतांपर्यंत हें दाखविलें कीं ब्राह्मांना नुसत्या ख्रिश्चन धर्माशींच टक्कर द्यावयाची नसून गेल्या शतकांत उदयास आलेल्या शास्त्रीय संस्कृतींतील महत्त्वाचा भाग म्हणजे ऐतिहासिक व तुलनात्मक दृष्टि ही पचनीं पाडावयाची होती. आतां या नव्या दृष्टीनें धर्माच्या आध्यात्मिक अथवा तत्त्वज्ञानात्मक,

आधिदैविक अथवा अवतारात्मक, व आधिभौतिक अथवा लौकिकव्यवहारात्मक अशा तीन स्वरूपांकडे न्याहाळून पाहून याविषयीं काय काय नवीन कल्पना ब्राह्मांनीं सुचविल्या व त्यांवर सनातनी बाण्याच्या ग्रंथकारानें काय शेरे लिहिले आहेत ते पाहूं.

## नववेदान्त

प्रथम, धर्माच्या तत्त्वज्ञानात्मक अन्तरंगांत ब्राह्मांनीं काय फेरफार केला तो पाहूं या. ब्राह्म हे स्वतंत्र विचारवादी असल्यानें पौर्वात्य किंवा पाश्चात्य आचार्यांपैकीं कोणाहि एका विशिष्ट आचार्याचें तत्त्वज्ञान त्यांनी सर्वस्वीं स्वीकारलेलें नाहीं. आधुनिक तर्कप्रधान शास्त्रीय संस्कृतीची तब्येत शक्य तितकी संभाळून आपला तत्त्वज्ञानसंसार मांडावयाचा अशी त्यांची भूमिका आहे. आतां ब्राह्मांना झालें तरी 'नेषा मतिस्तर्केणापनेया' असें म्हणण्याची पाळी येत नाहीं असें नाहीं. कारण तत्त्वज्ञानाच्या कांहीं प्रांतांत इतका गाढ अंधःकार आहे कीं, आजच्या मानवी बुद्धीच्या नेत्रांना तेथें कांहीं दिसूंच शकत नाहीं. अशा प्रांतांत संचार केलाच पाहिजे असें ठरविलें म्हणजे सर्वांनाच तर्कातीत असें कांहीं तरी अन्य साधन गृहीत धरावें लागतें. पण आजच्या शास्त्रीय शोधांच्या मशालीनें जितका प्रदेश उजाळतां येईल तितका उजळण्याचा प्रयत्न आधुनिक तत्त्वज्ञ करीत असतात. जुने सिद्धान्त नव्या दृष्टांतांनीं नटवावयाला अलीकडे शास्त्रीय साहित्य पुष्कळ उपलब्ध झालें आहे व त्याचा ब्राह्मांनीं उपयोग केला आहे. उदाहरणार्थ, इंद्रियांनीं प्रतीत होणाऱ्या ज्ञानाचें स्वरूप भ्रामक आहे हें दाखविण्याकरितां ब्राह्मांनीं अलीकडील शास्त्रीय दाखले दिले आहेत. एक अंतराची कल्पनाच घ्या. कोणताहि पदार्थ आपल्या नजरेच्या बाहेर कांहीं अंतरावर आहे असें आपणांस दिसतें; पण हा निव्वळ भ्रम होय. वस्तुतः आपणांस जें रूप दिसत असतें तें आपल्याच डोळ्यांच्या बाहुल्यांवरील उमटलेल्या पदार्थांचें चित्र होय. पदार्थ आपणांपासून निरनिराळ्या अंतरावर आहेत असें जें वाटतें तें प्रत्यक्ष ज्ञानाचें फल नसून अनुमानानें ठरविलेलें असतें. आंधळ्यास एकदम डोळे प्राप्त झाले तर सर्व पदार्थ एकाच पातळींत दिसतील. लहान मूल चांदोबा घेण्याकरितां हात पसरतें तें अंतराची कल्पना नसते म्हणूनच. वस्तुतः जें दृष्टीला दूर दिसतें तें दृष्टीला दूर नसून

स्पर्शाला दूर असतें. म्हणजे असें कीं, दूर दिसणाऱ्या पदार्थाजवळ जाऊन स्पर्श करण्यास किती अंतर चालावें लागेल याच्या अनुमानानें अंतराचा आडाखा आपण बसवीत असतों! दूरवरच्या पदार्थांच्या अन्तराची खरी कल्पना येण्यास मधला सगळा प्रदेश दिसावा लागतो. तो दिसला म्हणजे त्यावरून अन्तर अजमावलें जातें. मधला प्रदेश प्रतीत न झाल्यास अन्तराची कल्पनाच बांधतां येणार नाहीं. या मधल्या प्रदेशाशीं मनानें स्पर्श करून अंतर ठरविलें जातें. पण खुद्द हें स्पर्शज्ञान तरी कमी भ्रामक असतें असें नाहीं. लढाईच्या रुग्णालयांत असले प्रकार पाहावयास सापडतात. एकदां एका शिपायाचा सडलेला पाय तोडून टाकल्यावरहि तो वेदना पायांत होतात असेंच म्हणूं लागला. तसेंच दुसऱ्या एकाचें नाक कापलें व त्यावर कपाळाची कांतडी काढून लावली; पण मग नाकास स्पर्श केला तरी कपाळास केला असेंच त्यास वाटे. किंबहुना ज्ञान हें बाह्य पदार्थावर मुळींच अवलंबून नाहीं असें म्हटलें तरी चालेल. बाह्य पदार्थ मुळींच हजर नसतां, ज्ञानतंतूच्या ठिकाणीं विद्युत्साह्यानें नुसतीं कृत्रिम आंदोलनें उत्पन्न केलीं तर प्रकाश, ध्वनि सुवास वगैरेचें ज्ञान होऊं शकतें असें शास्त्रीय प्रयोगांवरून सिद्ध झालेलें आहे. एवंच, पूर्वाचर्यानीं प्रस्थापित केलेलें ज्ञानाचें भ्रामक स्वरूप ब्राह्मांनीं वरील सारख्या नव्या दृष्टांतांनीं नटविलें आहे.

## जडसृष्टींतील मन

पण ऐहिक जगांतील कर्तव्याकडे उत्साही वृत्तीनें पाहणाऱ्या ब्राह्मांना जगाचा संपूर्ण निरास मात्र मान्य नाहीं. आपल्याकडेहि प्रवृत्तिप्रेरक रहस्यकार व वेदान्ताकडे संप्रदायेतर दृष्टीनें पाहणार ' आधुनिक सुशिक्षितांचा वेदान्त 'कार यांनीं ' जगन्मिथ्या ' या सूत्राचा रूढ अर्थ मान्य केला नसून शंकराचार्यांनाहि तो अभिप्रेत नव्हता असें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. ब्राह्म असें प्रतिपादन करतात कीं ब्राह्मवस्तूंचे रूपरसादि गुण हे तर त्या पदार्थामध्यें असतातच पण या गुणांचा अनुभव घेणारें जें मन तेंहि त्या पदार्थोमध्येंच वास्तव्य करून आहे असें मानलें पाहिजे. तरच द्वैत आणि अद्वैत यांना एकत्र नांदावयास सापडेल. कारण कीं, असंख्य पदार्थांत असणारीं अशीं असंख्य मनें ज्या अधिष्ठानावर व्यक्त होतात तोच सर्वज्ञ परमात्मा होय. त्याच्या ठिकाणीं सर्व पदार्थांतर्गत मनांचें एकीकरण होतें. जड सृष्टि म्हणून

आपण जी मानतों ती मनाच्या दृष्टीनें मनोमयच आहे. आतां मनाच्या जाणिवेच्या बाहेर पदार्थास अस्तित्वच नाहीं असें मानावें तर आपणास ज्ञात होतात तेवढेच पदार्थ विश्वांत समाविष्ट आहेत असें मानण्याची आपत्ति येईल. त्यावरहि ब्राह्मांचें उत्तर असें कीं, प्रत्येक पदार्थ हा ज्ञेय असलाच पाहिजे याचा अर्थ असा घ्यावा कीं तो व्यष्टीचा ज्ञेय असेल किंवा समष्टीचा असेल. व्यष्टि-मनाला कांहीं पदार्थ अज्ञात किंबहुना अज्ञेय असले तरी समष्टि-मनास असण्याचें कारण नाहीं. तात्पर्य व्यष्टिमन आणि समष्टि-नम या दोन तत्त्वांच्या जोरावर द्वैत आणि अद्वैत यांचा मिलाफ करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला आहे. तसेंच तार्किक मताच्या रस्त्यानें जाऊं लोगलें म्हणजे अज्ञेयवादाची जी अनुल्लंघनीय पर्वतश्रेणी आडवी येते, तथपर्यंत जाऊन हताश होणाऱ्या प्रवाशास ते म्हणतात कीं अनंत आकाश आपणास ज्ञात होत नसलें तरी, जेवढें ज्ञात होतें तेवढें आकाशच ना? मग याच न्यायानें ब्रह्माचें ज्ञातजगद्वारा जेवढें ज्ञान आज शक्य आहे तेवढें प्राप्त करून घेऊन अधिकाराकरितां खटपट करीत कां न रहा? हें ज्ञान कधीं काळीं तरी पूर्ण होईल कीं नाहीं याची व्यर्थ चिंता वाहण्यांत अर्थ काय? शास्त्रीय ज्ञानाच्या प्रगतीबरोबर ब्रह्माचें ज्ञान विस्तृत होणार हें निश्चित. तेव्हां येवढ्यावरच समाधान मानूं या. शिवाय ह्या ब्रह्मज्ञानाचें अंतिम साध्य तरी काय? मोक्ष? —मुळींच नव्हे. ब्राह्म म्हणतात, कीं आत्मसाक्षात्कार हें अंतिम ध्येय नसून खऱ्या धर्मबुद्धीस तेथून प्रारंभ मात्र होतो आणि आत्मौपम्यबुद्धि व लोकसेवा यांचें खरें मर्म कळण्यास नुसती सुरुवात मात्र होते. अशी ही ब्राह्मांची विचारसरणी आहे.

आतां सनातनी ग्रंथकाराचे यावरील शेरे काय आहेत ते पाहा. जुने सिद्धांत नव्या उदाहरणांनीं नटविणें हा कांहीं वस्तुतः गुन्हा नव्हे; पण ब्राह्मांच्या नव्या उदाहरणावर ग्रंथकार शेरा मारतो कीं, "विवर्तवादाच्या यक्षिणीची कांडी फिरविणाऱ्या वैदिक महामांत्रिकाचा खेळ न कळल्यामुळें युक्तिवादाच्या प्रशस्त मेजावर अनेक तर्कांची शास्त्रीय उपकरणें मांडून द्वैताद्वैताचे अपूर्व प्रयोग दाखविण्याचा आव मात्र आधुनिक पंडित आणीत आहेत." (पृ. ५६४). शंकराचार्यांनीं प्रतिपादिलेला विवर्तवाद हाच अंतिम व एकमेव सिद्धांत व तो सर्व श्रुतींनीं व ब्रह्मसूत्रांनींहि मांडलेला आहे अशी ग्रंथकाराची भूमिका आहे. पण या बाबतींत अनेक विद्वानांचें असें मत आहे कीं, 'द्वासुपर्णा'

सारख्या श्रुति ह्या द्वैतवाद प्रतिपादितात; आणि घट भिन्न व मिथ्या असले तरी मृत्तिका सत्य आहे असें सांगणाऱ्या 'मृत्तिका इत्येव सत्यं' अशा श्रुति ह्या जग अस्तित्वांतच नाहीं या रूढ मायावादी समजुतीशीं विरुद्ध होत. तसेंच ब्रह्मसूत्रांतील 'जगद्वापारवर्जम्' हें शेवटलें अधिकरण शांकर-सांप्रदायिक अद्वैताला प्रतिकूल होय. पण ब्राह्मांच्या किंवा इतर विद्वानांच्या मताला धूप घालण्यास ग्रंथकार तयार नाहींत. ते म्हणतात, "एकमेवाद्वितीयं" हा नुसता मतविश्वासाचा प्रश्न नसून अनुभवाचा आहे. पण खोल विचाराची व अनुभवाची आस्था ब्राह्मांच्या ठिकाणीं दिसत नाहीं, आणि खरा ब्रह्मानुभव येण्याच्या पूर्वीच आपलीं मतें ठासून सांगण्यांत ब्राह्मांनीं उतावळी केली आहे." (पृ. ५८६). अर्थात् ब्राह्मांना साक्षात्कार नाहीं म्हणून त्यांची वटवट व्यर्थ होय अशी ही दटावणी आहे. पण साक्षात्कार नाहीं हें कशावरून! ब्राह्मापैकीं देवेंद्र तर स्वतःला साक्षात्कार झाला होता असें ठामपणें सांगतात ना? मग त्यांचा साक्षात्कार खोटा आणि शंकराचार्यांचा खरा हें कशानें पारखावयाचें? शंकराचार्यांशिवाय इतर पंथी लोकहि आपले आचार्य साक्षात्कारी होते असेंच मानतात. मग त्यांच्या सिद्धांतांत भिन्नता कां? भिन्नता आपणांस दिसली तरी सर्व आचार्य एकच होत अशी एक सांप्रदायिक कोटी आहे. पण मग प्रतिपक्षाचें खंडन, स्वमताचें मंडन व आपलाच सिद्धांत खरा असा अभिनिवेश भाष्यांत आढळून येतो तो कां? पण हे कधीं न संपणारे वाद असल्यानें ते येथेंच सोडून देऊं.

## अहल्योद्धाराचें रूपक

तत्त्वज्ञानाचा प्रांत ओलांडून पुराणांच्या व दैवतांच्या प्रांतांत शिरलें म्हणजे विरोधाची भूमि अधिक तप्त झालेली दिसूं लागते. कारण तत्त्वज्ञानापेक्षां देव-देवतात्मक भागांत भावना दुखविल्या जाण्यास अवसर जास्त. येथें चिकित्सक बुद्धीनें कितीहि हलका हात फिरविला तरी नाजूक भावनांना तो काट्यासारखा वाटणें अशक्य नाहीं. ब्राह्म म्हणतात कीं, "अवतार हें एक धर्मवेड होय. आम्हांस धर्मसुधारक व आधिभौतिक शास्त्रीयसंशोधक हे सारखेच थोर वाटतात. अर्थात् अवतारी पुरुषांत कांहीं अतिमानुष शक्ति मानाल तर त्या तोतयाकडे आम्ही ढुंकूनहि पाहणार नाहीं. राम किंवा कृष्ण या अवतारांच्या पूर्वी किंवा नंतर

जन्मास येणाऱ्या कोट्यवधि जीवांची सर्वथा उपेक्षा व्हावी अशी ईश्वराची नियती दिक्कालांनीं परिच्छिन्न असणें शक्य नाहीं." अवतारकल्पनेलाच काट मारल्यावर अवतारी पुरुषांच्या चरित्रांचें भाविक दृष्टि सोडून ऐतिहासिक चिकित्सक दृष्टीनें परीक्षण करण्यास डरण्याचें कारणच उरत नाहीं व या दृष्टीनें ब्राह्मांनीं आपल्या कल्पना मांडल्या आहेत. त्यांतली रवींद्रांची रामावताराविषयींची काव्यमय कल्पना ऐकण्यासारखी आहे; अहल्येच्या उद्धाराची कथा सर्वांच्या परिचयाची आहे. पण त्या कथेचा खरा अर्थ काय तो तुम्हांस कळला काय? रवींद्रबाबू सांगतात कीं, पूर्वी गौतम नामक आर्यानें दक्षिणेंत वस्ती करण्याचा प्रयत्न केला. परंतु त्यानें संपादन केलेल्या जमिनीनें अखेर दगा दिला. तेव्हां त्या विश्वासघात करणाऱ्या कठीण भूमीचा त्याला त्याग करावा लागला. पण हीच खडकाप्रमाणें अत्यंत कठीण भूमि शेवटीं रामानें लागवडीस आणली. कालांतरानें याच ऐतिहासिक गोष्टीवर अहल्योद्धाराच्या कथेचें रूपक बसविण्यांत आलें. सीतास्वयंवर हेंहि ह्या दीर्घकाल चाललेल्या प्रचंड उद्योगाचें असेंच एक केवळ रूपक होय. सीता म्हणजे कोण कळलें का? सीता म्हणजे शेती! ती रामास मिळावयाची; पण वाटेंत विंध्याद्रीची प्रचंड रांग होती. ही रांग म्हणजेच शिवधनुष्य. कारण विंध्याद्रींतील डोंगरी अनार्यांचें शिव हेंच दैवत होतें. इतर कथांवरहि रवींद्रांनीं अशींच रूपकें बसविलीं आहेत. यावर ग्रंथकार म्हणतो, 'वरील विचारसरणीनें अहल्या (खडकाळ जमीन), द्रौपदी (रानटी जमीन), सीता (लागवडीस योग्य जमीन), तारा (नदीकांठची सुपीक जमीन), मंदोदरी (भुसभुशीत जमीन) या पंचकन्या उत्तरेपासून कन्याकुमारीपर्यंतच्या निरनिराळ्या अक्षतभूमि ठरविल्या, सीताशुद्धि म्हणजे जमिनीचा राबरहाट मानला व प्रभु रामचंद्रांना एक थोरले वसाहतकार वॉशिंग्टन लेखलें तर केवढा अनर्थ गुदरेल याची रवींद्रांना कल्पनाहि दिसत नाहीं. या चिकित्सक पद्धतीनें श्रीरामकृष्णांच्या मंदिराखालीं सुरुंग पेरल्याप्रमाणें होईल. शंकर, मारुति वगैरे खेडोखेडीं असलेलीं ग्रामदैवतें अधिकारच्युत होतील व धर्मभावनेचे नाजूक तंतु तुटून भाविकांच्या मनाची वाताहत होईल.'

## रासलीलेचें समर्थन

कृष्णावतारांतील रासलीलेची अनेकांना चीड आलेली आहे. त्यामुळें कृष्ण ही

व्यक्तिच मुळांत खोटी होय असा ब्राह्मांनीं सिद्धांत मांडला आहे. बौद्धधर्मांत बुद्धाच्या जातककथा लिहिल्या गेल्या व त्यांना विशेष महत्त्व प्राप्त झालें असें पाहून सनातनीयांनीं कृष्णकथा रचिल्या असें त्यांचें मत आहे. ऋग्वेदांतील आठव्या मंडलांत कृष्ण नामक एका अनार्य योद्धयाशीं इंद्राचें युद्ध होऊन त्यांत कृष्णाचा नाश झाला असें वर्णन आहे. याच बीजभूत कथेवर वैदिक धर्मांतील कांहीं आचार नापसंत असलेल्या आर्य लोकांनीं गोवर्धनाच्या कथेंत इंद्राची फजीती दाखवून पूर्वीचें उट्टें काढलें आहे. राधाकृष्णांचे रास महाभारतांत मुळींच सापडत नाहींत. ते प्रथम ब्रह्मवैवर्त पुराणानें वर्णिले व तेव्हांपासून रासलीला हें एक भक्तिशास्त्रांतील प्रमुख वाङ्मय बनलें. याच ब्रह्मवैवर्त पुराणानें परस्त्रियांशीं केलेल्या रासावर अशीहि मखलाशी केलेली आहे कीं, कृष्णाला गोपी या मुळीं परस्त्रियाच नव्हत. कारण कीं, गो-लोकांत त्यांचा नित्य संबंध असतो. रासलीलेचा हा विक्षिप्त प्रकार अनेकांना त्याज्य वाटला आहे, पण आमच्या ग्रंथकारांना त्याची तरफदारी करणें अशक्य वाटत नाहीं. ते लिहितात, "भागवतामृतहि कडू लागत असेल त्यांना आंग्ल-विद्येचा ज्वर आला आहे असें खुशाल समजावें.' 'एक एक गोपीके प्रेम में हो गये कोटि कबीर' अशी गोपिप्रेमाची कबीरांनीं वाखाणणी केली त्या वाखाणणीपुढें अनुभवशून्य ब्राह्मांच्या बडबडीची मातबरी ती काय? ईश्वरानें राधाकृष्णरूपानें ज्यांना साक्षात् दर्शन दिलें असे महात्मे आजहि आढळतात. राधादेवी ही भक्तीची परम सीमा होय. मौंजीबंधन न झालेल्या बाल-कृष्णाशीं ती रत झाली याचा अर्थ कोणी कांहीं करोत. परंतु ज्यांचा देहभाव नष्ट झाला अशांच्या कथा विषयव्यवहारांत वागणाऱ्या विकारी मनास श्रद्धे-वांचून पटणें कठीण आहे. श्रीकृष्णचरित्रांत कोठें रूपकात्मक व अतिशयोक्त वर्णन असेल तर तें अभाविक बुद्धिमानाशिवाय दुसऱ्या कोणाच्या परमार्थास बाधक होणार नाहीं." श्रद्धावानाच्या श्रद्धेला रासलीलेंत विपरीत प्रकार दिसणार नाहीं व त्याची परमार्थबुद्धिहि विचलित होणार नाहीं हें ग्रंथकाराचें मत मान्य होण्यासारखें आहे; पण वाचक असें विचारील कीं, परमार्थांत झालें तरी प्रेमाचें मातृप्रेमासारखें शुद्ध सात्त्विक स्वरूप टाकून जारिणी प्रेमाचें रूपक योजणें अनुचित नाहीं का? आणि जर असेल तर मूळ श्रीकृष्णचरित्रांत हा रासलीलेचा प्रकार नसून मागाहून पुराणकारांच्या कल्पनेंतून तो अवतीर्ण

झाला आहे असें म्हटल्यानें धर्मभावनेला खरें म्हटलें असतां बरें वाटावें, मग ती चिडून कां जावी हें समजणें कठीण आहे.

पण ऐतिहासिक बुद्धीनें पूर्वीच्या ग्रंथांकडे पाहणें हेंच मुळीं पाप अशी ग्रंथकारानें समजूत करून घेतली आहे. ते म्हणतात, 'इंग्रजांच्या संसर्गानें जे कित्येक घाणेरडे रोग इकडे आले आहेत त्याचप्रमाणें संशोधन आणि चिकित्सा हे पंडुरोगासारखे दोन रोगच आमच्या सुशिक्षितांच्या मागें लागले आहेत.' हें वर्णन खरें असेल तर मोठा अनर्थ गुदरणार आहे. कारण या किळसवाण्या रोगानें आपणांतील अत्यंत विद्वान् अशा भांडारकर, टिळक, राजवाडे, वैद्य प्रभृति महनीय व्यक्ति पछाडलेल्या आढळून येतात. आणि यांच्या असंख्य शिष्यांना हा संसर्गजन्य रोग प्राप्त झाला असलाच पाहिजे असें अनुमान केलें, तर भारतपुरुषाचें सर्व शरीर लवकरच कुजून जाणार असें मानणें प्राप्त येणार! ग्रंथकार म्हणणार असें व्हावयाचेंच. हा सारा कलियुगाचा परिणाम. पण ग्रंथकारांना पूज्य वाटणाऱ्यांच्याच शरीरीं या रोगाचीं रोगबीजें आढळून आलीं तर? आंग्ल-विद्येचा उदयच ज्या काळीं झाला नव्हता अशा काळच्या व वैदिक धर्माचे व जुन्या परंपरेचे कट्टे अभिमानी अशांच्या ग्रंथांतच चिकित्सक ऐतिहासिक दृष्टि दिसून आली तर? कुमारिलभट्ट हे तर कट्टे सनातनी म्हणून प्रसिद्ध आहेत ना? हजार वर्षांपूर्वी होऊन गेलेल्या त्यांच्या काळीं आंग्ल विद्येचें नांव देखील लोकांना माहीत असणें शक्य नव्हतें ना? पण त्या काळींहि जुन्या कथांचा अर्थ रूपकानें लावणें हा प्रचार होताच. वर उल्लेख आलेल्या अहिल्योद्धाराच्या कथेचा कुमारिलांनींच असा अर्थ लाविला आहे कीं, इंद्र म्हणजे सूर्य व अहिल्या म्हणजे रात्र; अर्थात् सूर्य रात्रीच्याजवळ जातांच रात्र नष्ट झाली. आणि कुमारिलांच्या पूर्वी हजार वर्षें होऊन गेलेल्या यास्कांच्या निरुक्तांत तर ऐतिहासिक नैदान, नैरुक्त, याज्ञिक, वैय्याकरण अशा टीकाकारांच्या अनेक पंथांचा उल्लेख असून वेदांतील कथांचा ते निरनिराळ्या तऱ्हेनें अर्थ करीत असत हें उदाहरणांसहित दिलें आहे. इंद्राचा शत्रु वृत्र हा कोण होता याचें उत्तर निरुक्तकार देतात,–'तत्को वृत्रः मेघ इति नैरुक्ताः त्वाष्ट्रोसुरः इत्यैतिहासिकाः।' (अ० २) तसेंच अश्विन कोण? 'तत्कावश्विनौ। द्यावापृथिवी इत्येके अहोरात्रौ इत्येके, सूर्याचंद्रमसौ इत्येके, राजानौ पुण्यकृतौ इति ऐतिहासिकाः' (अ० १२)

वगैरे. अर्थात् चिकित्सकपद्धति ही आजच कांहीं नवी निघाली नसून ग्रंथकाराला वाटते त्यापेक्षां फार जुनी आहे. अलीकडच्या काळांत तिला विलक्षण नवीन जोर प्राप्त झाला आहे हें निःसंशय आणि या नवीन जोमांत अल्लड तरुणीप्रमाणें जुन्या भाविक अशोक वृक्षाला ती पादाघात करतांना क्वचित् दिसली तरी या लत्ताप्रहारानें ज्ञानवृक्षाला आलेला नवा बहर पाहिला म्हणजे कोणीहि तिचें कौतुकच करील. ऐतिहासिक चिकित्सक पद्धतीच्या संगतींत धार्मिक भावना भ्रष्ट होते अशी समजूत करून घेऊन तिला कवटाळीण म्हणून कितीहि शिव्याशाप दिले तरी तिचें खरें सत्यवर्धक–ज्ञानवर्धक स्वरूप लक्षांत घेतलें म्हणजे सत्यमंदिरांतील या गृहलक्ष्मीला लाथाडण्यास कोण धजेल?

ज्या ऐतिहासिक चिकित्सक दृष्टीनें जुन्या बखरकारांपेक्षांहि अधिक विश्वसनीय माहिती आधुनिक संशोधकांना उपलब्ध झाली, जिच्या साहाय्यानें हजारों वर्षांपूर्वी खडकावर खोदलेले व हजार दोन हजार वर्षांच्या पूर्वीच्या काळींहि अज्ञेय असलेले लेख वाचतां येऊं लागले, जिच्या साहाय्यानें दहा-वीस हजार वर्षांपूर्वींपर्यंतच्या इतिहासाची मांडणी करतां येऊं लागली, ती ऐतिहासिक चिकित्सक दृष्टि सोडून देणें म्हणजे आधुनिक विद्वत्तेचा डोळा फोडणेंच होय. आतां सामान्य दृष्टीप्रमाणेंच या दृष्टीलाहि पुष्कळ वेळां कावीळ झालेली आढळून येते. त्यामुळें ऐतिहासिकांनीं मांडलेलीं सर्वच अनुमानें खरीं असतात किंवा ती ताबडतोब मान्य केलींच पाहिजेत असा आग्रह कोणीहि समंजस माणूस धरणार नाहीं. पण सर्वांनाच कावीळ झालेली असते असें नाहीं. तेव्हां मतामतांच्या झगड्यांत मिथ्या मतें नष्ट होत असतात व वादावादांतून सत्य घुसळून बाहेर येत असतें. या घुसळणींत इतरांच्याबरोबर धर्मभावनेलाहि रवीचे चार दोन फटकारे बसले तर तिनें कांगावा करण्याचें कारण नाहीं. धर्मभावनेनें झाले तरी इतकें नाजूक कां राहवें? 'नायमात्मा बलहीनेन लभ्यः' हें औपनिषदिक तत्त्व तिनेंहि अंगीं बाणवून घ्यावयास नको काय? धर्मभावनेंत जर सत्याचें तेज असेल तर तें या घर्षणांत 'स्पर्शानुकूलादिव सूर्यकान्तः' या न्यायानें बाहेर पडून उलट अधिक उज्ज्वल झालें पाहिजे. मग चिकित्सकपद्धतीला धर्मभावनेनें भिण्याचें कारण काय? अर्थात् चिकित्सक-बुद्धीच्या नांवानें बोटें मोडीत बसण्यापेक्षां नव्या संशोधनांत सर्वानुमतें सिद्ध म्हणून ज्या गोष्टी ठरतील त्यांचा व धर्मभावनांचा समन्वय करण्यांत धर्मा-

भिमान्यांनीं आपली बुद्धि वेंचणें हेंच अधिक समंजस होय. आणि ज्या हिंदु धर्मानें जाखाई-जोखाईपासून निर्गुण, अनिर्वाच्या ब्रह्मापर्यंत आणि अनार्यांच्या हनुमानापासून आर्यांच्या रामचंद्रापर्यंत सर्वांची आपल्या अंतरंगांत व्यवस्था लावून दिली त्याला नवीन संशोधनाचें विष आपल्या जठरीं पचवितां येण्यास मुळींच अडचण पडणार नाहीं. आणि जें सत्य आहे तें विष नव्हेच. ब्रह्माचें 'सत्यं ज्ञानं अनंतं ब्रह्म' असें वर्णन करितांना सत्याला मानाची पहिली जागा दिली आहे तें सत्य विष कसें ठरेल? विद्वानांना विष नसलें तरी सामान्य अज्ञजनाला बुद्धिभेदामुळें तें विषतुल्य ठरणार नाहीं काय? अशी एक मोठी प्रौढ पोक्त शंका पुष्कळ वेळां अशा प्रसंगीं मिरवितांना आढळून येते; पण ती बुढ्ढी असली तरी 'वृद्धा सा च विचारणीयचरिता' या जातींतीलच असते. अज्ञांच्याकरितांहि खोटे बुजगबाहुलें ठेवलेंच पाहिजे असें नाहीं.

## आचारकांड

धर्माच्या आचारात्मक अथवा व्यावहारिक प्रांतांत शिरलें म्हणजे सनातनी आणि ब्राह्म यांच्या विरोधाची कमालमर्यादा दिसूं लागते. तत्त्वज्ञानापेक्षां दैवतविषयक बाबतींत विरोधाची आग प्रखरतर, आणि व्यवहारविषयांत तर चटकेच बसूं लागतात. व्यवहाराविषयीं उदासीन राहावयाचें सोडून ब्राह्म व्यवहारांत उत्साहानें पडूं पाहतात; इतकेंच नव्हे, तर भौतिकशास्त्रज्ञांस चित्तैकाग्र्य, विषयसुखनिरपेक्षता धारणा वगैरे गुण लागतात तर धर्मशील ते याहून अधिक कोणते? ईशप्रेमाचें रूपांतर मानवी प्रेमांत होणार नाहीं तर तें ईशप्रेम कसलें? असे प्रश्न विचारण्याचें धाष्टर्य करतात. आणि याहिपुढें जाऊन जातिभेदाचें भूत गाडून टाकण्याचा उपदेश करितात आणि वेशी-बाहेरील 'येसकरा'ला दिवाणखान्यांत खुर्चीवर बसवूं पाहतात. अर्थात् हा सगळा भ्रष्टाकार पाहून ग्रंथकार उद्गारतात, "ब्राह्मांचे विचार मोठे गोड व गोल दिसले तरी ते फोलहि आहेत हें सूक्ष्म विचाराअंतीं कळून आल्याशिवाय राहणार नाहीं! भौतिकशास्त्रज्ञांची एकाकारवृत्ति म्हणजेच धर्म म्हणणें म्हणजे जारिणीलाच पतिव्रता समजणें, दुसरें काय? शास्त्रज्ञांस ईश्वर हा नित्य अज्ञेयच राहणार; धार्मिकांस तो ज्ञेय होतो. सिंहासनावरील देवाच्या मूर्तीस खालीं ओढून त्या ठिकाणीं बायकांस बसवून त्यांचे देव्हारे माजविणारे ब्राह्म स्वतः-

विषयीं कांहीं समजोत, पण त्यांच्या विघातक कामगिरीचें कोणी कौतुक करील असें वाटत नाहीं. मागें इंग्रजी सेनापतींच्या हाताखालीं लढणाऱ्या आमच्याच देशबंधूंनीं स्वराज्य गमाविलें. आतां ब्राह्मांनीं स्वधर्मास मूठमाती देण्याकरितां खड्डा खणला आहे आतां यांत कोणाची समाधि होते हें भविष्यकालच पाहील. आज तरी हिंदुस्थान आसन्नमरण आहे असें पाहून ब्राह्मवैद्यांनीं धर्मभेद, जातिभेद व स्त्री-पुरुषभेद या त्रिदोषांची चिकित्सा करून त्यावर गोऱ्या डॉक्टराच्या सल्ल्यानें योजना ठरवून टाकली आहे. त्यांत रेचक व निःसत्त्व ब्राह्मधर्माचें 'टेस्टलेस् क्विनाइन', क्षणैक प्रेमोद्रेकानंतर निःसत्त्व राहणारें मिश्र-विवाहाचें 'पिक् मी अप्,' स्वैराचार उन्मादाची 'ब्रँडी', मोह पाडणाऱ्या सुधारणांचा 'क्लोरोफार्म' आणि शेवटीं नास्तिकवादाचा दर्प असलेल्या शिक्षणाचें 'अॅक्वा कॅम्फर' असें मिश्रण तयार केलें आहे व थेट विलायती राहणीचें कडक पथ्य सांगितलें आहे."

पण ही नुसती टीका झाली. प्रचलित सामाजिक प्रश्नासंबंधीं सनातनीयांचा प्रतिनिधि या नात्यानें ग्रंथकाराचें विचार समजून घेतले तर ते थोडक्यांत असे आहेतः– "प्रपंचांत रंगून गेलेल्या सुशिक्षित वेदांत्यांना या काल्पनिक जगाचें कितीहि महत्त्व असलें तरी बुद्धिवादाच्या चौकटींत भडक रंगांत रंगविलेला 'जगदिदं ब्रह्म' हा आधुनिक विद्वानांचा आदर्श हा विषयासक्तीच्या खिडकीच्या चौकटींतून दिसणाऱ्या पण्यांगनांच्या मुखखंडनाप्रमाणें विषारी होय. भोग आणि त्याग, प्रपंच आणि परमार्थ, प्रवृत्ति आणि निवृत्ति ह्या द्वंद्वांचा समन्वय करूं पाहणें फोल होय. जगांतील विषमतेसंबंधींहि हाकाटी करण्याचें कारण नाहीं. कारण संत सांगतात कीं, भेद हा देवच करून बसला आहे; तेव्हां समदर्शनाला सहभोजन किंवा वर्णसंकर यांची आवश्यकता नाहीं. आणि पतितपरावर्तन व शुद्धि हींहि ब्राह्मणाचें तेज प्रकट झालें नाहीं तोंवर विघातच होत. परचक्राच्या हजारों वर्षांच्या काळांत संघटित राहणारी जी हिंदूंची संस्कृति तिचे वर्णाश्रमधर्म आणि स्त्रीपुरुषसंबंध हे मजबूत दुवे होत. पण ते तोडण्यांतच सुशिक्षित आज आनंद मानीत आहेत. शेवटीं प्रयत्नवादावर अलीकडे मोठा भर देण्यांत येत आहे; पण प्रारब्धवाद व विश्वंभराची सदयता यांवर विश्वास नसेल तर हा पामर जीव भविष्यत्कालाच्या आपत्तीची कितीशी तजवीज करूं शकेल?" वगैरे वगैरे– या मतांचें परीक्षण करावयाचें म्हणजे

एक पुराणच लिहावयास लागेल. येथें फक्त ग्रंथकाराच्या विचारसरणीचा मासला म्हणून तीं थोडक्यांत दिग्दर्शित केलीं आहेत; व या अल्प दिग्दर्शना-वरूनहि देशाची सध्यांची अवनतावस्था दूर करण्याच्या मार्गांत तीं आड येण्याचा कसा संभव आहे याची कल्पना येऊन चुकलीच असेल. थोडी शंका असल्यास ती राजकीय पारतंत्र्य दूर होण्यास ग्रंथकारानें सांगितलेला उपाय वाचला म्हणजे दूर होईल. ते गंभीरपणें बजावतात कीं, आजच्या राजकीय चळवळी ह्या खडकावर डोकें आपटून घेण्याच्या पद्धतीच्या निदर्शक होत. 'पारतंत्र्याचा राजयक्ष्मा दूर होण्यास ईश्वरी कृपा संपादन करण्यापलीकडे दुसरा तरुणोपाय नाहीं असें आम्हांस तरी स्पष्ट वाटत आहे.' (पृ. ७६४). एवढा नऊशें पानांचा प्रचंड ग्रंथ असल्या नाउमेदकारक विचारसरणीस वाहिला जावा यापरतें दुर्दैव तें कोणतें? नवीन सुधारणेच्या अभिनिवेशांत ब्राह्मांनीं तार तोडले नाहींत असें नाहीं. कित्येक उल्लूंची मजल तर 'हिंदु म्हणून घेण्यांत आम्हांस लाज वाटते' असें म्हणण्यापर्यंत गेली होती. पण अशा विशिष्ट गोष्टींची वा व्यक्तींची हजेरी घेणें निराळें आणि धर्मांत बदलच होऊं शकत नाहीं असें म्हणून फुरंगटून बसणें निराळें. नव्या शास्त्रीय शोधानें अवगत झालेलें ज्ञान व बदलत्या कालानुरूप समत्वाच्या पसरत चाललेल्या वाजवी कल्पना यांची 'स्थितस्य गतिः चिंतनीया' या नात्यानें धर्माच्या अंतरंगांत व्यवस्था लावण्याची खटपट वस्तुतः व्हावयास हवी आहे.

आतां निरोप घेण्यापूर्वी टीकाकार या नात्यानें ग्रंथकारानें ब्राह्मधर्माचा प्रसार न होण्याचीं कारणें म्हणून जे दोष दाखविले आहेत त्यांवरून दृष्टि फिरवून रजा घेतों. ब्राह्मधर्माचा प्रसार अपेक्षेप्रमाणें झाला नाहीं ही गोष्ट ढळढळीत आहे. ग्रंथकाराचें दोषदिग्दर्शन मार्मिक आहे व तें सामान्यपणें कोणताहि पंथ खुरटून जाण्यास घडणाऱ्या दोषांस लागू असल्यानें लक्षांत घेण्यासारखें आहे. हे दोष पंथाच्या पुढाऱ्यांत व पंथाच्या विचारसरणींत असे दोन तऱ्हेनें आढळून येतात.

## ब्राह्मांचे दोष

पुढाऱ्यांविषयीं लिहितांना ब्राह्मधर्माचे प्रस्थापक राममोहन राय यांच्याविषयीं ते म्हणतात, 'ऐन पंचविशींतील त्यांची स्वैरवृत्ति, पुढील शिरस्तेदारी, त्यानंतरचा

राजविलासी दिनक्रम, स्वकीयांची तिरस्कृति व अखेरची धंदेवाईक वकिलायत इत्यादि ठळक गोष्टी लक्षांत घेतल्या तर त्यांच्या योगानें त्यांची धडाडी, बुद्धिमत्ता, मुत्सद्देगिरी इत्यादि गुणांत कमतरता आली नाहीं तरी इतकेंहि करून ते धर्मवेडे अथवा देवपिसे होते असें तरी कोण म्हणेल ? 'परंपरागत साधनें व उपासनांना यांचा निषेध करण्यांत त्यांनीं अविचार केला असें आम्हांस वाटतें.' 'हिंदूंच्या धर्मगुरूवर सरसहा टीका करतांना त्यांनीं धर्माचें रक्षण केलें का घात केला ह्याचा राममोहनांनीं गंभीरपणें विचार करावयास पाहिजे होता.' 'अवघ्या दहा वर्षांत दर साल दहा हजार रुपये उत्पन्नाची मिळकत शिरस्तेदारीवर मिळविणाऱ्या राममोहनांनीं हिंदूंच्या व्रतवैकल्यांत भटाभिक्षुकांस मिळणाऱ्या शिध्यावर इतकी करडी नजर करावयास नको होती.' 'एकेश्वरी पंथ इतर धर्मोपेक्षां अधिक तर्कशुद्ध असेल पण त्यांत धार्मिक भावनांस वाव नाहीं. रूक्ष तत्त्वज्ञान वेगळें व धर्मशील वेगळें हें राममोहन यांना अखेर कळून आलें व इंग्लंडांत गेल्यावरहि एकेश्वरी प्रार्थनामंदिराऐवजीं जुन्यापुराण्या मंदिरांतील जुन्यापुराण्या धर्मगुरूंचीं प्रवचनेंच त्यांस गोड वाटूं लागलीं.' देवेंद्रांसंबंधानें लिहितात कीं, 'आमच्या माहितीप्रमाणें महर्षि देवेंद्रनाथांच्या योग्यतेचे पुरुष ब्राह्मसंप्रदायांत दुसरे क्वचितच झाले असतील. पण यांच्याहि चारित्र्याचा परिणाम जनतेवर कबीर किंवा तुकोबा यांच्याइतका झाला नाहीं, याच्या अनेक कारणांपैकीं ठाकूर घराण्याचा खानदानीचा दर्प हेंहि एक असूं शकेल. याच घराण्यांतील रवींद्रनाथांचीं पुस्तकें जितक्या आण्यांस छापलीं जातात तितके रुपये त्यांची किंमत ठेवली जाते ! श्रीमान् रवींद्रनाथांनीं आपलीं पुस्तकें छपाईच्या किंमतींतच विकावीं अशी एकदां आम्हीं त्यांस पत्रद्वारें विनंति केली होती पण त्याचा जबाबच मिळाला नाहीं. ब्राह्म पुढारी हे जनतेपासून नेहमींच दूर राहिले हा दोष राजनारायण बोस, डॉक्टर भांडारकर वगैरेंच्याहि लक्षांत आला आहे.' 'केवळ त्यागानेंच अमृतत्व लाभेल अशी भाषा मात्र महर्षींच्या तोंडीं नेहमीं वसे; पण दरबारी पोषाख आणि श्रीमंती राहणी यांत कधींच अंतर पडलें नाहीं, व हिमालयांत दरोड्याची हूल उठतांच त्यांची उडालेली गाळण हीहि त्यांच्या स्थितप्रज्ञतेचीहि साक्ष देत नाहीं.' आतां रवींद्रांकडे वळा. रवींद्रांच्या आचारविचारांचें सूक्ष्म निरीक्षण केलें असतां नाटकीपणा व शब्दलाघव हींच भरपूर आढळतात. ते सहकारितेचे मोठे भोक्ते आहेत व सहकारिता मागण्या-

करितां त्यांचा हात जर्मनी, जपान, अमेरिका येथवर पोंचला असला, तरी स्वदेशांतील पुढाऱ्यांच्या हातीं क्वचितच लागला असेल! तसेंच ब्राह्मपंथ हा गुरुसंप्रदायाचा कट्टा विरोधी; पण शांतिनिकेतनांत तर रवींद्रनाथच गुरुदेव मानले जात असून त्यांच्या वंदनपादसेवनाचे भक्तिप्रकार सुरूच असतात असें समजतें. आपला धर्म विज्ञानमूलक व शास्त्रशुद्ध होय असें अट्टाहासानें 'देव-धर्म'वादी प्रतिपादितात, पण त्यांचा धर्मसंस्थापक भगवान् गुरुदेव शिवनारायण अग्निहोत्री यांच्यासारखा पुरुष पूर्वी कधीं झाला नाहीं व पुढें होणार नाहीं असलें अशास्त्रीय मत त्यांच्या विज्ञानमूलक तत्त्वशिक्षा या ग्रंथांतच ठाम सिद्धांत म्हणून मांडलें आहे. 'हिंदूंचे ईश्वरी अवतार, पारमार्थिक गुरु व शास्त्री, पुरोहित या सर्वांना श्रेष्ठ स्थानावरून पदच्युत केले; पण पुन्हा व्यक्तिशः त्याच श्रेष्ठ पदाची महत्त्वाकांक्षा ब्राह्मांनीं धरली व स्वतःचे देव्हारे माजविण्यास सुरुवात केली.' कांहीं विक्षिप्तांनीं तर 'शंकराचार्य, रामानुजाचार्य यांचें तत्त्वज्ञान व वैष्णवांचा भागवतधर्म यांना आधार ख्रिस्ती व इस्लामधर्म होय असले शोध लावले' व आम्हांला कांहीं म्हणा, पण हिंदु म्हणून आमचा अपमान करूं नका येथवर स्वाभिमानशून्यतेची कड पोंचविली. शेवटीं ग्रंथकार लिहितो— 'नवयुगांत झालें तरी नुसत्या शब्दपांडित्यास फारसा कोणी मान देईल असें वाटत नाहीं. उज्ज्वल धर्मनिष्ठेवांचून धर्मसंप्रदाय म्हणजे तुकोबाच्या उक्तीप्रमाणें 'रांडवेनें जेवी श्रृंगारू केला' त्यापैकींच मोहक प्रकार होय.' ग्रंथकाराचें हें विवेचन धर्मसुधारकांनीं मनन करण्यासारखें आहे.

## काषायांवर मिशनरी

अपयशमीमांसेच्या या कारणश्रेणींत परंपरेनें चालत आलेले सण, व्रतें-वैकल्यें, उपासनामार्ग यांचा अविचारपूर्वक निषेध करणें या मुद्द्याकडे विशेष लक्ष वेधावेंसें वाटतें. धर्माचें अंतरंग जें तत्त्वज्ञान त्यापेक्षां धर्माचें बाह्यांग जें सण-वार व्रतें, उपासना, तींच बहुजनसमाजाच्या दृष्टीनें जिव्हाळ्याचीं मर्में होत. बहुजनसमाज अंतरंगाविषयीं अज्ञानी असून धर्माच्या बाह्य पोषाकांतच नेहमीं गुरफटलेला असतो. तो पोषाक बदलला म्हणजे हॅटवाला साहेब पाहिला कीं गांवढळ बिचकतो तद्वत् जनतेची स्थिति होते. मुक्तिफौजेंतील भगवीं धोतरें नेसणारे मिशनरी व भजनी पद्धतीवर ख्रिस्ती गाणीं म्हणणारे

धर्मोपदेशक यांनीं हें मर्मस्थान अचूक हेरलेलें असतें. अर्थात् परंपराप्राप्त हाडीं-मासीं खिळलेले रूढ सण-वार, व्रतें-वैकल्यें यांना शक्यतोंवर स्थानच्युत न करतां त्यांचा नव्या तऱ्हेनें उपयोग करून घेण्यांतच सुधारकांची मुत्सद्देगिरी आहे. महाराष्ट्रांतील जुन्या गणपति-उत्सवाला नवीन सार्वजनिक स्वरूपाचें दिलेलें वळण हें या प्रकाराचें एक ठळक उदाहरण होय. या दृष्टीनें पाहूं गेलें असतां ब्राह्मांना सामुदायिक प्रार्थना रूढ करावयाची होती तर ती जुन्या देवळांतूनच व जुन्या भजनप्रवचन वगैरेंच्या द्वारेंच साधतां आली नसती असें नाहीं. मूर्तिपूजेच्या तीव्र निषेधांतहि मानवी स्वभावाच्या याच मर्माकडे दुर्लक्ष दिसून येतें. बुद्ध, महंमद, ख्राइस्ट या तिघांनींहि मूर्तिपूजेची हरळी उपटून टाकण्याचा प्रयत्न केला; पण तिचें मूळ नष्ट न होतां त्यांच्या पश्चात् या तिन्ही धर्मांत तिचें तण कोणत्या ना कोणत्या स्वरूपांत माजलेंच. त्यानें चिडून न जातां तेंच दूर्वा म्हणून वाहणें यांतच शहाणपण. ख्रिस्ती आणि बौद्ध यांनीं तर त्यांच्या मूर्तीच मंदिरविहारांत स्थापल्या व महंमदीय हे पंजे व ताबूत यांचाच धुल्ला करूं लागले. रोमन बादशहांपैकीं लियोपासून पुढच्या पांच बादशहांनीं मूर्तिपूजा नष्ट करण्याचा कसून प्रयत्न केला तरी त्यांस यश आलें नाहीं. आणि शेवटला मूर्तिभंजक बादशहा याची खुद्द बायकोच चोरून गुप्तपणें मूर्तिपूजा करीत असे, वगैरे हकीगत विद्वान् सुशिक्षितांना सांगावयास पाहिजे असें नाहीं. अर्थात् मनुष्यस्वभावांत रुतलेल्या या मूर्तिपूजेला झिडकारण्याऐवजीं तिचा योग्य उपयोग करून घेण्यांत ब्राह्मांचे श्रम खर्ची पडले असते तर अधिक चांगलें झालें नसतें काय?

---

— ७ —

# मिशनऱ्यांचें आक्रमण



थोड्या दिवसांपूर्वी त्रावणकोर येथील ख्रिश्चन मिशनऱ्यांमध्यें एकाएकीं मोठी खळबळ उडून गेली. व्हाइसरॉयकडे अर्जांवर अर्ज पाठविण्यांत आले. इंग्लंडमध्येंहि चळवळ करण्याची भाषा सुरू झाली. कांहीं तरी मोठें गंडांतर त्रावणकोर येथील ख्रिश्चन समाजावर आलें असावें असें वाटलें. वर्तमानपत्रांवरून पाहतां ख्रिश्चन लोकांना मोठी घोर चिंता लागून राहिली असावी असें दिसलें. एरवीं सरकारकडे मोठमोठे ठराव आणि अर्ज धाडण्याची धांदल उडती ना. ज्यांचा इंग्लंडमध्यें वशिला व ओळखीदेखी होत्या त्यांनीं तेथेंहि लिहून आपल्या समाजावर येऊं पाहणाऱ्या संकटाचें भेसूर चित्र रेखाटून आपल्या विलायती मित्रांनाहि गांगरून सोडलें.

वाचक हो! इतकें मनःस्वास्थ्य बिघडविण्यासारखें कोणतें घोर संकट त्रावणकोर येथील ख्रिश्चन समाजापुढें 'आ' वासून उभें होतें? तुम्हांला संकटाचें नांव सांगितलें तर तुमचा विश्वासहि बसणार नाहीं. कारण या संकटास शाप म्हणावयाचें कीं वर म्हणावयाचें असें तुम्हीच उलट विचारूं लागाल; आणि प्रकार खरोखरीच तसा आहे. ख्रिश्चन समाज ज्या संकटानें गांगरून गेला त्याचा उगम दुसऱ्या-तिसऱ्या कशांत नसून त्रावणकोरच्या महाराजांच्या एका दानशूर कृत्यांत आहे! दानशूर कृत्य आणि त्यामुळें उद्भवणारें संकट? हो, नेमकें असेंच! त्रावणकोरच्या महाराजांनीं केलें तरी काय? केलें येवढेंच, कीं आपल्याच राज्यांतील एका संस्थेला आपल्या देवस्थानच्या उत्पन्नापैकीं दहा हजार रुपयांची एक उदार देणगी जाहीर केली. मग तुम्ही विचाराल, यांत ख्रिश्चन समाजाचें पित्त भडकण्याचें कारण काय? एखादी उदार देणगी जाहीर झाली म्हणजे केलें तर कोणी देणगी देणाराचें अभिनंदन करावें असाच शिष्टसंप्रदाय आहे; आणि मोकळ्या मनोवृत्तीचें तें लक्षणहि आहे. मग ख्रिश्चन समाजाला या देणगीचा घोर कां पडला? पण मीं अद्याप ही देणगी कोणत्या संस्थेला

दिली आणि कोणत्या कामाकरितां दिली हें सांगितलें नाहीं. तें सांगितलें म्हणजे सर्व प्रकार चटकन तुमच्या ध्यानीं येईल. मात्र तें ऐकेपर्यंत अशी कल्पना करूं नका, कीं ही देणगी एखाद्या वाममार्गी शाक्त-संस्थेला दिली असावी किंवा तिचा विनियोग समाजविध्वंसक अशा अनैतिक कार्याकरितां करण्यांत यावयाचा असावा; आणि म्हणूनच सात्त्विक मनोवृत्तीच्या ख्रिस्त-भक्तांची चित्तें व्याकुळ झालीं असावीं, अशा प्रकारची कोणतीच विपरीत गोष्ट या देणगीच्या संबंधांत घडून आली नाहीं.

देणगी दिली ती अगदीं शहाजोग अशा संस्थेला आणि ज्या कार्याकरितां दिली तें कार्यहि पण शहाजोग. ज्या संस्थेला देणगी दिली ती संस्था म्हणजे केरळ हिंदु मिशन ही संस्था; आणि ज्या कार्याकरितां देणगी दिली तें कार्य म्हणजे दलितवर्गाची उन्नति. आतां कोणालाहि आश्चर्य वाटेल कीं यांत ख्रिश्चन लोकांच्या पोटांत भीतीचा गोळा उठण्यासारखें काय आहे? देणगी देणारा त्रावणकोरचा महाराजा, घेणारी हिंदु मिशन संस्था आणि ज्याच्याप्रीत्यर्थ खर्ची पडायची तो दलितवर्ग! सगळा कारभार परस्पर. मग यांत ख्रिश्चन लोकांचा संबंध काय? संबंध नाहीं म्हणतां? संबंध नाहीं कसा? इंग्रज सरकारनें ख्रिश्चन-धर्माच्या पाद्र्यांना पोसण्याकरितां हिंदु प्रजेच्या पिशव्या मोकळ्या सोडाव्या हें ठीक; निजामानें इस्लामच्या चांदापुढें हिंदुस्थानांतील लाखों रुपयांची परक्या देशांत खैरात करावी हें रास्त; पण त्रावणकोरचा हिंदु राजा एका हिंदु संस्थेच्या हवालीं एका मुठीनें दहा हजार रुपये देतो म्हणजे काय चेष्टा आहे? हा प्रकार विश्वप्रेमी ख्रिश्चन लोकांना उघड्या डोळ्यांनीं पाहावा लागावा यापरतें घोर संकट तें कोणतें?

बरें, हिंदु मिशनच्या हवालीं रक्कम केली ती वरिष्ठ वर्गाच्या सुखसोयीकडे खर्ची पडणार असती, तरीहि एक वेळ ख्रिश्चन मिशनऱ्यांनीं त्यांच्याकडे कानाडोळा केला असता. पण दलितवर्गाच्या उन्नतीकरितां अशी देणगी देणें म्हणजे महाराजांचा केवळ महदपराध होय! कारण दलितवर्ग म्हणजे मिशनऱ्यांचें खास राखीव कुरण. वरिष्ठवर्गातील कोंकरें आतां चांदण्या रात्रीं बाहेर पडत नाहींत आणि आपल्या कपाळाला कायमचीं मुकतहि नाहींत. जीं बाहेर पडतात व जाळ्यांत सापडतात तीं काय तीं कनिष्ठ दलितवर्गांतील. हा वर्ग म्हणजे ख्रिश्चन मिशनऱ्यांनीं खास आपल्या कृपाछत्राखालीं घेतलेला.

या वर्गावर मिशनऱ्यांचें अथांग प्रेम असल्यानें आपल्या प्रेमविषयाशीं इतरांनीं सलगी केलेली त्यांना कशी खपेल?

बड्या लोकांना शिकार सहज सापडावी म्हणून शिकारी रानें जशीं मुद्दाम राखून ठेवतात तसा हिंदुसमाजांतील कनिष्ट वर्ग हा मिशनऱ्यांच्या धर्मबुद्धीला सावजें गवसण्याकरितां सरकारनें मुद्दाम राखून ठेवावा अशी या मिशनऱ्यांची अपेक्षा आहे. ही अपेक्षा अगदींच निराधार नाहीं. कारण सरकार आणि मिशनरी हे दोन्ही परक्यावर उपकार करण्याच्या सत्कृत्यांत एकमेकांचे जिगर साथीदार होत. त्रावणकोरच्या मिशनऱ्यांनीं महाराजांच्या देणगीविरुद्ध सरकार-कडे जे अर्ज केले ते या नात्यावर भिस्त ठेवूनच. आपल्या आवडत्या मेंढपाळाच्या कुरणांत परका कोणी घुसला, कीं सरकार त्याच्यावर कायद्याचीं कुत्रीं सोडणार याची त्यांना खात्री आहे. बिहार व आसाममध्यें असा प्रकार घडल्याचा गवगवा झालाच. तेथें आर्यसमाजाचे प्रचारक हिंडून दलितवर्गांत जागृति उत्पन्न करण्याचा प्रयत्न करूं लागतांच सार्वजनिक शांततेचा भंग होईल या निमित्ताखालीं त्या लोकांना त्या प्रांतांतून हुसकून लावण्यांत आलें.

सरकारच्या मिशनरीधार्जिण्या मनोवृत्तीचें दुसरें एक उदाहरण तर अधिक मासलेवाईक आहे. खानेसुमारीच्या वेळीं जातवारीची नोंद करण्यांत येत असते. आतां आपली जात कोणत्या दर्जाची म्हणून नोंदली जावी हा प्रश्न खरें पाहिलें तर त्या जातींतील लोकांचा आहे. सरकारी अधिकाऱ्यांचें काम म्हणजे फक्त त्या जातींतील लोक आपला दर्जा जो कोणता मानीत असतील त्याची नोंद करावयाची एवढेंच. पण गेल्या खानेसुमारीच्या वेळीं बंगालमध्यें असा प्रकार झाला कीं आपणांस दलितवर्ग म्हणून संबोधूं नये अशा प्रकारचा लेखी अर्ज निरनिराळ्या १७ जातींनीं सरकारकडे केला असतां सरकारनें त्याची दाद न घेतां त्यांच्या डोकीवर दलितत्वाचा शिक्का टिचून मारला! या सतरा जातींपैकीं पुष्कळांची लोकसंख्याहि लाखावर होती. हा प्रकार खरोखरच अजब होय. स्वतःस दलित म्हणवून घेण्यास तयार नसलेल्यास मुद्दाम दलित ठरवावयाचें, याला काय म्हणावें? बरें, दलित ठरविल्यावर मग त्यांच्या उन्नतीविषयीं खटपट करावी कीं नाहीं! तर तशी खटपट कोणी हिंदु करूं लागला तर त्या शांतिदूताला मुद्दाम शांतिविध्वंसक ठरवावयाचा आणि मग आपल्या आवडत्या मिशनरी मेंढपाळांचा मार्ग

निष्कंटक करावयाचा असा हा सर्व घाट आहे. हा घाट मोडूं नये व त्रावणकोरांतील दलितवर्गांत आपणांशिवाय इतरांचा प्रवेश होऊं नये म्हणूनच तत्रस्थ मिशनऱ्यांनीं सरकारकडे अर्जद्वारा धाव घेतली होती. या प्रकारावरून मिशनऱ्यांच्या हिंदु समाजावरील आक्रमणाची दिशा दिसून येईल.

मिशनरी संस्थांनीं शिक्षण आणि विशेषतः आरोग्य या क्षेत्रांत जी कामगिरी केली आहे ती कृतज्ञ जनता केव्हांहि विसरणार नाहीं. गोरगरिबांकरितां पाठशाळा आणि इस्पितळें उघडून त्यांनीं लाखों दीनांचा दुवा जोडला आहे. या संस्थांमध्यें काम करणारांमध्यें कांहीं व्यक्ति इतक्या प्रामाणिक, सज्जन, गोडव्या व कष्टाळु आढळतात कीं, त्यांच्या पायांपाशीं बसून सेवाधर्माचे धडे कोणीहि शिकावे. पण व्यक्तिशः अशा संतांबद्दल कितीहि आदर व कृतज्ञता वाटली तरी मिशनरी संस्थेच्या स्वरूपाकडे डोळेझांक करणें योग्य होणार नाहीं. या संस्थेंत काम करणारे लोक कांहीं वेळां ख्रिस्ताच्या मूळ उपदेशाप्रमाणें निःस्वार्थ सेवाधर्मानें प्रेरित झालेले असतात; पण मिशनची संस्था ज्यांच्या पैशावर पोसली जाते, त्या पोशिंद्यांची मनोवृत्तीच शेवटीं प्रभावी ठरणार.

मिशनरी लिव्हिंग्स्टन्चें नांव सर्व सुशिक्षितांना परिचित असतें. नाइल नदीचा शोध लावण्याकरितां यानें आफ्रिकेच्या जंगलांत आपल्या जीवाचें कसें रान केलें, याची त्यानें स्वतःच लिहून ठेवलेली हकीकत पुष्कळांनीं वाचली असेल. हा लिव्हिंग्स्टन लंडन मिशनरी सोसायटीचा सभासद असून तिच्यातर्फेंच प्रथम आफ्रिकेंत गेला. त्याच्या प्रवासखर्चाकरितां फंड जमवितांना या सोसायटीच्या अध्यक्षांनीं जे उद्गार काढले, ते मासलेवाईक आहेत. पाउणशें वर्षांपूर्वींची ही गोष्ट आहे. म्हणजे इंग्लंडमधील कापडाला पुरेशी गिऱ्हाइकी मिळविण्याच्या खटपटीचा हा काळ होता. या वेळीं अध्यक्षांनीं उद्गार काढले कीं, "लिव्हिंग्स्टनच्या या सफरीवर आपण कितीहि पैसा ओतला तरी त्यांतला एक थेंबहि फुकट जाणार नाहीं ही खात्री बाळगा. आफ्रिकेंतल्या या प्रदेशांतील लक्षावधि लोक अद्याप पूर्ण रानटी आहेत. त्यांना कपड्याचा उपयोग माहीत नाहीं. पण लिव्हिंग्स्टनच्या सदुद्योगामुळें त्यांना कपडे पेहरण्याची जर ख्राइस्टच्या कृपेनें चटक लागली, तर आपल्या मँचेस्टरच्या गिरण्यांना केवढें प्रचंड नवें गिऱ्हाइक मिळेल याचें चित्र आपल्या डोळ्यांपुढें आणा आणि

मग लिव्हिंग्स्टनच्या वर्गणीकरितां आपल्या पैशाच्या पिशवीमध्यें हात घाला." ध्येयनिष्ठ लिव्हिंग्स्टननें मात्र पुढें या धर्मांचा व्यापार करणाऱ्या सोसायटीचा संबंध तोडून टाकला.

साता समुद्रांपलीकडून येऊन, आपल्या घरचा पैसा बरोबर आणून, मिशनरी येथें मोठमोठालीं इस्पितळें चालवितात हें पाहून आपणांस कौतुक वाटतें, दानशीलत्वाबद्दल अचंबा वाटतो, सेवाधर्माबद्दल आदर वाटतो; पण या घटनेच्या पाठीमागें जी मनोवृत्ति उभी असते तिचें स्वरूप हें वरील प्रकारचें असतें. एकटी अमेरिकाच दरवर्षी या प्रकारच्या कार्यावर चार कोटि डॉलर खर्च करते म्हणतात. एवढ्या रकमा खर्ची पडतात त्या उगाच पडत नाहींत. खिस्ती धर्मांचा प्रसार करणें हा उद्देश तर असतोच; पण खिस्ती धर्मांचा प्रसार, हा व्यापार व राजकारण यांच्या प्रसाराचेंच एक अंग असतें म्हणून. व्यापाऱ्यांनीं पेठा काबीज कराव्या, मुत्सद्द्यांनीं देश गिळंकृत करावे आणि धर्मोपदेशकांनीं त्यांच्या या कृत्यांना मंगल आशीर्वाद द्यावा असा हा तिरंगी बनाव असतो. आशीर्वाद द्यावा हें मी उगाच पोकळ म्हणत नाहीं; त्याला दाखला आहे. चाळीस वर्षांपूर्वी अमेरिकेनें फिलिपाइन बेटें गिळंकृत करण्याचा निश्चय जेव्हां जाहीर केला तेव्हां त्या सत्कृत्याबद्दल त्या वेळचे प्रेसिडेंट मॅकिन्ले यांचें अभिनंदन करण्याकरितां धर्मोपदेशकांचें खास शिष्टमंडळ त्यांचेकडे गेलें होतें. प्रेसिडेंटांनीं उत्तरादाखल भाषण करतांना सांगितलें कीं फिलिपाइन खालसा करण्याबद्दल आपण जो निश्चय केला तो साक्षात् ईश्वरी प्रेरणेवरून होय! ( He assured the bishops that his decision to annex came through direct leading from God and was inspired by a desire to Christianise the Filippines as our brothers for whom Christ died–'प्रबुद्ध भारत', जून १९३३ ). ईश्वरी प्रेरणेचा हा असा प्रभाव आहे!

ही ईश्वरी प्रेरणा ज्यांच्यावर अनुग्रह करावयाचा त्यांना आपण होऊन पटली तर उत्तमच. पण ती न पटण्यासारखेच परके लोक बहुधा मठ्ठ असतात. आणि मग अशांशीं गांठ पडली असता त्यांच्या मठ्ठ डोक्यांत उपदेश कोंबण्याची उरस्फोड करण्यापेक्षां त्यांचीं डोकीं सडकलेलींच चांगलीं नाहीं का? आणि तें करण्यासहि मिशनऱ्यांचे मुत्सद्दी मित्र एका पायावर तयार असतात. चीन देशाला याचा

चांगला अनुभव आहे. 'मॉडर्न रिव्ह्यू', व्हॉ. ३, पान २३४ वर लाफेडियो हर्न नांवाच्या साहेबाचें अवतरण घेतलें आहे, त्यांत तो म्हणतो कीं, 'आधीं तहाच्या कलमांनीं बांधून घेऊन आम्ही आमचे मिशनरी चीनवर लादतों आणि मग त्यांपैकीं कांहींच्या जिवास अपाय झाला तर त्याच्याकरितां जबर शिक्षा ठोठावतों. ( We force Missionaries upon China under treaty clauses, and pledge ourselves to support them with gun boats ).

राजकारण आणि मिशनरीकारण यांची अखंड सांगड कशी जमलेली असते याची आपणां हिंदूंना कल्पना आहेच. १८५७ सालीं बंड झालें तेव्हां येथील जर्मन व अमेरिकन मिशनऱ्यांनीं दहा हजार ख्रिश्चन रिक्रूट सरकारास देऊं केले होते असें रिचर यांनीं हिंदुस्थानांतील ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या इतिहासांत लिहिलें आहे! पुढें सरकारानें ही मदत स्वीकारली नाहीं हें वेगळें. असाच अनुभव असहकारितेच्या चळवळीच्या वेळीं आला. थोड्या वर्षांपूर्वी महात्माजींनीं असहकारितेचा प्रयोग सुरू केला तेव्हां ख्रिस्ताचा उपदेश व्यवहारांत आणण्याचा एक अपूर्व प्रयोग म्हणून युरोप व अमेरिकेंतील अनेक थोर धर्मोपदेशकांनीं या प्रयोगाचें सकौतुक अभिनंदन केलें; पण येथील धर्मोपदेशकांकडूनहि आपणांस पाठिंबा मिळेल या आशेनें महात्माजींचे एक शिष्यवर कुमारप्पा यांनीं येथील मुख्य धर्मोपदेशक कलकत्त्याचे लॉर्ड बिशप यांना जेव्हां एतद्विषयक विनंति केली तेव्हां त्यांनीं जें उत्तर दिलें त्यांत ख्रिस्ताच्या Render unto Caeser the things that are Caeser's या वाक्याची आठवण करून देऊन असहकारप्रयोगाला संमति देण्याचें साफ नाकारलें! अर्थात् राजकारण आणि मिशनरीकारण यांची ही अशी गट्टी आहे आणि असें सजोड आक्रमण आहे!

---

— ८ —

# मराठी काव्याची होळी

अहल्याबाईचा पुत्र खंडेराव दान म्हणून रौप्य आणि सुवर्ण-मुद्रिकांनीं भरलेलीं पात्रेंच्या पात्रें ब्राह्मणांस अर्पण करी. पण तीं अर्पण करतांना पुष्कळ वेळां ज्या खोडसाळ युक्तीचा अवलंब करी तशाच प्रकारच्या युक्तीचा अवलंब करण्याची 'महाराष्ट्रीय ज्ञानकोशकारां'ना मधून मधून लहर येत असल्याचें आढळून येतें. खंडेराव ब्राह्मणांस निमंत्रण करून त्यांचेपुढें सुवर्ण-मुद्रांनीं भरलेलें तबक ठेवी व त्यांतून मन मानेल तितक्या मुद्रा उचलून घेण्यास सांगे. पण सुवर्ण-मुद्रांच्या लकाकीनें मुग्ध झालेला ब्राह्मणाचा हात मुद्रांना कुरवाळूं लागतो न लागतो तोंच मुद्रांच्या खालीं दडवून ठेवलेल्या जहरी इंगळ्या त्याच्याशीं हस्तांदोलन करीत; त्यामुळें बिचारा ब्राह्मण धनलोभ आणि शारीरिक वेदना यांच्यामध्यें लोंबकळत राही. ज्ञानकोशकारांनीं अजस्र उद्योग करून महाराष्ट्र वाचकवर्गाला आजपावेतों अगम्य असलेलीं ज्ञानसंपत्तीचीं भांडारें खुलीं करून दिलीं याबद्दल महाराष्ट्र ज्ञानभिक्षू त्यांचे सदैव ऋणी राहतील. पण खुल्या केलेल्या भांडारांतील ज्ञानसंपत्ति लुटून नेत असतां खंडेरावी डंख मारण्याची हौस भागवून घेण्याचा मोह कोशकारांनीं टाळला असता, तर ज्ञानभिक्षूंकडून मिळणारा धन्यवादहि प्रसन्नचित्तानें मिळाला असता. पण या धन्यवादापेक्षां लोकविलक्षण मतांच्या डंखांनीं तळमळणाऱ्यांच्या वेदना पाहण्यांत कोशकारांना अधिक हौस वाटत असावी.

महाराष्ट्रीय ज्ञानकोश, विभाग अकरा यांत काव्य या सदराखालीं एक विस्तृत लेख आला असून काव्यशास्त्र, संस्कृत काव्य, महाराष्ट्र-काव्य वगैरेची माहिती वाचकांस पुरविली आहे. त्यांत महाराष्ट्र-काव्यासंबंधानें समालोचनात्मक थाटाचे जे विचार प्रकट केले आहेत ते वाचून महाराष्ट्र वाचक आश्चर्यमूढ झाल्याविना राहणार नाहींत. मूळ लेखांतील 'मराठी काव्य व प्राचीन कवि' या पोटमथळ्याच्या पहिल्या कॉलम दीड कॉलमांत प्राचीन मराठी काव्याची जबानी घेऊन नंतर अधिकारयुक्त वाणीनें निकाल देतांना कोशकार लिहितात

कीं, एकंदरीनें पाहतां मराठींतील काव्य-वाङ्मय म्हणजे उष्टें आणि भिकार होय यांत शंका नाहीं. सुशिक्षित शृंगारकी वाङ्मय अलीकडील मासिकांतील भीत भीत प्रसिद्ध केलेल्या पद्यांशिवाय मराठींत नाहीं. आणि आहे तें अगदीं कनिष्ठ प्रतीचें आहे. भावना सुशिक्षित होऊन त्यांचा विकास ज्या समाजांत नाहीं त्या समाजांत खरें प्रेमवाङ्मय कोठून सापडणार? पोवाडे देखील निर्बुद्ध अशा लोकांनींच लिहिले असल्यामुळें त्यांत कवित्व जरी मधून मधून दृष्टीस पडलें तरी तें आजच्या वाङ्मयप्रेमी वर्गावर छाप टाकील असें नाहीं. आणि मोठमोठालीं चांगलीं काव्यें तर मराठींत झालींच नाहींत. इंग्रजी राज्यांतील ज्या मराठी काव्यांत कांहीं कवींचें कौशल्य दृष्टीस पडतें आणि ज्या कवींचा दम जरा जास्त टिकला आहे अशीं नांव घेण्यासारखीं काव्यें आमच्या मतें दोनच आहेत. एक चिंतामणि पेटकरांचें गंगावर्णन आणि टिळकांचें वनवासी फूल. काव्याचे विषय शोधण्यांत स्वातंत्र्य, जन्मभर काव्याचा हव्यास, विविध प्रकारचा अनुभव या गोष्टींचा लाभ महाराष्ट्र-कवितेस कधींच प्राप्त झाला नाहीं. मराठींतील बरीचशी प्रसिद्ध झालेली अर्वाचीन कविता पंचविशीच्या आंतल्या पोरांनीं लिहिलेली आहे व त्याच मंडळींनीं प्रौढ-वयांत कवितारचनेचा क्रम टाकून दिला आहे' वगैरे.

पण येवढ्यानेंहि कोशकारांच्या अंतरात्म्यांची खळमळ शांत न होऊन व मराठी काव्याविषयींचा तिटकारा नीट व्यक्त झालासें न वाटून कोशकार शेवटीं शेवटीं उद्गारतात कीं, 'आजपर्यंत झालेलें मराठी वाङ्मय सर्व जळून गेलें तरी जगाचें वाङ्मय या दृष्टीनें कांहींएक नुकसान व्हावयाचें नाहीं! झालें तर भाषेचा इतिहास, खुंटलेल्या राष्ट्रांच्या मनःस्थितीचें व ज्ञानमर्यादेचें उदाहरण व स्त्री-शूद्रांच्या धार्मिक शिक्षणासाठीं झालेल्या प्रयत्नांचा इतिहास या नात्यानेंच होईल!!' इतक्या थोड्या शब्दांत महाराष्ट्र-काव्याची इतकी मासलेवाईक निंदा अन्यत्र सापडणें दुर्मिळ.

एका बाजूनें महाराष्ट्रकवि हे जगत्कविमंडळाच्या अग्रभागीं विराजमान् होण्यास योग्य, त्यांतील प्राचीनांपैकीं बहुतेकांचें काव्य भगवद्भक्तीच्या उत्कट परिमलानें दरवळलेलें, अतएव केवळ असामान्य, व अर्वाचीनांपैकीं 'गोविंदाग्रज-प्रभृतींचें काव्य अखिल जगतांत अव्वल दर्जाच्या ठरलेल्या वाल्मीकि, शेक्स्पिअर, गटे वगैरे कवींच्या तोलाचें; तर दुसऱ्या बाजूनें महाराष्ट्र-काव्य हें

परपुष्ट, निर्मल व निस्तेजपैकीं प्राचीनांचें गांवढळ, ठरीव साच्याचें व उद्दाम, कल्पनारहित आणि अर्वाचीनांचें उच्छृंखल, छचोर व त्रुटित अशा दोनहि प्रकारच्या एकांतिक विचारसरणीच्या लाटा गेल्या पन्नास-साठ वर्षांत महाराष्ट्रावर येऊन गेल्या. पण आजमितीस त्या ओसरल्या असून, एकंदर काव्यसाम्राज्यांत महाराष्ट्रकाव्याला कोणता दर्जा प्राप्त होण्यासारखा आहे हें चिकित्सकबुद्धीनें ठरवावें व गुणदोषांचें हंसक्षीरन्यायानें परीक्षण करावें. अशा प्रकारची प्रवृत्ति दिवसेंदिवस बळावत आहे.

## काव्यकाव्योदयकारांचें मत

कोशकारांच्या पूर्वी 'काव्य-काव्योदय'कारांनीं प्राचीन कवींची हजेरी घेतली त्यावेळीं त्यांनाहि कोशकारांच्याइतकी इरसाल भाषा सुचली नाहीं. जुन्या काव्याला परपुष्ट, प्रतिभास्वातंत्र्यरहित, खेडवळ वगैरे प्रकारें नाकें मुरडून काव्य-काव्योदयकारांनीं त्याला लाथाडलें होतें. पण त्याला भडाग्नि देण्यास त्यांचा हात वाहीना! शिवाय सर्व महाराष्ट्रकाव्याला सरसहा अस्पृश्य समजण्यासहि ते तयार नव्हते. अर्वाचीनांकडे तर त्यांच्या अंतकरणाचा ओढा होताच. पण प्राचीनांपैकींही तुकाराम, नामदेव वगैरे भक्तकवींचें काव्य त्यांचें अंतःकरण उचंबळून सोडी. काव्य-काव्योदय या निबंधांत भक्तकवीविषयीं दाखविलेला आदर कांहींसा चांचरत व नाखुषीनें दर्शविलेला असला तरी दहा वर्षांच्या परिशीलनानंतर वुइल्सन लेक्चर्समध्यें भक्तिकाव्याचें मुक्तकंठ स्तुति-स्तोत्र गाण्यांत प्रोफेसरसाहेबांना कमीपणा वाटलेला नाहीं. काव्यांत भक्तिरसाची बहार अथवा परमोच्च सीमा पाहावयाची असल्यास महाराष्ट्रकाव्यांतच ती पाहावी. उभ्या त्रिभुवनांत तिला जोड नाहीं, असे उद्गार काढणाऱ्याला समग्र महाराष्ट्रकाव्य अग्निसात् झालेलें कसें पाहवेल?

पण आमच्या कोशकारांच्या घरीं सर्वच व्यवहार घाउक; त्यांत ग्राह्याग्राह्य, सरसनीरस असल्या बारकाव्या काढीत बसल्यास कोशकारांचें स्वातंत्र्य आणि वैशिष्टय कोठें उरलें? जुने कवि, नवे कवि, पोवाडेकार, लावणीकार, तुकाराम, मोरोपंत, केशवसुत, गोविंदाग्रज या सर्वांना त्यांनीं एकाच जात्यांत भरडून काढलें आहे. समग्र महाराष्ट्रकाव्याचें आलोडन करण्याचा ठराव पास झाल्या-बरोबर कोशकारांनीं आपल्या पुरभय्यास जुन्या नव्या सर्व काव्यग्रंथांचे गठ्ठे

आपल्यापुढें हजर करण्यास सांगितलें व क्षणभर दहापांच पुस्तकांचे कान दुमडल्यावर हे घामानें डवरते होत्साते आरामखुर्चीवर देह लोटून व कपाळास आठ्या घालून डुरकले कीं 'भय्याजी, सबको आग लगाव, अभीके अभी!'

बरें, एकान्तिक मत प्रतिपादावयाचें तर त्याला साधकबाधक प्रमाणें तरी द्यावीं; म्हणजे वाचकाला स्वतःला आपलें स्वतंत्र मत बनविण्यास वाव तरी राहतो; पण आमच्या कोशकारांची श्रुति-स्मृतिकारांच्यावर ताण! बिचाऱ्या महाराष्ट्र कवींवर ठेवलेले आरोप पुराव्यानें सिद्ध करण्याचा त्रास न घेतां कोशकारांनीं लष्करी कोर्टातील न्यायाधीशाप्रमाणें एकदम त्या सर्वांस नव्यांस व जुन्यांस अग्निकाष्ठभक्षणाची शिक्षा सुनावली आहे. न्यायनिर्णयांत प्रथम आरोपींची 'हजेरी व नंतर निर्णय' हा नेहमींचा मार्ग. पण महाराष्ट्र कविवर्गाविषयींच्या तिटकाऱ्याचें मळमळ ओकण्यास कोशकार इतके अधीर झाले होते कीं, कवींची हजेरी घेऊन नंतर निकाल देण्याइतक्या विलंबाची कळ न सोसून आधीं निर्णय व मागून हजेरी असा विपर्यस्त प्रकार त्यांनीं अंगिकारला आहे.

## या विसंगतीस काय म्हणावें ?

पण सगळी बहार यामागून घेतलेल्या कवींच्या हजेरींत आहे. या हजेरीचा वाचकांस परिचय करून दिला म्हणजे 'आजपर्यंत झालेलें सर्व मराठी वाङ्मय जळून खाक झालें तरी जगाचें काव्यनाश या दृष्टीनें कांहींहि नुकसान व्हावयाचें नाहीं' ह्या जलाल मताला मूठमाती देण्याकरितां त्याचें थडगें कोशकारांनीं स्वतःच कसें खणून ठेवलें आहे हें पाहावयास सांपडेल. तसेंच या हजेरीची ओळख करून दिली म्हणजे कोशकारांच्या मतांतील एकांगीपणा दर्शविण्याचा निराळा खटाटोप करण्याचें कारण उरणार नाहीं. कारण कोशकारांनीं या हजेरींत विसंगति आणि वदतोव्याघात यांनीं स्वतःच्या मतास स्वतःच हरताळ फांसला आहे.

आजपर्यंत झालेलें मराठी वाङ्मय सर्व जळून खाक झालें तरी जगाचें काव्यनाश या दृष्टीनें कांहींहि नुकसान व्हावयाचें नाहीं असलें धाडसी मत बनविण्यापूर्वी कोशकारांनीं मराठी वाङ्मयाचें बरेंच परिशीलन केलें असावें असा वाचकांनीं तर्क करण्याचें कारण नाहीं. कारण प्राचीन कवींसंबंधीं माहिती

महाराष्ट्रसारस्वतांतून व अर्वाचीनांसंबंधीं न. चिं. केळकर यांच्या बडोदें साहित्य-संमेलनांतील अध्यक्षीय भाषणांतून घेतल्यानें दोनहि उष्टीं आणि परभृत झालीं आहेत आणि हें उष्टें अन्न पचावें म्हणूनच वाङ्मय जाळून त्याच्या भस्माची मात्रा वर सेवन केली कीं काय कोण जाणें. 'महाराष्ट्र-सारस्वत'कार आणि बडोद्याच्या साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष ह्या दोघांच्या लेखांत ह्या भस्माचा मागमूसहि नाहीं; मग कोशकारांनीं तें कोठून पैदा केलें? 'उष्टें,' 'परभृत' वगैरे शब्द लक्षांत घेतां मूळ कल्पना 'काव्यकाव्योदय' निबंधांतून उचलली असावी; मग महाराष्ट्र-सारस्वतकार व साहित्य-संमेलनाध्यक्ष यांच्याप्रमाणें काव्यकाव्योदयकारांचा स्पष्ट उल्लेख कां नाहीं? तसा उल्लेख असता तर दोनहि प्रकारचीं मतें कोशकारांनीं वाचकांपुढें मांडलीं असें तरी म्हणतां आलें असतें. बरें, ह्याहि दृष्टीनें पाहतां 'काव्यकाव्योदया'चीच तेवढी आठवण व्हावी आणि 'विविधज्ञानविस्तारा'चे अंक कोशकारांनीं चाळलेले अन्यत्र आढळत असतां 'काव्यकाव्योदया'वरची बा. अ. भिडे यांची टीका कोशकारांच्या नजरेंतून निसटली असावी असें तरी कसें मानावें? पण या टीकेचा किंवा मूळ प्रबंधाचा उल्लेख न करण्यांत काव्यकाव्योदयकारांच्या मतांची सुधारून वाढविलेली आवृत्ति हें आपलें स्वतंत्र खास लाडकें मत म्हणून प्रसिद्ध व्हावें व त्याचा आपणांस योग्य अभिमान बाळगतां यावा, असा कोशकारांचा इरादा दिसतो. पण त्याच्या नादांत एका बाजूला आजपर्यंतचें मराठी वाङ्मय सर्व जळून गेलें तरी काव्यनाश या दृष्टीनें जगाचें रेसभर नुकसान व्हावयाचें नाहीं असलें आग्रही स्वयंमन्य मत, तर दुसऱ्या बाजूला ह्या अग्निकाष्ठांची शिक्षा सुनावलेल्या कवींची स्तुति असल्या अक्षम्य विसंगतीच्या खोड्यांत कोशकार अडकले गेले आहेत. कसे तें पहा.

## कोशकारांचा हा अभिप्राय पाहा!

अर्वाचीन कवींचें गुणवर्णन—छेः दोषवर्णन ज्ञानकोशकारांना आपल्या खास मतास खुलवील अशा पद्धतीनें करतां आलें असतें. पण त्यांनीं न. चिं. केळकर यांच्या भाषणाच्या गोषवाऱ्यावरच निर्वाह केला आहे, आणि त्यांतहि त्यांतील गुणवर्णनपर भाग गाळला आहे का म्हणून पाहावें तर तसेंहि दिसत नाहीं. भाषारचना व विषय यांचें वैचित्र्य आधुनिक कवितेंत

अतिशय दिसून येतें. मुजुमदार, भिडे, लेले, पांगारकर, आगाशे, अनंत-तनय यांच्या रचनेचें मोरोपंती वळण; मोगरे, चंद्रशेखर, लेंभे यांची कांहींशी संस्कृतप्रचुर पण डौलदार व रमणीय श्लोकपद्धति; माधवानुज, सुमंत, नागेश व माधव यांचीं सफाईदार रचना; चिपळूणकर, विनायक यांची सहजमधुर साकी; तुकारामाच्या व श्रीधरी थाटाचे टिळकांचे अभंग; केशवसुत, ठोमरे यांची विषयानुरूप तुटक, ओजस्वी व परिणामकारक नवीन वृत्तयोजना; तांबे व दत्त यांचीं लावणीपदाच्या धर्तीवरील हृदयंगम कवनें; गोविंदाग्रज, रेंदाळकरांची ललितनादमधुर पण कृत्रिम भाषा, आणि टेकाडे व बेहेरे यांच्या वाणींतील तडफ हे सर्व विशेष आधुनिक कवितेला शोभादायक आहेत. आधुनिक कवितेचें स्वरूप जसें वैचित्र्यपर तसेंच तें चमत्कृतिजनक व आनंद-दायकहि आहे.' वगैरे वाक्यांना राजरोसपणें वावरूं दिलें आहे.

आतां जुन्या कवींविषयीं अभिप्राय पाहा— जुन्या कवींत मोरोपंताविषयीं वादविवादाचीं रणें आजपर्यंत पुष्कळ माजलीं असल्याकारणानें त्या कवी-विषयीं कोशकारांचा अभिप्राय प्रतिकूल असावा असा तर्क केल्यास पुढील वाक्यें वाचावीं. 'मोरोपंतांना त्यांच्या आर्धांच्या सर्व काव्यांचा भरपूर उपयोग करून घेतां आल्यामुळें त्यांचें काव्य ठाकठिकीचें वठलें आहे. त्यांची कविता म्हणजे एकाद्या राजाच्या सर्वांगसुंदर, नाजुक, बहुमोल अलंकारादि आभरणांनीं युक्त व बहुविध कलाकुशल प्रौढ वयाची तरुणी होय. शब्द-गौरव, भाषेची प्रौढी, रसानुकूलता, भरपूर अलंकार, कालव्यक्तिप्रसंगांना अनुसरून वर्णनें, मुख्य सूत्र न सोडतां थोडक्यांत पुष्कळ अर्थ आणणें हें त्यांच्या काव्याचे विशेष होत.' मराठी काव्याच्या निंदकानें केलेलें हें वर्णन वाचकांनीं लक्षांत धरावें. इतर कवींविषयींचे अभिप्रायहि नमूद करण्यासारखे आहेत. 'अमृतरायाची कविता चटकदार व मनोहर असून त्याचा कटाव जर उत्तम हरिदासाच्या तोंडून ऐकला, तर श्रोते तन्मय होऊन जातात.' 'वामनाचीं पौराणिक आख्यानें रसभरित व स्वभावोक्तिपूर्ण असून वाणी जोरदार, ओजस्वी व प्रौढ आहे.' 'श्रीधर व एकनाथ यांनीं ओवीबद्ध काव्यांत चमत्कारित्व व मनोहारित्व आणलें आहे.' 'जनाबाईचे अभंग लडि-वाळपणाचे असून त्यांत वात्सल्य-रस बराच आढळतो.' 'ज्ञानेश्वरी हा ग्रंथ सरस दृष्टान्त व भाषेचें मधुर स्वरूप यांहींकरून इतका खुलविला आहे कीं, तो

वाचीत असतां वाचकांची आपोआप ग्रंथाशीं तन्मयता होते' वगैरे वगैरे. वरील वाक्यांत कोशकारांच्या मतें, उत्तम काव्याचे गुण कोणते व ते प्राचीन कवींत कसें आढळतात याचें स्पष्ट दिग्दर्शन होत आहे; मुक्तेश्वराविषयीं अभिप्राय तर याहिपेक्षां स्पष्ट आहे. " कवीचें काम लोकशिक्षणविषयक किंवा मनोरंजक कथा अथवा विचारसृष्टींतील विषयाशीं तादात्म्य पावून स्वयंस्फूर्तीनें गौरवून सांगण्याचें असतें. या दृष्टीनें मुक्तेश्वर हा उत्तम कवि होऊन गेला." मराठी काव्याचा अंधभक्त झाला तरी यापेक्षां अधिक स्तुति ती काय करणार? अर्वाचीन व प्राचीन कवींविषयीं वरील स्तुतिपूर्ण अभिप्राय आणि आजपर्यंतचें मराठी वाङ्मय सर्व जळून गेलें तरी काव्यनाश या दृष्टीनें जगाचें कांहींहि नुकसान नाहीं, असलें बेताल मत या विसंगतीचें कोडें पाहून कोशकारांचा तोल गेला आहे कीं काव्यावरील लेखाचे दोन जनक असून ते एकमेकांविरुद्ध सूड उगवीत आहेत हें कांहींच कळत नाहींसे होतें. गोविंदाग्रजांनीं पुण्याच्या खाणावळींत जेवणें, सदर्न मराठा रेल्वेंतून प्रवास करणें, खाडिलकरांच्या पदांचा अर्थ लावणें अशा अभिनव शिक्षा सुचविल्या होत्या त्या वेळीं ज्ञानकोशाचा हा भाग प्रसिद्ध असता तर कोशकारांचें महाराष्ट्र कवींविषयींचें मत शोधून काढणें हा प्रकार त्यांत गोवून कोशकारांच्या अवास्तव मताचा समाचार त्यांनीं घेतला असता.

ज्ञानकोशासारख्या अवाढव्य जिगजिगीच्या व अविरतोद्योगसाध्य अशा ग्रंथप्रकाशानें कोशकारांनीं महाराष्ट्र जनतेची केलेली अपूर्व सेवा लक्षांत घेतांना वरीलसारखे विचार प्रकट करणें भाग पडावें हें दुर्दैव. पण कोशकारांनीं मत-स्वातंत्र्याची तार फाजील ताणली नसती तर वाचकांच्या धन्यवादांतहि बेसूर निघण्याचें कारण नव्हतें. महाराष्ट्रकाव्याविषयीं जे विचार कोशकारांनीं प्रकट केले आहेत ते सद्धेतूनेंच केले असले पाहिजेत. राष्ट्राच्या दैन्यावस्थेंत स्वतःच्या दोषांची जेवढी तीव्र जाणीव असेल तेवढी पथ्यकारकच होय या सद्भावनेनें कोशकार जालीम उपाय योजण्यास प्रवृत्त झाले असावेत. पण निद्रिस्त जनतेला जागें करण्याकरितां समग्र महाराष्ट्र-काव्याची चिता पेटवून त्यांतील जळते निखारे तिच्या अंगावर फेकणें हा अधिक प्रसंग नव्हे काय?

पण विचारांचे वादळी वारे सुरू झाले म्हणजे ज्ञानकोशकारांच्या मतासारखी पूर्वविचारांना हादरे देणारी वावटळ सुटत असते. वावटळ घोंघावत असतांना

मोठमोठे वृक्षहि उमळून पडतील असें वाटतें; पण थोड्या वेळानें वावटळ निघून गेली म्हणजे लवलेले वृक्ष पुनश्च डौलानें डुलूं लागतात. मराठी काव्य समग्र जळून गेलें तरी जागतिक वाङ्मयाची रेसभरहि हानि होणार नाहीं हें कोशकारांचें मत हेंहि अशाच वावटळीच्या स्वरूपाचें होतें, आणि म्हणूनच तें आलें तसें गेलें. प्राचीन काव्यापैकीं ज्ञानेश्वरी आणि तुकोबाचे अभंग हे नष्ट झाले असतां जागतिक वाङ्मयांत उणेपणा येणार नाहीं असें कोणता रसिक म्हणूं शकेल? सरस्वतीच्या कंठांत घालण्याकरितां जगांतील उत्तमोत्तम वाङ्मयाचा कंठा गुंफावयाचा ठरला तर त्यामध्यें या दोन काव्यरत्नांचा समावेश अवश्य करावा लागेल. रस हा काव्याचा आत्मा असेल आणि भक्ति हा रस असेल तर त्या रसाचा इतका विविध आणि इतका उत्कट आविष्कार तुकोबाखेरीज अन्यत्र कोठेंहि गवसत नाहीं याची साक्ष कोणीहि बहुश्रुत माणूस देईल. कोणताहि गहन विषय सरस व समर्पक दृष्टान्तांचा नुसता वर्षाव करून रम्योज्ज्वल करणें हें जर कविप्रतिभेचें लक्षण असेल तर असल्या प्रकारच्या प्रतिभेला ज्ञानेश्वरींत उधान भरती आलेली दिसेल. प्राचीन काव्यांपैकीं या दोन काव्यांचा नुसता नामनिर्देशहि पुरे आहे. अर्वाचीन काव्यांपैकीं बहुतेक काव्यें पंचविसाच्या आंतल्या पोरांनीं लिहिलेलीं आहेत व प्रौढ वयांतच त्यांनीं काव्याचा छंद सोडून दिला आहे हें कोशकारांचें विधानहि वार्धक्यामुळें मधुघट रिकामे होऊं लागल्यावरहि व पैलतीराकडे नजर लागल्यावरहि काव्यरसांत रंगलेले वयोवृद्ध कविश्रेष्ठ तांबे ज्या समाजांत वावरत आहेत तो समाज कसें गिळूं शकेल? दत्त, केशवसुत, बालकवि; गोविंदाग्रज वगैरेंना दीर्घायुष्य लाभलेंच नाहीं हें मराठी साहित्याचें दुर्दैव. पण टिळक, चंद्रशेखर, लेभे अशा ज्या थोड्यांना तारतम्यानें लाभलें त्यांनीं आपली प्रतिभा शेवटपर्यंत महाराष्ट्र सारस्वताची सेवा करण्यांतच वेचिली. अर्वाचीन काव्याच्या एकंदर दर्जाविषयींहि असें विधान करण्यास मुळींच प्रत्यवाय नाहीं, कीं त्या काव्यांतील उत्तमोत्तम काव्यांचा संग्रह केला तर तो जागतिक काव्यांच्या प्रदर्शनांत स्थान मिळण्यासारखा खास ठरेल.

## जागतिक वाङ्मयांतील स्थान

काव्याचा अथवा ललित वाङ्मयाचा प्रांत सोडून इतिहास, तत्त्वज्ञान, राजकारण, प्रवासवृत्तें वगैरेसारख्या शास्त्रीय, अर्धशास्त्रीय व पंडिती वाङ्मयाकडे

वळलें आणि या प्रांतांतल्या आजच्या मराठींतील वाङ्मयाची जागतिक वाङ्मयाशीं तुलना केली, तर मात्र काव्याच्या प्रांतांतल्याइतका अभिमान बाळगणाऱ्यासारखी परिस्थिति या प्रांतांत अद्याप उत्पन्न झालेली नाहीं हें कबूल करावें लागेल. या प्रांताकडे ज्ञानेश्वरादि प्राचीनांनीं लक्षच दिलें नाहीं. या प्रांतांत जें वाङ्मय निर्माण झालें आहे, तें सर्व गेल्या साठ-पाउणशें वर्षांतलें. त्याची पाश्चात्यांतील गेल्या दोन-तीन शतकांची परंपरा पाठीशीं असणाऱ्या वाङ्मयाची तुलना करणेंच वाजवी होणार नाहीं. या तऱ्हेच्या वाङ्मयनिर्मितीला जो साधन-संभार लागतो त्याची आपल्याकडे वाण आहे. नुसतें प्रवास-वृत्तात्मक वाङ्मयाचेंच उदाहरण घ्या. मराठींत या विषयावरचे जबरे लेखक म्हणजे प्रि. गो. चिं. भाटे हे होत. सर्व भरतखंड यांनीं पालथा घातला असून आपल्या प्रवासाचें वृत्त दहा खडांत प्रसिद्ध केलें आहे. पण हे दहा खंड उलटून सुलटून कितीदां पाहिलेत तरी सर्व जगांतील प्रवाशांचें आकर्षण करणारा असा जो नगाधिराज हिमालय त्याच्या अंतरंगांतील प्रवासाचें वर्णन तुम्हांस तेथें आढळल काय ?- ती जिज्ञासा तृप्त करण्यास तुम्हांला स्वेन हेडनसारख्या परकी प्रवाशांचे ग्रंथच उलगडावे लागतील. जगांतील अत्युच्च पर्वत हा आमच्या भरतखंडांत, पण त्या नंग्या पर्वतावर प्रथम पायीं चढून जाण्याचा प्रयत्न करणारे धाडशी मुशाफिर मात्र परकीय. ज्या भाग्यवान् प्रवाशाला या पर्वतावर प्रथम पाय रोकण्याचा मान मिळेल तो प्रवासी त्या प्रवासाचें वर्णन जेव्हां प्रसिद्ध करील तेव्हां त्याच्या पुस्तकावर सर्व जगाच्या नुसत्या उड्या पडतील. पण हें भाग्य हिंदुस्थानांतील प्रवाशाला आज कोठेंल लाभायला ? मग अशा मौलिक प्रवासवृत्ताची भर आमच्या वाङ्मयांत आज पडूं शकली नाहीं तर नवल कसलें ? प्रवासवृत्तें सोडून तत्त्वज्ञानाचा प्रांत घ्या. तत्त्वज्ञान अथवा वेदान्त हा आम्हां भारतीयांच्या खास अधिकारांतील प्रांत समजला जातो. या प्रांतांत मराठी वाङ्मयाचें विशेष नांव गाजलें तें टिळकांच्या गीतारहस्यानें. हा ग्रंथ प्रौढ पांडित्याचा परिपाक आहे हें तो वरवर चाळला असतांहि कळून येण्यासारखें आहे. मराठी वाङ्मयांत त्यानें बहुमोल भर टाकली आहे हें तर निर्विवाद आहे. पण अखिल जागतिक तत्त्वज्ञानात्मक वाङ्मयांत या ग्रंथानें मौलिक भर टाकली आहे का, तत्त्वज्ञानांत नवीन दर्शन प्रस्थापित केलें आहे का, असें कोणी विचारलें तर त्याचें उत्तर निःशंकपणें होकारार्थी

देतां येणार नाहीं. याचेंहि कारण परिस्थितीच. तत्त्वज्ञानाला ज्ञानाच्या सर्व शाखांतील तत्त्वांचा समन्वय करावयाचा असतो. आजकाल ज्ञानाच्या विशेष प्रौढ शाखा म्हणजे भौतिक शास्त्रें हीं होत. हें नवीन ज्ञान पचवून त्याला तत्त्वज्ञानाच्या दिमतीस लावणें हें आजच्या पिढीचें कर्तव्य होऊन बसलें आहे. तें योग्य रीतीनें बजावण्यास साधनसामुग्रीची अनुकूलता हवी ती आज नाहीं. शिवाय आपल्या समाजाची पुराणप्रियता लक्षांत घेऊन नवें ज्ञानहि जुनेंच, म्हणून श्रीकृष्णाच्या तोंडून वदविण्याचें बंधनहि जें टिळकांनीं स्वीकारलें, त्यामुळें गीतारहस्य हें जागतिक तत्त्वज्ञानांत क्रांतिकारक होऊं शकलें नाहीं.

हा सर्व परिस्थितीचा परिणाम. आपल्यांत बुद्धीची धार कमी आहे असें नव्हे; ती दाखविण्याला जेथें अवसर मिळाला तेथें ती चमकलीच. टिळकांचेंच उदाहरण पुन्हा घ्यावयाचें तर त्यांचा 'आर्यांचें उत्तरध्रुवावरील मूळस्थान' हा ग्रंथ त्या विषयावरील मौलिक ग्रंथांत स्थान पटकावील असा उतरला आहे. दुसरें उदाहरण ज्या ज्ञानकोशकार केतकरांनीं मराठी काव्याची हेटाळणी केली आहे त्यांचेंच देतां येईल. केतकरांचा समाजशास्त्राचा व्यासंग हा स्वतंत्र प्रज्ञेचा होता. या विषयांत त्यांनीं प्रतिपादिलेलीं कांहीं प्रमेयें हीं जागतिक समाजशास्त्रांत भर टाकतील अशा स्वरूपाचीं आहेत. भांडारकर, राजवाडे वगैरेंचाहि उल्लेख करतां येईल. अर्थात् साधनानुकूल्य मिळेल तसतशी मराठी साहित्यिकांची बुद्धि शास्त्रीय वाङ्मयांच्या प्रांतांतहि चमकूं लागेल. मात्र या प्रांतांत अद्याप पुष्कळच कामगिरी व्हावयास पाहिजे याची जाणीव बाळगिली पाहिजे.

— ९ —

# मराठी लिपींतील अनुच्चारित अनुस्वारांची अडगळ

महाराष्ट्र भाषामंदिराच्या साफसफाईचें काम सध्यां चालू आहे. त्यांतील नव्या मनूंतील स्वाभिमानजागृतीला विजोड दिसणाऱ्या जुन्या यावनी व नव्या आंग्ल शब्दवस्तु काढून टाकण्यांत येत आहेत. जुन्यांतील दुर्लक्ष झालेल्यांपैकीं कांहीं बहुमोल वस्तूंची पुनः मांडामांड केली जात आहे. मंदिराच्या शृंगारांत विविधता व वैचित्र्य संपादण्यासाठीं नवीन शब्दसंपत्ति निर्माण होत आहे. अशा वेळीं भाषेच्या इमल्याबरहुकूम स्वतःचा इमला उठवणारी जी लिपी तिच्या साफसफाईकडे थोडें लक्ष पुरविणें अस्थानीं होणार नाहीं.

साफसफाईकरितां आंत पाउल टाकतांच लेखक ठिकठिकाणीं ठेचाळून पडेल अशा अगदीं प्रथम लक्षांत येणाऱ्या अडगळवजा वस्तु म्हणजे अनुच्चारित अनुस्वार हे होत. लिपीच्या मंदिरांतील मांडामांड ही त्यांत वावरणाऱ्या भाषेच्या आवडीनुरूप असावी लागते. ती आवडनिवड जशी बदलेल तशी लिपीची आरास न बदलली तर एका काळीं प्रिय अतएव आवश्यक भासणारी वस्तु कालांतरानें अडगळवजा दिसूं लागते. आजच्या मराठी लिपींतील बऱ्याचशा अनुस्वारांची हीच गत झाली आहे; आणि ही अडगळ इतकी माजली आहे कीं, प्रायः एकादेंदुसरें वाक्यसुद्धां निरर्थक अनुस्वाराशिवाय लिहिणें अशक्य झालें आहे.

करणें, बोलणें, चालणें, असल्या एकारान्त शब्दांतील अनुस्वार आज पुष्कळ दिवस बोलत्या भाषेनें टाकून दिले आहेत. पण लिपींतील त्यांच्या स्थानाला धक्का लावण्याची सोय नाहीं. 'नाहीं' शब्दावरील अनुस्वाराचा उच्चार करा म्हटलें, तरी त्रासदायक जाईल; पण लिपींतील 'नाहीं'च्या डोक्यावर त्याचें स्थान ध्रुवाइतकें अढळ आहे 'गांव, नांव, दांत' वगैरे शब्दांना अनुस्वराचें शिरोभूषण न

घाल्तां बाहेर हिंडावयाला काढा, कीं वैय्याकरणांनीं तुमच्याकडे दांत विचकलेच म्हणून समजा. 'पांच' शब्दांतील पाचेइतका मौल्यवान् अनुस्वार गहाळ झाला तर शुद्धलेखनाकडून त्याचा पंचनामा झाल्याविना कधींहि राहणार नाहीं.

## फुकटा मानकरी!

हा अनुस्वार कोठें दगा देईल याचा नेम नाहीं. कोठें म्हणून विचारलें तर 'कोठें' या शब्दांत तो हजर. त्याला टाळूं पाहूं लागलां तर 'घरीं दारीं' तो तुमचें धरणें धरून बसेल आणि 'येतां जातां बसतां उठतां' तुम्हांस त्यास आदरावें लागेल. या प्रत्येक बाबतींत बोलत्या भाषेनें त्यांस केव्हांच हद्दपार केलें आहे; पण लिपीच्या साम्राज्यांत त्यांचा अनादर केला तर शुद्धलेखनी कोर्टांत सजा मिळत असल्यानें लेखकाला प्रत्येक वेळीं त्याला मुजरा करणें भाग पडतें. उपयोग पाहिला तर काडीचा नाहीं; पण मानसन्मानांत लेशमात्र उणें उपयोगी नाहीं या दृष्टीनें पाहतां अनुच्चारित अनुस्वारांची संस्थानांतील फुकट्या मान-कऱ्यांशीं चांगली तुलना शोभेल. बापजाद्यांनीं कधीं तरवार गाजविली त्या-बद्दल नातवांना मानकरीपणा मिळालेला. दरबारांत कंगणीदार पगडी शिरावर चढवून उसनी वीरासनी ऐट आणून बसण्यापलीकडे काम कांहीं नाहीं. पण मानकऱ्यांपैकीं एखाद्याचा चुकून अपमान तर होणार नाहीं ना याविषयीं दरबार-कारकुनाच्या मनांत नेहमीं धास्ती !

तीच स्थिति अनुस्वाराची. काम पाहिलें तर शब्दांच्या डोक्यावर ऐटीनें बसणें एवढेंच; पण हें उच्चासन एखाद्याला द्यावयाचें राहतें कीं काय हें पाहण्यासाठीं लेखकाला डोळ्यांत तेल घालून बसावें लागतें. लिपीच्या दरबारी व्यवहाराला बिनसरावलेला नवखा लेखक तरी प्रथम जसे शब्द येतील तसे बसवीत सुटतो आणि नंतर शुद्धलेखनाच्या दरबारी कानूंची आठवण झाली म्हणजे अनुस्वारांचे नारळ एक एक मानकऱ्यापुढें ठेवूं लागतो. मोठीं माणसें काम करूं लागलीं म्हणजे चिमुरडीं मुलें ज्यांत त्यांत लांडा कारभार करीत असतात. त्यांचें काम तर मुळींच नसतें पण लुडबुडण्याची हौस मोठी; अशीच स्थिति या अनुच्चारित अनुस्वारांची झालेली आहे. उपयोग म्हटला तर काडीचा किंवा टिंबाचाहि नाहीं. पण प्रुफें तपासणाराचे डोळे बिघडविण्याची व

परंपराप्रिय शुद्धलेखकाच्या हाताखालीं बिन सरावलेल्या लेखकांना सळो कीं पळो करण्याची हौस मात्र मोठी.

## अनुस्वारांची कैफियत

असल्या अनुच्चारित निरुपयोगी अनुस्वारांची उचलबांगडी करावयास वाईट वाटण्याचें वस्तुतः कांहींच कारण नाहीं. पण चिरपरिचित वस्तूंचा विरह हा नेहमींच दुःसह असल्यानें अनुस्वारास हद्दपार करण्यापूर्वी त्याची उपयुक्तता सिद्ध करण्याच्या बाजूनें काय म्हणतां येईल हें पाहिलें पाहिजे.

पहिलें असें कीं, कांहीं शब्दांत अनुस्वार हा उच्चारांत स्पष्ट नसला तरी लिपींत हजर राहून अर्थ बदलण्याचें काम बजावीत असतो. उदाहरणार्थ, नांव हा शब्द पाहा. अनुस्वाररहित हा शब्द लिहिला तर त्याचा अर्थ जड सागरावर तरणारी नाव असा होतो, पण ह्या नावेंत अनुस्वार जाऊन बसला, कीं त्याचा अर्थ भवसागर तरून नेणारें हरीचें नांव असा बदलतो. इंग्रजीमध्येंहि उच्चाराचा देह एकच असतां अक्षरांचे पोषाक बदलून निरनिराळ्या अर्थांचीं सोंगें आणणारे शब्द आहेत. डिसेंट हा एकच शब्द लिपींतील वर्णविपर्ययानें कधीं नाक मुरडून नकार दर्शवील; तर कधीं उतरणीवरून धावत जाण्याचा देखावा दाखवील. अर्थात् एकाच वर्णसत्रांत केवळ बिंदुमात्राचा फरक करून दोन अर्थ साधून देणारा मोठा उपकारी असा हा अनुस्वार लिपींत कायम ठेवणेंच श्रेयस्कर नाहीं काय ? या शंकेवर समाधान असें कीं, क्वचित् ठिकाणीं एखादा शब्द अशा रीतीनें आपलें अर्थरूप पालटण्याकरितां अनुस्वाराचा टिळा लावीत असला तरी पुष्कळ वेळां त्या टिळ्याशिवायहि तो अनेक अर्थरूपें आणूं शकतो. वात हा एकच शब्द अनुस्वाराची टिळेटोपी न करतांहि दिव्याची वात, अर्धांग-वात, तुफानी वात अशीं अनेक अर्थरूपें धारण करूं शकतोच कीं नाहीं ? इंग्रजींतील बोर्ड हा शब्द स्थलकालपरत्वें जेथें ज्या परिस्थितींत असेल तेथें तसें आपलें अर्थरूप पालटण्यांत मोठा पटाईत आहे. शाळेंत त्याचें रूप लिहिण्याचा फळा, तर कौन्सिलांत रेलवे बोर्ड, खाणावळींत त्याचा अर्थ जेवणें, तर प्रवासांत बोटीवर चढणें. संस्कृत भाषेंत, कीं जीमध्यें सबंध काव्येंच्या काव्यें गंगाजमनी वस्त्राप्रमाणें एकीकडून शृंगारपर व दुसरीकडून वेदान्तपर, एकी-

कडून रामायणपर तर दुसरीकडून भारतपर अशीं आढळतात, अशा शब्दांचा नुसता सुळसुळाट आहे. तिच्यांतील कलति व वलति ह्या दोन क्रियापदांना तर पूजासामुग्रींतील कोणत्याहि गैरहजर पदार्थाबद्दल अक्षता वापराव्या तशी कोणत्याहि अर्थी वापरण्यास मुभा आहे. एवंच, एकाच उच्चाराचे दोन शब्द लिहीत असतां क्वचित् ठिकाणीं अनुस्वाराचे साहाय्यानें अर्थभेद स्पष्ट करतां येत असला तरी त्याचें क्षेत्र एकंदरीनें अगदींच आकुंचित आहे.

दुसरें, वाक्यांतील शब्दांचा परस्परसंबंध कळण्यास अनुस्वाराचा कांहीं वेळां उपयोग होत असतो हें खोटें नाहीं. 'तें' ह्या शब्दावर अनुस्वार दिला कीं त्याचा संबंध कोणत्या तरी नपुंसकलिंगी शब्दाशीं असावा हें ध्यानांत येतें. पण अशा शब्दांतहि एकच रूप कोणत्या अर्थी योजलें आहे हें संदर्भावरून ध्यानांत येण्यास कठीण पडत नाहीं. आणि अनेक स्थलीं तर संदर्भावरूनच निर्वाह करावा लागतो. मराठींत द्वितीयेचीं आणि चतुर्थीचीं रूपें व संस्कृतमध्यें पंचमी, षष्ठी एकवचन; तृतीया, चतुर्थी, पंचमी द्विवचन; प्रथमा, द्वितीया, संबोधन अनेकवचन, अशीं किती तरी रूपें समान असतात. पण तीं सर्व संदर्भावरून ओळखलीं जातात. तेव्हां येवढ्याकरितां अनुच्चारित अनुस्वार हा लिहिणें आवश्यक ठरत नाहीं. लिपीला भाषेची फक्त साथ करावयाची असते. अर्थात् गाणारीण ज्या ताना, आलाप, मींड, मुर्क्या घेईल त्या अनुरोधानें भाषेनें साथ केली पाहिजे. भाषेच्या गायकींत अनुस्वार वर्ज्य होऊं लागला तर साथ करणाऱ्या लिपीनेंहि तो वर्ज्य करावा हेंच योग्य.

आतां अनुच्चारित अनुस्वाराच्या बाजूनें असा आणखी मुद्दा मांडतां येईल कीं, क्षेत्रस्थ पंड्याच्या वहीसारखा तो शब्दाची पूर्वपीठिका सांगण्यास केव्हां केव्हां उपयोगी पडतो. उदाहरणार्थ, पूर्वींचेच आपले 'पांच' व 'नांव' हे दोन शब्द घेऊं. कपाळावरील गंधाचा टिळा पाहून जसा वर्ण ओळखावा तसा या शब्दांतील अनुस्वार पाहून हे शब्द संस्कृत पंच व नाम या शब्दांच्या कुलांतील असावेत हें निश्चित करतां येतें. अर्थात् हे अनुस्वार काढून टाकले तर इंग्रजी राज्यांत पोषाकाचा धरबंध न राहिल्यामुळें जात ओळखणें जसें खानेसुमारीवाल्याला कठीण जातें तसें शब्दांचें कुलगोत्र ओळखण्यास व्युत्पत्तिशास्त्रज्ञांना कठीण पडूं लागेल. यावर उत्तर असें कीं, संस्कृतांतील अनुस्वार व मकारादि अनुनासिक उच्चारांत नष्ट झाल्यावर लिपींत अनुस्वाररूपानें शिल्लक नेहमींच असतें असें

नाहीं. पंच यांतील अनुस्वार पांच या शब्दांतील लिपींत कायम राहिला आहे. पण विंशति–वीस, त्रिशत्–तीस यांमध्यें कोठें त्याचा पत्ता आहे! अर्थात् हाहि नियम सर्वगामी दिसत नाहीं.

आतां कोणी असा मुद्दा पुढें करील कीं, उच्चाराप्रमाणें लिपी हें एकदां बंधनकारक तत्त्व म्हणून ग्रहण केलें कीं तें अनुस्वाराच्या बाबतींत फारसें नडलें नाहीं तरी इतर बाबतींत त्यामुळें घोटाळा उडण्याचा संभव आहे. बोलतांना 'करितां' शब्दाऐवजीं 'कर्ता', 'फिरकून' शब्दाऐवजीं 'फिर्कून' असे शब्दप्रयोग उच्चारले जातात तेव्हां ते तसेच लिहावयाचे कीं काय! यावर उत्तर हेंच कीं हे शब्दहि उद्यां बदललेल्या रूपांत लिहिले जाणार नाहींत अशी कोण हमी देणार? पन्नास-पाऊणशें वर्षांपूर्वी करोन, बोलेन वगैरे शब्द लिहीत होतों तसे ते आज न लिहितां बदललेल्या उच्चाराप्रमाणें करून, बोलून, आज लिहितोंच कीं नाहीं? अर्थात् शब्दाचें रूप बदलत जाईल तसतशी ते लिहिण्याची पद्धतहि बदलली जाईल. मात्र उच्चार तसा वर्णाकार हें तत्त्व सरास सर्व ठिकाणीं लावावें असा आग्रह नाहीं. उच्चार खरोखरच बदलला आणि बदललेल्या स्वरूपांत सर्वमान्य झाला म्हणजे तो तसा लिहिण्याचा प्रश्न उद्भूत होतो. आज अनुच्चारित अनुस्वाराच्या बाबतींत उच्चार साफ बदलला असून लिपींत मात्र अनुस्वार कायम राहिला आहे. आतां त्याला रजा देण्याची वेळ आलेली आहे.

शेवटीं, अनुस्वाराच्या बाजूचा शेवटचा मुद्दा म्हणजे 'कांहीं, नाहीं, करितां, बोलतां' वगैरे शब्दांच्या शिरोभागीं अनुस्वार पाहण्याला डोळे सरावलेले आहेत हा होय. त्यामुळें असें म्हणावेंसें वाटतें कीं कधीं व्युत्पत्ति सुचवून, तर कधीं अर्थभेद दाखवून अल्पस्वल्प कामगिरी करणारा चिरपरिचित असा हा अनुस्वार राहीना का बिचारा? डोळ्यांचा सराव ही एक नुसती घूज आहे व ती थोड्या काळांत नाहींशी होऊं शकते. अनुस्वाराचा उच्चार होत होता तोंपर्यंत लिपीला वाहिलेलीं तीं सुवासिक पुष्पें होतीं. पण उच्चाररूपी वास नष्ट होऊन निर्माल्यवत् झाल्यानंतर तीं बाळगण्यांत हशील काय? चिरपरिचित वस्तूंचा त्याग करतांना मनाला हुरहुर वाटते हें खरें; पण अडगळ फार माजली म्हणजे पूज्य वस्तूंनाहि केव्हां केव्हां रजा द्यावी लागते ना?

जुन्या तऱ्हेच्या कुटुंबांतील देव्हाऱ्यांत केव्हां केव्हां देवांची संख्या वाढतां वाढतां इतकी वाढे कीं, योग्य पूज्यभाव बाळगणाऱ्या यजमान पुजाऱ्यालाहि त्यांपैकीं कांहींना गंगार्पण करणें भाग पडे. तोच न्याय लावून उच्चारापासून फारकत झाल्यानें अडगळवजा झालेल्या मराठी लिपींतील अनुस्वारांना रजा देणें अनुचित होणार नाहीं असें वाटतें. महाराष्ट्र साहित्य परिषदेसारख्या वजनदार संस्थेनेंहि या प्रकरणीं बऱ्याच अनुस्वारांना रजा देण्याविषयीं शिफारस केली आहे यामुळें मतैक्य होईल अशी आशा आहे.

---

— १० —

# शास्त्रीय युगांत काव्याला ओहोटी लागेल काय?



भौतिक शास्त्रांच्या वर्धिष्णु तेजामुळें सध्यांच्या चिकित्सक युगांत धार्मिक श्रद्धेला आजच चटके बसूं लागले आहेत. काव्यावरहि अशीच आपत्ति ओढवेल काय? गेल्या शतकांत मेकॉलेनें हाच प्रश्न उपस्थित केला होता आणि त्याचें उत्तरहि देऊन टाकलें होतें कीं मानवी समाज जसजसा संस्कृतिशिखरावर चढूं लागेल तसतसें काव्य अस्तंगिरीची वाट चालूं लागेल. संस्कृतीची वाढ म्हणजे अंधश्रद्धेचा लोप आणि चिकित्सक प्रवृत्ति म्हणजेच शास्त्रांची वाढ असाच मेकॉलेचा अभिप्राय होता. पण हा त्याचा अभिप्राय व्यवहारांत खरा ठरला नाहीं. मेकॉलेचा अभिप्राय लिहून शाई वाळली नसेल तोंच भौतिकशास्त्रांना आणि चिकित्सक प्रवृत्तीला उधान भरती आली; पण या भरतींत काव्य बुडून नामशेष व्हावयाच्या ऐवजीं या भरतीच्या शिगेवर आपलीं अवजारें फुगवून डौलानें आणि वैभवानें तें उलट मिरवूं लागलें. मेकॉलेच्या भविष्याचे पडसाद अन्तराळांत विलीन होण्यापूर्वीच डार्विन, स्पेन्सर, मिल्ल आदींनीं चिकित्सक वृत्तीच्या विराट् लाटा उसळविल्या. पण पट्टीच्या पोहणारानें अंगावर येणाऱ्या तुफान लाटेवर स्वार होऊन तिच्या पाण्याची चूळ घेऊन लीलेनें फवारा उडवून त्यांतून इंद्रधनुष्य निर्माण करावें तसें टेनिसन, ब्राउनिंग वगैरे कविवर्यांनीं नवीन उदयोन्मुख कल्पनाकल्लोलांनींच आपलीं काव्यें शृंगारिलीं.

## काळोखांतील काव्य

बुद्धीवर झापड घालणारें तमोयुग हें मेकॉलेच्या मतें काव्याचें खास युग. सत्ययुगांतून कलियुगाकडे चालतां चालतां धर्माच्या चार पायांपैकीं तीन गळून गेले आणि कलीमध्यें तो पांगळा झाला, तसें शास्त्रीय युगांच्या प्रखर चंड

प्रकाशांत काव्याला अंधारी येऊन तें मटकन् खालीं बसणार असें त्याला वाटलें. पावसाळ्याचे दिवस, करकरीत तिन्हीसांजेची वेळ, बाहेर गर्द अंधारून आलेलें, देवघरांत दिव्यांत वात पडलेली नाहीं; अशा वेळीं चिमुरडीं मुलें एकमेकांला अगदीं चिकटून चिलगून बसून एकमेकांच्या हातांत हात घालून घट्ट धरून आजूबाजूला चोरट्या नजरेनें पाहत भुताखेतांच्या गोष्टी कुजबुतात, ही वेळ काव्याला अत्यंत प्रशस्त असे मेकॉलेला वाटलें. शेजारीं आसपास कोठेंहि खुट्ट वाजलें, दूर कोपऱ्यांत उंदीर चिवचिवला, तिकडे वळचणीला पाल चुकचुकली, कीं इकडे भूत आलें म्हणून मुलांच्या अंगावर शहारे आलेच आणि हात घट्ट आवळलेच! तसें अंधश्रद्धेच्या काळांत कवि रंगवील तें तें विश्वकाव्य भक्ताला खरें वाटूं लागतें आणि त्यांत तो रंगून जातो. भुयारें, बळदें, तळघरें अशासारख्या अंधाऱ्या जागा काव्याला फार मानवतात. तर शास्त्रीय शोधांचें विद्युत्‌दीप या अंधाऱ्या जगांतून लकलकूं लागले म्हणजे काव्य तेथून पळ काढील अशी मेकॉलेची कल्पना. पण या दाट अंधाऱ्या भुयारांत शास्त्रीय शोधाच्या किरणांनीं दिसूं लागतांच काव्यदृष्टि आंत न्याहाळून पाहूं लागली तों या भुयारांत पूर्वी न पाहिलेलें असें अपूर्व जडजवाहीर तिला दिसून आलें आणि तें अंगीं लेऊन तिनें आपल्या सौंदर्यांत अधिक भरच घातली. प्राणिशास्त्र, भूस्तरशास्त्र, खगोलशास्त्र, पदार्थविज्ञानशास्त्र, या शास्त्रांनीं ज्ञानसागरांतील नव्या नव्या अज्ञात बेटांचा शोध लावला तेव्हां शून्यांतदेखील वसाहती करूं पाहणाऱ्या काव्याला आपलें साम्राज्य विस्तारण्याला नवीं क्षेत्रें निर्माण झालीं म्हणून उलट आनंद झाला. आणि मेकॉलेचें भविष्य हें मात्र अंधाऱ्या जागीं वावरणाऱ्या भूताप्रमाणें भूत ठरलें!

मेकॉलेचें भविष्य खोटें ठरलें तरी काव्याच्या नाण्यांत कांहीं तरी कोठें रती अर्ध रती का होईना पण हिणकस असावें हा संशय प्लेटोइतका जुना आहे. आणि तो विहिरीवर उगवणाऱ्या पिंपळाप्रमाणें मुळाशीं तुटला असें वाटलें तरी पुन्हा कांहीं दिवसांनीं तरारूं लागतो. मेकॉलेचें भविष्य वर्तविण्याला तसें पाहिलें तर कांहीं फार काळ लोटला नाहीं. त्याच्यानंतर शास्त्राची भरभराट झाली असली तरी ह्या शास्त्रांचीं प्रमेयें व विचारपद्धति हीं सर्व समाजांत अद्याप रुजलेलीं नाहींत. पण पुढें मागें समजा शुद्ध शास्त्रीय ज्ञानाला वाट पुसत व केवळ शास्त्रीय ज्ञानाला स्मरून समाजाची पुनर्घटना करण्यांत आली तर अशा

समाजांत काव्याचें स्थान कोणतें राहील? सामाजिक पुनर्घटनेचीं सुखस्वप्नें सध्यां पुष्कळांना पडूं लागलेलीं आहेत आणि शब्दसृष्टींत तीं चितारलींहि गेलीं आहेत. या चित्रांपैकीं एक चित्र बरट्रॅन्ड रसेलनें रंगविलें आहे. त्याच्यामध्यें या नव्या काल्पनिक बावनकशी शास्त्रीय समाजांत नेत्यांचा, पुढाऱ्यांचा, अंमलदारांचा जो एक खास वर्ग निर्माण करावयाचा त्याचा शिक्षणक्रम हा सामान्य जनसमूहापेक्षां निराळा आखावयाचा अशी कल्पना केलेली आहे. आतां या शिक्षणक्रमांत काव्याला स्थान कोणतें आणि कोठें द्यावयाचें? काव्य हें ज्ञानवेलीवरील सुगंधी सुमन व उत्तमांगीं मिरवावें ही त्याची स्वभावसिद्ध योग्यता तर काव्याला पहिलें मानाचें स्थान या शिक्षणक्रमांत दिलें असावें, नाहीं? पण छे! शिक्षणक्रमाच्या अग्रभागीं कांहीं काव्य चमकताना आढळत नाहीं. मग दुसरें तरी? शास्त्राला देव मानणाऱ्या समाजांत पहिल्या मानाच्या स्थानीं शास्त्रांनीं विराजमान व्हावें हें स्वाभाविक. तेव्हां काव्याला बहुधा दुसरें स्थान असावें. पण छे! तेथेंहि त्याचा पत्ता लागत नाहीं. मग या शिक्षणक्रमांत काव्याला अगदीं शेवटचा नंबर दिला आहे कीं काय? नाहीं, तसें मात्र नाहीं, शेवटचा नंबर नाहीं त्याला दिलेला. कारण त्याला मुळीं नंबरच दिलेला नाहीं! म्हणजे? म्हणजे असें कीं या शिक्षणक्रम आखणाऱ्यांचें असें मत आहे कीं, या क्रमांत काव्याचा अंतर्भाव करण्याचेंच कारण नाहीं. कारण शास्त्राधिष्ठित समाजांत ज्यांना लोकांचे नेते म्हणून वावरावयाचें आहे त्यांना काव्याचा काडीइतकाहि उपयोग नाहीं! खुद्द रसेलचें हें मत नव्हे. पण शास्त्राच्या खाणीबाहेरील एक कपारीहि न घेतां समाजाचा सबंध इमला उठवायचा झाला तर तो कसा दिसेल याचें रसेलनें जें काल्पनिक चित्र रेखाटलें आहे त्यांत काव्याची दशा वरीलप्रमाणें दर्शविली आहे.

## काव्याचें भवितव्य

मग सध्यांच्या शास्त्रीय युगांत काव्याला एकंदरींत दिवस येणार आहेत तरी कसले? आज रूढ असलेल्या समाजघटनेंत नव्या शास्त्रीय प्रमेयांचा अजून शिरकाव झालेला नाहीं. शास्त्रीय ज्ञानानें मोठा पल्ला गाठला असला तरी समाजरचना अद्याप रेंगाळतच आहे. पण ही स्थिरावस्था फार दिवस टिकणें शक्य नाहीं. शास्त्राला चढत चाललेलें तेज इतकें लखलखीत आहे, कीं त्याचीं किरणें समाज-

जीवनाच्या कान्याकोपऱ्यांतहि घुसल्याशिवाय राहणार नाहींत. तशीं तीं घुसलीं, शास्त्रीय विचारसरणी रूढ झाली, तर तिचा काव्य व त्याचीं भावंडें ज्या ललित-कला त्यांच्यावर एकंदर परिणाम होईल तरी काय ? चिकित्सक प्रवृत्तीनें धर्माच्या राज्यांतील कांहीं कल्पनांना धक्के देण्यास सुरुवात केलीच आहे. स्वर्गांतील अमृत पिऊन अप्सरांच्या बाहुपाशांत लोळणारें आयुष्य आणि नरकांतील खातेऱ्यांत लोळून उकळत्या तेलाच्या कढईत बुडणारें आयुष्य हीं आतां फक्त मौजेचा विषय म्हणूनच उल्लेखिलीं जातील. त्यांनीं तोंडाला पाणी सुटण्याचे किंवा अंगावर शहारे येण्याचे दिवस संपलेच. खुद्द आत्मा, पुनर्जन्म वगैरेसारख्या जिव्हाळ्याच्या मानलेल्या तत्त्वांविषयींहि चिकित्सक वृत्तीचें समाधान होत नाहींसें झालें आहे. कारण या वृत्तीची ठेवण अशी आहे कीं, प्रत्यक्ष प्रमाणानें आणि प्रयोगपडताळ्यानें सिद्ध होणारें तेवढेंच सत्य म्हणून स्वीकारावें. निर्भेळ निष्ठुर सत्याविषयीं चिकित्सक वृत्तीची सर्व आटापीट. मग या प्रयोग-सिद्ध सत्याच्या मागें लागून धार्मिक श्रद्धाविषयासंबंधीं जशी असमाधान वृत्ति निर्माण झाली तशी काव्याविषयीं तर होणार नाहीं ?

प्लेटो म्हणे कीं काव्याकडेहि अशाच साशंक वृत्तीनें पाहिलें पाहिजे. काव्य हें धडधडीत कल्पित अशा साळू-मैनांच्या गोष्टी अशा रीतीनें रंगवितें कीं, त्या जणों खऱ्या समजून वाचकानें त्या वाचण्याऐकण्यांत अगदीं दंग होऊन जावें. आणि दुसरें असें कीं, वाचकांच्या भावना उद्दीपित करून त्यांना भावनातरल करून सोडतें. प्लेटोचा आक्षेप हा असा दुहेरी होता. त्याच्या मतें काव्य सत्य आणि असत्य यांची गल्लत करून टाकतें आणि रसिकांना भावनाप्रधान आणि तरलहृदय करून सोडतें. आणि हे दोन्ही पदार्थ संस्कृतिसंवर्धनास वावडे आहेत असें त्यास वाटे. मानवानें भव्य संस्कृतिप्रासाद उभविला आहे तो बुद्धीच्या जोरावर. त्या बुद्धीवर झांकळ आणील अशा कोणत्याहि गोष्टीस उत्तेजन देऊन उपयोगी नाहीं. काव्य हें भावनांना हेलावून जीवनांतील प्रश्नांकडे स्थिर, चिकित्सक, व्यावहारिक दृष्टीनें पाहण्यास कमकुवत करतें असा त्याचा अभिप्राय होता. म्हणून रसेलच्या काल्पनिक शास्त्रीय समाजांतल्याप्रमाणें प्लेटोच्या आदर्श समाजांतहि काव्याला कोठेंच स्थान दिलेलें नाहीं. रसेलच्या शास्त्रीय समाजांत सामान्य जनतेला करमणुकी-खातर काव्याची गरज लागली तर लागेल व तेवढी भागविण्यापुरतें काव्य

राहिलें तरी हरकतहि नाहीं; पण समाजांतील श्रेष्ठतम अशा वर्गाला व समाजनेत्यांना काव्याची पुसट ओळख देखील करून घेण्याचें कारण नाहीं. समाजजीवनांत कांहीं प्रश्न उत्पन्न झाले कीं शास्त्रीय पद्धतीनें म्हणजे पुरावा गोळा करून पडताळा घेऊन जीं प्रमेयें निष्पन्न होतील त्यांची एकजात सरसहा निर्लेप मनानें अमलबजाणी करणें हें त्या प्रश्नाचें उत्तर असें केवळ शास्त्रवादी म्हणणार. असे प्रश्न उपस्थित झाले असतां जसे ते जुन्या धर्मशास्त्राला विचारणार नाहींत तसा काव्याच्या काल्पित कथांतील नायकांचाहि सल्ला घेणार नाहींत, कारण दोन्हींहि असिद्ध असे कल्पित हवेंतील मनोरे.

असिद्ध आणि कपोलकल्पित कल्पनांचा आरोप गुदरावयाचा तर धर्म आणि काव्य यावर तो सारखाच गुदरला जावा असेंच प्रथमदर्शनीं वाटतें. धर्मातील स्वर्गनरकादि प्रांत हे जसे तर्कभूमीच्या बाहेरील विश्वांत वसलेले, तसेच आरबी भाषेंतील सुरस गोष्टी जेथें घडल्या ते प्रांतहि शून्यांत नाहीं का वसलेले ? तर मग वाढत्या चिकित्सक बुद्धीनें धार्मिक कल्पनांना तडाखे देण्यास सुरुवात केली असतां तिनें काव्याची तरी तमा कां करावी ? रसेलचा कल्पित आदर्श चिकित्सक समाजनेता मनश्चक्षूंपुढें आणला तर तो असा दिसेल कीं, एका हातानें धर्मकल्पनेला बाजूस सारीत आहे, दुसऱ्या हातानें कविता-कामिनीला दूर सारीत आहे आणि संमुख असलेल्या विवेकवनितेशीं तेवढा सुखसंवाद करीत बसला आहे.

चिकित्सकवृत्ति वाढत्या प्रमाणावर आहे, तिचें वैभव दिवसेंदिवस खुलणार आहे, हर प्रसंगीं तिची सल्लामसलत घेतल्याशिवाय पान हलणार नाहीं असें सर्वाधिकारत्व तिला प्राप्त होणार आहे; या गोष्टी मान्य केल्या तर या चिकित्सक वृत्तीचें आणि कल्पनेंत रंगणाऱ्या कलावृत्तीचें पूर्वीप्रमाणें सूत राहणार कीं नाहीं आणि एकाच मनोमंदिरांत या दोघीजणी खेळीमेळीनें नांदूं शकतील कीं नाहीं हा प्रश्न साहजिकच सुचतो. हाच प्रश्न आणखी निराळ्या तऱ्हेनें मांडावयाचा तर असें विचारतां येईल कीं, रसेलनें कल्पिल्याप्रमाणें शास्त्रांचा अंमल उद्यां सुरू झाला तर समाजजीवनांत काव्य आणि ललितकला यांना कांहीं स्थान राहील कीं नाहीं ?

हा प्रश्न उपस्थित करतांना एक-दोन गोष्टी मुळांतच गृहीत धरल्या आहेत. त्यांची फोड केली म्हणजे मूळ प्रश्नाची उभारणीच लटपटेल. आणि मग

त्याचें उत्तर येवढेंच येईल कीं, चिकित्सक वृत्तीच्या ऐन मोसमांत आणि शास्त्रीय समाजरचनेच्या जारी अमलांतहि काव्यकलांचें स्थान अबाधित राहील. म्हणजे कसें तरी त्यांना मेहेरबाबीनें जिवंत राहूं दिलें जाईल असें नव्हे तर समाजधारणेंतील एक महत्त्वाचा घटक म्हणूनच तीं राहतील.

## कल्पित पण असत्य नव्हे

पहिलें गृहीत कृत्य असें कीं काव्यसृष्टीची उभारणी असत्यावर झालेली आहे, हें होय. कां, तर ती कल्पित मालमसाला वापरते म्हणून! आणि कल्पित म्हणजेच असत्य! म्हणून प्लेटोची विचारसरणी अशाच धर्तीची होती. पण तींतील हेत्वाभास त्याचा शिष्य अरिस्टॉटल यानेंच उघड करून दाखविला आहे. काव्यांतील सृष्टी ही काल्पनिक असतें हें खरें, पण काल्पनिक असतें म्हणजे असत्य असतें असें मात्र नव्हे. चंद्रगुप्त किंवा चाणक्य ह्या ज्या अर्थानें खऱ्याखुऱ्या ऐतिहासिक व्यक्ति होऊन गेल्या तशा अर्थानें चारुदत्त आति वसंतसेना यांना ऐतिहासिक व खऱ्याखुऱ्या पार्थिव देहानें वावरणाऱ्या व्यक्ति मानतां येणार नाहीं. तर मग त्यांना असत्य म्हणा. 'नाहीं', अरिस्टॉटल बजावतो 'नाहीं, लिवार नाहीं. त्या असत्य तर नव्हेतच पण उलट ऐतिहासिक व्यक्तीपेक्षांहि याच व्यक्ति खऱ्याखुऱ्या अधिक सत्यमय होत.' चंद्रगुप्त आणि चाणक्य हे प्रत्यक्ष पार्थिव देहानें वावरले म्हणून सत्य आणि चारुदत्त-वसंतसेना फक्त नाटकाच्या रंगभूमीवरच तेवढीं वावरलीं म्हणून असत्य म्हणावयाचीं! छे, मुळींच नाहीं. चंद्रगुप्त आणि चाणक्य ह्या ऐतिहासिक व्यक्तींत सत्य आहे तें फक्त या दोन व्यक्तींनीं परिवेष्टित असें मर्यादित सत्य होय. उलट चारुदत्त-वसंतसेना या कल्पित पात्रांत सत्य आहे तें अधिक विशाल स्वरूपाचें आहे. रंगभूमीवरील चारुदत्त आणि वसंतसेना हीं, व्यक्ति या नात्यानें सत्य नसतील; पण रंगभूमीवरील त्यांचा अभिनय पाहण्यास आलेल्या स्त्रीपुरुष-समाजांत चारुदत्त आणि वसंतसेना असंख्य आढळतील. या असंख्य व्यक्तींतील सर्वांना समान असणारे असें जे कांहीं स्वभावविशेष ते या रंगभूमीवरील चारुदत्त व वसंतसेनेंत एकत्र केंद्रीभूत झालेले आहेत. म्हणजे या नुसत्या साध्या मिळमिळीत पुसट आकाराच्या व्यक्ति नसून एक विशिष्ट स्वभावाचे ठसकेदार, रेखीव कातीव नमुने होत. म्हणूनच व्यक्तिदृष्टया

या कमी सत्यमय भासल्या तरी समष्टिदृष्टया या अधिक सत्यमय होत. याच अर्थी अरिस्टॉटलनें अभिप्राय दिला आहे कीं, काव्यांतील सत्य हें ऐतिहासिक सत्यापेक्षां अधिक विशाल व्यापक स्वरूपाचें आहे.

## समष्टिगत सत्य

भौतिक शास्त्रांचाहि या अभिप्रायास मान्यता मिळण्यास प्रत्यवाय येणार नाहीं. भौतिक शास्त्राचे नियम हे कांटेकोर शंभर नंबरी सत्याचे नमुने म्हणून समजले जातात. पण त्या नियमांच्याहि मर्यादा दिसूं लागल्या आहेत आणि व्यक्तिगत सत्य आणि सामुदायिक सत्य हीं भिन्न मानण्याची आवश्यकता उत्पन्न झाली आहे. वायूचा गुण प्रसरण पावण्याचा आहे, हा एक साधा शास्त्रीय सिद्धान्त घ्या. दोन बाटल्या एकमेकींशीं एका नळीनें जोडून ठेवल्या आहेत अशी कल्पना करा. एक तांबडी असून तींत एक वायु भरलेला आहे व दुसरी निळी निर्वात केलेली आहे. आतां या दोन्ही बाटल्या एकमेकींशीं नळीनें जोडल्या गेल्या कीं लगेच तांबडया बाटलींतील वायु निळ्या बाटलींत हळूहळू जाण्यास सुरुवात होणार हा कायमचा शाश्वत असा सिद्धान्त आहे व तो एकंदर वायूचा समूह घेतला असतां पूर्ण सत्यमय आहे. पण या प्रसरणक्रियेंत तांबडया बाटलींतल्या वायूंतील असंख्य परिमाणूंपैकीं कोणता विशिष्ट परिमाणु केव्हां निळ्या बाटलींत जाईल हें सांगा असा जर कोणी आग्रह धरला तर मात्र शास्त्रज्ञाला हात टेकावे लागतील. त्याचा नियम सत्य खास आहे; पण तो सामुदायिक दृष्टया सत्य आहे. रेडियमसारखे किरणोत्सर्गी जे पदार्थ आहेत त्यांतहि व्यक्तिगत किरण घेतला तर सिद्धान्त बांधणें असेंच अवघड होऊन बसतें.

जनसंमर्दाच्या मानसशास्त्रांचाहि हाच अनुभव आहे. हजार माणसें घेतलीं तर विशिष्ट प्रसंगीं तीं कशीं वागतील ह्याचें भविष्य वर्तवितां येण्यासारखें असतें. पण त्यांतील एका व्यक्तीचें भविष्य वर्तविणें म्हणजे शास्त्राला भलत्या इरेस घालण्यासारखें आहे. रोम शहरानें पेट घेतल्यावर त्यांतील हजारों नागरिकांनीं काय केलें असलें पाहिजे असा प्रश्न विचारला, तर खुशाल उत्तर देतां येईल कीं त्यांनीं आग विझविण्याचाच प्रयत्न केला असला पाहिजे. पण रोम-मधील एखादी व्यक्ति टिपून काढून तिच्याविषयीं हाच प्रश्न विचारलात तर

मात्र मौन हेंच उत्तम उत्तर. कारण सबंध शहर एकीकडे जळत असतां दुसरीकडे संथपणें आणि रंगेलपणें वीणा छेडीत बसणारी एक तरी व्यक्ति होतीच. तिचें नांव इतिहासाच्या दप्तरीं नेरो म्हणून नमूदहि आहे. येथें व्यक्तिविषयक नियम चुकला पण समाजविषयक नियम खोटा पडला नाहीं. आग लागली असतां हजार माणसें घेतलीं तर तीं विझविण्याकरितां पाणी घेऊन धावूं लागतील हें सामुदायिक सत्य मुळींच खोटें नाहीं. तात्पर्य, व्यक्तिगत सत्य आणि सामुदायिक सत्य असा विवेक स्वीकारला म्हणजे काव्यांतील पात्रें हीं असत्य तर नव्हेतच उलट तीं निराळ्या अर्थानें अधिक सत्यमय कशीं हें ध्यानीं येईल.

## सांकेतिक सत्य

शिवाय काव्यांतील पात्रें व्यक्तिशः सत्य नसतांहि चिकित्सक वृत्तीच्या डोळ्यांत खुपत नाहींत याचें कारण असें कीं आम्हांला व्यावहारिक सत्य माना असा तीं मुळीं आग्रहच धरीत नाहींत. धर्मांतील पारलौकिक स्वर्गनरकादि कल्पनांचें असें नाहीं. स्वर्गनरकादिकांचीं चित्रें ज्यानें प्रथम रंगविलीं तो कल्पक कवि असला पाहिजे. हीं चित्रें रंगवितांना त्यानें उंच अनंत आकाशाला शिडी लावून तेथून स्वर्गनरकाचा देखावा पाहण्याऐवजीं हा कविकोकिल फक्त कविता शाखेवरच तेवढा आरूढ झालेला असावा. परोपकार हा समाजधारणेला पोषक असा गुण आहे असें समाजशास्त्रीय गद्यमय रूक्ष भाषेंत न मांडतां तो म्हणाला कीं परोपकार हें पुण्य आहे आणि त्याचें फळ परलोकीं अमृतपान व अप्सरा-समागम हें होय. साधी गोष्ट अशा नवलाईनें मांडणें हें काव्य आहे. संस्कृतीच्या प्राथमिक अवस्थेंत या काव्यकाचेच्या पाठीमागें श्रद्धेचें रुपेरी रोगण लावलेलें असून दर्पणांतल्याप्रमाणें पाहणाराच्या मागें असलेले स्वर्ग-नरक त्याला दूर अंतराळांत स्पष्ट दिसूं लागले असावेत. पण चिकित्सक वृत्तीचीं किरणें तापूं लागलीं म्हणजे हें श्रद्धेचें रोगण वितळून जातें आणि मग दर्पणांत दिसणारीं दृश्यें विरून जातात. स्वर्गनरकादि कल्पना ह्या नुसत्या कविकल्पना नसून साक्षात् सत्यमय होत असा वाद धर्म मांडूं लागला म्हणजे चिकित्सक वृत्तीलाहि त्याच्याशीं तंडावें लागतें. काव्याचा अशा प्रकारचा कोणताच आग्रह नसतो. त्याची भूमिकाच कल्पनाविलासाची असते. काव्याचा संकेतच खिलाडू वृत्तीचा असतो. ओल्या शाडूचा गोळा घ्यावा आणि

त्याला हवा तो आकार द्यावा. गणपति करावा, पुन्हा मोडावा. मुरलीधर करावा, पुन्हा मोडावा. असें खेळ खेळावयाचा असेतोंवर हवें तितका वेळ खेळत बसावें; पण बनलेल्या मूर्तीची एकदां प्राणप्रतिष्ठा झाली म्हणजे मात्र ती पुन्हा मोडतां येत नाहीं. तिचें मग विधिपूर्वक विसर्जन केलें पाहिजे. पहिली वृत्ति काव्याची आणि दुसरी धर्माची होय. समोरच्या रंगभूमीवरील नट आणि नटी हीं तात्पुरतीं कांहीं काल खरोखरच चारुदत्त-वसंतसेना आहेत असें मुद्दामच मानावयाचें असा काव्याचा प्राथमिक संकेत एकदां मान्य केल्यावर मग मात्र या चारुदत्त आणि वसंतसेना यांच्या प्रेमलीला या सामुदायिक सत्याशीं अविरोधी अशाच दाखविल्या पाहिजेत असा दण्डक काव्यालाहि पाळावाच लागतो. म्हणजे कथानक हालूं-बोलूं लागल्यावर तें व्यापक-दृष्ट्या सत्य असावेंच लागतें. पण मूळ संकेत हा मात्र उघड उघड चिकित्सक वृत्तीशीं संगनमत करूनच जणूं कांहीं केलेला असतो. आई मुलीला भातुकली खेळावयास देते तेव्हां खेळतांना मुलगी आपलीच नक्कल करणार, भावलीला नुसती नाहूंमाखूं घालणार, एवढेंच नव्हे तर काजळ घालून रडूं लागली म्हणजे आई दटावते, रागावते तशी दटावणार व रागावणारहि हें सर्व आईला माहीत असतें. पण तशी अर्धवट गर्भित संमतीच असल्यानें आईला राग न येतां उलट कौतुकच वाटतें. तसाच प्रकार चिकित्सक बुद्धि आणि कल्पना यांचा आहे. म्हणूनच काव्यांतील सांकेतिक असत्याचें आणि चिकित्सक बुद्धीचें पटूं शकतें. यामुळें चिकित्सक शास्त्रीय वृत्तीच्या अत्यंत प्रखर काळींहि काव्यवृत्तीची नाजूक वेली सुकून जाण्याचा प्रसंग येणार नाहीं.

## समाजधारणेंतील काव्याचें श्रेष्ठ स्थान

सुकून न जावो पण वरील माय-लेकीच्या दाखल्यांत वर्णिल्याप्रमाणें तिला दुय्यम स्थान तरी प्राप्त होईल कीं नाहीं? भातुलकीनें खेळणाऱ्या मुलीची आणि पाहणाऱ्या आईची थोडा वेळ करमणूक होईल; पण आईच्या संसारावर त्याचा प्रत्यक्ष परिणाम असा कांहींच होणार नाहीं. काव्याचेंहि स्थान क्षणभर करमणूक एवढेंच राहील काय? करमणूक करणें, मनाचा ताणशीण नाहींसा करून त्याला पुन्हा उल्हसित करणें, ही कामगिरी तर शाश्वत कायम राहीलच; पण याहीपेक्षां श्रेष्ठ प्रकारची कामगिरी काव्याला नेहमीं बजावावी लागते. आणि महत्त्वाची गोष्ट अशी कीं, धार्मिक श्रद्धा उतरणीस लागली तर काव्याच्या या कामगिरीची

जबाबदारी शतपटींनीं वाढेलच. ही श्रेष्ठतर कामगिरी म्हणजे सामाजिक ध्येयें समाजाच्या मनोभूमींत पक्की रुतविणें, रुजविणें ही होय. धार्मिक श्रद्धेचा अंमल असेतोंवर 'चोरी करूं नको, हिंसा करूं नको' हा उपदेश पटवून देणें सोपें असतें. दान करशील तरी स्वर्गी नांदशील, हिंसा करशील तर नरकीं लोळशील एवढें बजावलें म्हणजे पुरें. चिकित्सक युगांतहि या गोष्टी पटवून द्याव्या लागतीलच. आणि त्या पटवून देतांना प्रथम वादविवादाची पद्धत स्वीकारली तरी त्याची छाप स्थिर राहण्यास, त्या अंतरंगांत शिरून बसण्यास, शेवटीं काव्याचीच कास धरावी लागेल.

समाजधारणेंत काव्य आणि ललितकला यांचें आणखीहि एक महत्त्वाचें कार्य आहे. समाजधारणेचा मध्यवर्ती प्रश्न म्हणजे व्यक्तिव्यक्तींमधील स्वार्थांची सांगड घालणें हा होय. व्यक्तिमात्राची सर्व धडपड सुखाकरितां असते आणि हें सुख मला न मिळतां दुसऱ्याला मिळालें म्हणजे हेवा वाटतो, मत्सर वाटतो स्वार्थां-स्वार्थांचा विरोध उभा राहतो. पण कांहीं सुखें अशीं अमर्याद आणि अवीट स्वरूपाचीं आहेत तीं एकाच वेळीं अनेकांना आणि हवीं तेवढीं मिळूं शकतात. काव्य आणि ललितकला यांपासून मिळणारें सुख हें असेंच अनंत, अवीट आणि निःस्वार्थ असतें. या सुखाला व्यक्तीच्या स्वार्थाची मर्यादा पडत नाहीं. याचा झरा अखंड वाहत असतो. त्यावर कोणाही पिपासूनें आपली तहान भागवून घ्यावी. असले अखंड झरे जितके निर्माण होतील तितकें सामुदायिक सुख वृद्धिंगत होईल आणि वैयक्तिक स्वार्थ क्षय पावेल. साहित्य-संगीतकलाविहीनाला पुच्छ नसलेला पशु म्हणून भर्तृहरीनें झिडकारलें आहे तें याच अर्थानें. स्वार्थाला मर्यादा घालीत आणि विरोधी स्वार्थांचा समन्वय करीत करीत माणूस पशूच्या अवस्थेंतून हळूहळू वर येत चालला आहे. आणि हा हितविरोध काढून टाकण्याच्या क्रियेंतील मुख्य भाग म्हणजे वैयक्तिक मर्यादित सुखाच्याऐवजीं सामुदायिक अमर्याद सुखस्थानें वाढविणें हा होय. तीं वाढविण्याची कामगिरी काव्यादि ललितकलांची होय. व्यक्तिनिष्ठ मर्यादित सुखापेक्षां सामुदायिक सुख अनुभवण्याची प्रवृत्ति ज्या मानानें समाजांत वाढत जाईल त्या मानानें समाजजीवनांत सुरेलपणा वाढेल. आणि अशा प्रकारच्या प्रवृत्तींची जोपासना करणाऱ्या ज्या शक्ति आहेत त्या शक्तींमध्यें काव्याचें स्थान फार उच्च आहे.

---

— ११ —

# स्वामित्वभावना विरुद्ध सौंदर्यभावना



माझ्या बंगलीच्या समोर अंगणांत एक सुंदर लहानशी बाग आहे. रोज प्रातःकाळीं उठून त्या बागेंत जाऊन खुर्ची टाकून तेथें बसणें हा एक माझा नित्याचा परिपाठ होऊन बसला आहे.

सकाळची उषःकाळची वेळ ही आधींच आल्हादकारक. सूर्याचीं कोमल आरक्त किरणें सर्वत्र पसरलेलीं. बागेंतील फुलझाडें फुललेलीं आणि चित्र-विचित्र रंगांनीं नटलेलीं. सर्व वातावरण प्रशान्त पण प्रोल्हसित अशा वृत्तींत बुडून गेलेलें. अशा स्थितींत सूर्य झपाझप पावलें टाकीत वर केव्हां येई हें कळत नसे.

या वेळीं मला सर्वांत अधिक आल्हाद कशापासून होत असेल तर बागेंतील या पुष्पावरून त्या पुष्पावर उडणाऱ्या फुलपाखरांची क्रीडा निरीक्षण करीत बसण्यांत. किती तेजस्वी आणि चित्रविचित्र त्यांचे रंग, किती कोमल स्पर्श, किती तरल आणि त्वरित गति! पुष्पांशीं इतकें काय त्यांचें हितगुज चाललेलें असतें तें त्यांचें त्यांनाच माहीत! एकदां एका पुष्पाच्या कानांत कांहीं कुजबुजून लगेच दुसरीकडे जावें, आणि क्षणार्धांत कांहीं तरी आठवल्या-सारखें करून पुनश्च पहिल्या पुष्पाशीं येऊन गुंगावें असा अव्याहत त्यांचा खेळ चाललेला असे. पुष्पांचा मधु लुटून घेऊनच्या घेऊन पुन्हा त्यांना आनंदित करावयाचें ही कला हें फुलपाखरा तुलाच साधावयाची. तुझ्या पंखांवर हें इतके मनोहर रंग कसे उमटले हें आतां मला कळलें. पुष्पांशीं तूं इतका तद्रूप होऊन जातोस, आत्मीयत्व विसरतोस, म्हणूनच पुष्पांचें रम्योज्ज्वल रंग तुझ्या पंखांवर न कळत उमटत असावे. पुष्पांचें सौंदर्य खुलवावें आणि आपणहि आनंद लुटावा हें तुझ्या खेळकर वृत्तीलाच साधूं जाणे.

बागेंत विहरणाऱ्या या फुलपाखरांची क्रीडा पाहत बसणें हें माझें नित्याचें व्यसनच होऊन बसलें होतें. या नित्याच्या व्यवसायांत एक दिवस अकल्पितपणें खंड पडला.

एके दिवशीं सकाळीं नित्याप्रमाणें बंगलीचें दार उघडून बाहेर जों डोकावतो तों सूर्यकिरणांचा सुखोष्ण कोमल स्पर्श अनुभवावयास सापडण्याऐवजीं आकाशांत मेघ आल्यासारखें दिसूं लागलें. दिवस तर ऐन वसंत ऋतूचे. वर पाहूं लागलों तोंच जो मेघ म्हणून दिसत होता तो झपाट्यानें खालीं येऊं लागला, विस्तार पावूं लागला, व पाहतां पाहतां जमिनीवर हजारों—लाखों लहान लहान सावल्या पळत सुटल्यासारखें दिसूं लागलें. विचार करण्यास वेळच नव्हता. समोरचा मेघ देखतादेखत विरून जाऊन त्यांतून लाखों कीटक बाहेर पडूं लागले, बंगलींत शिरूं लागले. अधिक विचार न करतां मी बंगलींत परत आलों व दारें बंद करून घेतलीं.

दोन-तीन तासांनीं बाहेर येऊन पाहतों तों माझ्या आवडत्या बागेंत किती विलक्षण, किती भेसूर फरक पडलेला! हसऱ्या गालाच्या प्रफुल्ल चेहऱ्याप्रमाणें सतेज टवटवीत पुष्पांचा आतां मागमूसहि राहिलेला नव्हता. दुष्काळांतील उपासमारीनें काळवंडलेल्या व अस्थिशेष उरलेल्या सापळ्याप्रमाणें फुलझाडांचे नुसते खराटे उभे होते; आणि आजूबाजूस सर्वत्र त्या संहारक कीटकांचा सडा पडलेला होता.

निरखून पाहूं लागलों तों किती हिडीस प्राणी! असंख्यतर कीटक खातांखातांच मरून पडले होते. फूल नाहीं, फळ नाहीं, पान नाहीं, अमुक एक त्यांनीं खावयाचें बाकी ठेवलें होतें, असें नाहीं. तोंडाशीं येईल तें खाऊन फस्त! सर्व इंद्रियें तोंडांतच एकवटलीं होतीं कीं काय कोण जाणे! पण इतकें मनसोक्त खाऊन चेहरे पाहावे तों किती फिकटलेले आणि पाय किती फेंगडे! हजारों तर नुसते खाऊनच मृत्युपंथाला लागलेले आणि त्यांचे बाकीचे संवगडी त्यांची फिकीर न करतां स्वतः अधिकच खात सुटलेले.

## फूल-पांखरूं आणि टोळ

फुलपांखरूं आणि टोळ! किती विदृश जोडी ही! एकाची वृत्ति जगांतील सौंदर्याचा आस्वाद घेऊन जग आनंदानें भरून टाकावें ही, तर दुसऱ्याची

जगांतील सौंदर्य बळकावून, भक्षून फस्त करून जग दुःखाच्या गर्तेत लोटून द्यावें ही.

आज जगभर धुमसत असलेल्या असमाधानाच्या मुळाशीं हीच टोळधाडी स्वामित्ववृत्ति नाहीं का? एका व्यक्तीनें दुसऱ्या व्यक्तीवर, एका जातीनें दुसऱ्या जातीवर, एका राष्ट्रानें दुसऱ्या राष्ट्रावर आक्रमण करून सत्ता, मत्ता, सौंदर्य हीं सर्व आपणच बळकावून बसावयाचें, हीच वृत्ति आजच्या जगाच्या पोटदुखीच्या मुळाशीं आहे. सर्व जगाचें शेत मी पिकवीन, दुसऱ्याला त्यांत नांगर टाकून देणार नाहीं; धान्य विकलें गेलें नाहीं तर उभें पीक जाळून टाकीन, पण कोणाच्या झोळींत चिमूटभर उचलून टाकणार नाहीं; स्पृश्यवर्ग देवदर्शनाची हेळसांड करूं लागला तर देवळाला टाळें लावीन पण अस्पृश्याची सावली देवळावर पडूं देणार नाहीं; एक ना दोन– सर्वत्र स्वामित्वाची अरेरावी वृत्ति.

या वृत्तीचा करडा लष्करी अंमल जोंवर जगावर चालू आहे तोंवर सुख-शान्तीला समाजांत निवाऱ्याचें स्थान मिळणार नाहीं. स्वामित्वाची वृत्ति ही एक जहरी निशा आहे. जों जों निशापाणी वाढवीत जावें तों तों कैफ चढत जातो, एक प्रकारच्या मादक आनंदाचे भपकारे येऊं लागतात, पण अंतीं बेहोष होऊन त्या आनंदाचें भेसूर दुःखांत रूपांतर होण्यास अवसर लागत नाहीं.

## सुखाची विकृत कल्पना

मनुष्यस्वभावाची मोठी गमत आहे. सुखाकरितां आणि आनंदाकरितां सुखविषय हस्तगत करण्याची त्याची सर्व धडपड ना? पण या धडपडींत स्वामित्वभावनेलाच एवढा विलक्षण जोर चढतो कीं, जो वस्तु हस्तगत करण्या-करितां जिवाचें रान केलें ती वस्तु हस्तगत केल्यावर तिचा आस्वाद घेण्याची त्याला विस्मृति पडते, आणि मग वस्तूच्या आस्वादाच्या ऐवजीं स्वामित्व वृत्तीच्या आनंदांतच माणूस गर्क होऊन जातो. सुखाच्या तिजोरीची एक किल्ली म्हणजे संपत्ति. पण या संपत्तीच्या मागें लोभी माणूस एकदां लागला म्हणजे शेवटीं संपत्ति हें सुखाचें साधन आहे हें विसरून जाऊन संपत्तीचा संचय करणें हेंच अंतिम सुख होय अशा मिथ्या ग्रहाच्या भोंवऱ्यांत तो

सापडतो. प्रसन्न होईपर्यंत ज्या संपत्तीची तो हाडाचीं काडें करून अव्यभिचारी निष्ठेनें उपासना करीत असतो, तीच एकदां प्रसन्न झाली कीं, तिच्या प्रसन्न वातावरणांतील आनंदाचा आस्वाद घेण्याचा विसर पडून त्यानें तिला कडी-कुलुपांत कोंडून टाकावें हा देखावा विचित्र नाहीं का ?

याच्या मुळाशीं आनंदाची, सुखाची विकृत व विपर्यस्त भावना दडलेली असते. सुखविषय हा दुसऱ्याचा हिरावून बळकावून सर्वस्वीं आपल्या मालकीचा केल्याशिवाय सुखाची खरी माधुरी चाखतां येत नाहीं, ही ती भावना होय. ही भावना होतां होतां इतकी प्रभावी होते की, तिच्या आहारीं गेलेल्याचें लक्ष सुखविषयावरून उडून हिरावून घेण्याच्या मालकी हक्काच्या भावनेंतच सर्वस्वीं गुरफटून जातें.

लहान मुलाला खाऊचा तुकडा दिला तर तो नुसता खाणार नाहीं, तर शेजारच्या मुलाला वाकुल्या दाखवीत, टुक् टुक् करीत खाईल. आपल्या हातांत दहा खेळणीं असलीं तरी दुसऱ्याच्या हातांतलें नवें खेळणें हिसकावून घेतल्याशिवाय कांहीं मुलांना चैनच पडत नाहीं, आणि मग तीं सर्व खेळणीं मांडीखालीं घालून गाल फुगवून दुसऱ्याकडे तोऱ्यानें, वर्चस्वभावनेनें पाहण्यांत काय तो खरा आनंद !

मानवी समाज या बाल्यावस्थेच्या पलीकडे अद्यापहि फारसा गेलेला नाहीं. मानवानें शास्त्र, विद्या, कला यांचा भव्य प्रासाद उठविला आहे, सृष्टीवर विलोभनीय असें स्वामित्व संपादन केलें आहे, पण खुद्द स्वामित्वभावनेवर मात्र त्याला विजय मिळवितां आलेला नाहीं. बाह्य भौतिक सृष्टीची एकनिष्ठपणें सेवा करून तिचें हृदय यानें काबीज केलें आहे; पण स्वतःच्या अंतःकरणांतील स्वामित्वभावना ही मात्र त्यालाच अद्याप हाताच्या बोटांवर हवी तशी खेळवीत आहे.

मानसशास्त्र सांगतें कीं, एखाद्या व्यक्तीचें शारीरिक वयोमान, बौद्धिक वयोमान व भावनात्मक वयोमान हीं पुष्कळ वेळां अगदीं भिन्न भिन्न असूं शकतात. शरीर आणि मन यांची वाढ असमांतर झाली तर शारीरिक वयोमान व बौद्धिक वयोमान यांच्यांत छत्तिसाचा आंकडा उमटूं शकतो. डोक्याचे केस पिकलेले, पण आंतील बुद्धि मात्र बालकाला शोभेशी, किंबहुना बालिश,

अशी म्हातारीं माणसें तुम्ही पाहिलीं नाहींत ? किंवा वयानें पोरसवदा पण मनानें जरठ असे तरुण तुम्हांला आढळले नाहींत ? दाढी पिकली असूनहि फिदी फिदी हसून माकडचेष्टा करणारे व मिशी फुटली नसूनहि मरतमढ्याचा सुतकी चेहरा धारण करणारे हे दोन्ही प्रकार विचित्र नव्हेत का ? पण शरिराची व मनाची विसंगत वाढ झालेलीं माणसें जगांत अगदींच थोडीं सापडत नाहींत.

मनाच्या निरनिराळया शक्तींचीहि अशीच बेताल, बेढब वाढ झाल्ली आढळून येते. बुद्धीनें व कल्पनेनें अबलख घोडयाप्रमाणें तल्लख असलेलीं माणसें भावनेच्या किंवा इच्छाशक्तीच्या बाबतींत मद्द बैलोबाप्रमाणें सुस्त असलेलीं कित्येक वेळां आढळून येतात. कल्पनेच्या प्रांतांत जे गडकरी अत्यंत धाडसी म्हणून गाजले, तेच गडकरी व्यावहारिक जगांत आपल्या एका नाटकावर राजकीयत्वाचा आरोप येण्याचा संभव आहे येवढ्या एका नुसत्या संशयानें तें नाटक जाळण्यास प्रवृत्त झाले, किंवा जो शोपेनहार जग हें दुःखपूर्ण असल्यानें आत्महत्या करणें हेंच श्रेयस्कर असें आपल्या ग्रंथांतून बेहोषपणें प्रतिपादन करी, तोच शोपेनहार देशावर परचक्र आल्यावर स्वतःचा जीव बचावण्याकरितां एका खेडयांत जाऊन लपून बसला, या गोष्टी कोणास सांगितल्या तर खऱ्या तरी वाटतील ? पण अशी बेडौल वाढ झालेली जगांत आढळून येते खरी.

## संस्कृतीची बेडौल वाढ

आजच्या मानवी समाजाची वाढ ही अशीच बेडौल, बेताल व विसंगत झालेली आहे. शास्त्र, कला, वाङ्मय यांची निस्सीम उपासना करून समाजानें बुद्धीची आश्चर्यकारक वाढ केलेली आहे, पण स्वतःच्या भावनांना सुसंस्कृत करण्याच्या बाबतींत मात्र त्यांची बाल्यावस्था अद्याप संपलेली नाहीं. बुद्धीची झेप येवढी प्रचंड कीं, अनंत, अथांग भासणाऱ्या विश्वगोलाचें मोजमाप काढण्याची ती उमेद धरते ! पण भावनेची क्षुद्रता एवढी, कीं अनंत विश्वांतील रजःकणासमान भूमीवर जेथें तो उभा आहे तेथील सुईच्या अग्रावरील मातीला दुसऱ्यास हात लावूं देण्यास ती राजी नसते ! बुद्धि राष्ट्रसंघाच्या संघारामांत बसून निःशस्त्रीकरणाची सुरस चित्रें रंगवितें; पण भावनेची मंथरा तिच्या कानांत तत्काळ कुजबुजते कीं, हीं तुझीं मनोमय चित्रें कारखान्याच्या बाहेर दर्शनी मांड आणि आंत मात्र दारूगोळयाचा प्रचंड मांड तयार ठेव !

आनंद आणि सुख यांची कल्पना स्वामित्व-भावनेच्या छायेखालीं इतक्या शतकानुशतकें वाढत आलेली आहे कीं स्वामित्व-भावनेच्या बाहेर निर्लोभ, निःस्वार्थी सुखाचें जग असूं शकेल याच्या कल्पनेचें वारेंहि तिला क्वचितच लागतें.

पण या बाहेरच्या जगाच्या हवेची शुद्ध शीतल झुळूक केव्हां ना केव्हां तरी अनुभवाला येतेच येते.

आनंदाचे– सात्त्विक, निर्मळ, निरतिशय आनंदाचे– कांहीं विषय असेच आहेत कीं, ज्यांच्यापर्यंत स्वामित्वभावनेचे पाश पोंहोचूं शकतच नाहींत. तेथें स्वामित्वाच्या भावनेला गवसणी घालून निर्लोभ अंतःकरणानेंच त्याचा सौंदर्यास्वाद घ्यावा लागतो. पण त्या आस्वादाची माधुरीहि तशीच 'सुधातः स्वादीया' व अवीट असते. आकाशाचा अफाट गोल हा असाच निर्भरानंदाचा एक अखंड ठेवा नाहीं काय ? नभोमंडलांतील तीं रेशमी इंद्रधनुष्यें, तो विद्युल्लतेचा जरतारी नाच, ती उदयास्तकालीन अवर्णनीय रंगसंपत्ति आणि तो सर्वत्र भरून राहिलेला कोमल, स्निग्ध नीलिमा हीं अनंत आनंदाचीं अमर्याद खुलीं भांडारें होत. कोणत्याहि सत्ताधीशाला त्यांच्यावर आपल्या स्वामित्वाच्या मालकीची मोहोर ठोकतां येणार नाहीं.

पण स्वामित्व नाहीं म्हणून या विश्वसौंदर्यापासून मिळणारा आनंद उत्कटत्वांत रतिभर तरी कमी असतो ? छे ! उलट जास्तच. स्वत्वाचा अर्धवट विसर पडल्याशिवाय आनंदाला उत्कटताच येत नाहीं. आनंदाच्या उत्कटक्षणीं आस्वेता हा आस्वादविषयाशीं तद्रूप झालेला असतो. फुलपांखरांप्रमाणेंच पुष्पांत गुंतून राहिलेला असतो. अशा तल्लीनावस्थेंत स्वत्वाचीच भावना विरळ होऊं लागते. मग स्वामित्वाच्या भावनेस कोठला थारा ? सूर्याचें स्फूर्तिप्रद उर्जस्वल तेज, गिरिनिर्झरांचें मंजुळ संगीत, सागराचा गंभीर घोष, पवनाचा शीतल जीवनदायी स्पर्श, हे आनंदाचे अखंड झरे होत. कोणत्या सम्राटाच्या कोणत्या जामदारखान्यांत तुम्ही त्यांना कोंडणार ? रात्रीच्या प्रशान्त समयीं अन्तरालाच्या प्रांगणांत तारकारत्नांचा नुसता सडा पडलेला असतो. कोणीहि डोळे भरून त्यांचा तेजस्वी चमचमाट पहावा आणि धन्य व्हावें. पण त्यांतील एक तरी हिरकणी उचलून तुमच्या लोखंडी पेटींतील अंधारांत दडवून ठेवतां येईल काय ? अधूनमधून आकाशांतील एखादी हिरकणी

निखळून भूमीवर येते, पण तेथें स्वैरसंचार करणाऱ्या स्वामित्वबुद्धीच्या लोभी हातांत आपण पडूं या भीतीनेंच जणूं पृथ्वीवर येतांच पाषाणवत् होऊन काळी-ठिक्कर पडते! पण निःस्वार्थ, निर्लोभ, वृत्तीनें तारकांचें सौंदर्यनिरीक्षण करीत बसलांत तर प्रहरान् प्रहर केव्हां गेले याचें भानहि राहणार नाहीं.

आणि या आनंदाचा आणखी एक विलोभनीय विशेष हा कीं, या आनंदाचें सेवन असंख्य लोकांनीं एकसमयावच्छेदेंकरून करावें. त्याला संख्येची मर्यादा नाहीं, स्थलाची नाहीं वा कालाची नाहीं.

सृष्टीमध्यें अवीट आनंदाचें हे विषय जसे आयतेच सिद्ध आहेत, तसे नवीन निर्माण करण्याची अलौकिक शक्तीहि मानवांस लाभलेली आहे. ती म्हणजे काव्यादि ललितकलांना जन्म देणारी प्रतिभा. तिच्या साहाय्यानें केवळ आनंदैकघन असें स्वतंत्र विश्वच प्रतिभावानांनीं निर्माण केलें आहे. यांत कोणासहि मज्जाव नाहीं. काव्यसृष्टींत कोणीहि मनसोक्त विहार करावा. व्यास-वाल्मीकीची छंदोबद्धवाणी एकदां अवतीर्ण झाली, कीं पिढ्यान्-पिढ्यांनीं तींतील रसास्वाद लुटीत राहावा. स्वामित्वबुद्धीनें एकट्याचा म्हणून उपभोगिला जाणाऱ्या आनंदाला खजील करणारा आनंद असेल तर तो हा काव्यादि ललितकलांचा. स्वामित्वाच्या संकुचित भावनेचा स्पर्श तर याला सहन होत नाहींच; पण याचें सेवन करणारे सहकारी जितके अधिक तितका तो अधिकच खुशींत येतो. नाटकाच्या प्रयोगाला किंवा गाण्याच्या मैफलीला तुम्ही कधीं एकलकोंडे जाल? तसे जाल तर त्यांतील आनंद हिरमुसला होईल, फुरंगटेल, फुलणार नाहीं. उलट समानवृत्ति, सहृदय असे जितके रसिक तुम्ही एकत्र जमाल तितका आनंद अधिकाधिक लज्जतदार होत जाईल.

ही निःस्वार्थी आनंद सेवन करण्याची आवड जितकी वाढेल तितकी समाजांत सुखशान्ति नांदूं लागेल.

मात्र या निःस्वार्थ आनंदाच्या केवळ उपदेशानें आजच्या समाजाच्या हाडीं-मासीं खिळलेली स्वामित्वबुद्धि निखळून पडेल अशा भोळसट भावनेला थारा देण्यांत अर्थ नाहीं. आजच्या स्वामित्वबुद्धीनें अन्नाच्छादनासारख्या जीवनास अत्यावश्यक अशा वस्तूहि आपल्या कुजट कोठारांत गाडून टाकल्या आहेत. त्या तेथून बाहेर काढून कंगाल कुणब्याच्या कणगींत आणून सोडा-वयाच्या, तर असल्या वस्तु निर्माण करणारे कारखाने हे राष्ट्राच्या मालकीचेच

करावे लागतील. आणि आजची स्वामित्वबुद्धि या समाजसत्तावादी प्रयोगाला सुखासुखी तयार न झाली तर– आणि तशी ती क्वचितच होईल– संघटनेला तिच्यापुढें उभी करून संघटनेकडून तिला दटावून आपल्या हातांतील सत्ता सोडण्यास भाग पाडावें लागेल.

पण समाजसत्तेच्या प्रयोगानें आर्थिक स्वामित्वाचा प्रश्न सुटल्यावरहि, आणि तो आधीं सुटलाच पाहिजे, स्वामित्वबुद्धि सर्वस्वीं लोपेल असें नाहीं. समाईक मालकीच्या तत्त्वावर समाजाची पुनर्घटना केल्यावरहि सुंदर स्त्रिया या समाइक मालकीच्या व्हाव्या ही प्लेटोची सूचना आजचा कोणताहि समाजवादी मान्य करणार नाहीं. स्त्री ही मालमत्ता होय अशी समजूत प्लेटोच्या कालीं रूढ होती म्हणूनच ही मालमत्ता समाइक करावी अशी धाडसी सूचना प्लेटो मांडूं शकला. पण स्त्री ही समाजाची स्वतंत्र घटक आहे हें मान्य केल्यावर तिच्यावर समाइक का होईना पण मालकी असावी ही कल्पनाच फोल ठरते. समाजसत्ताक समाजामध्येंहि सौंदर्यशालिनी स्त्रिया किंवा देखणे पुरुष यांचें साहचर्य थोड्यांनाच लाभेल. तीच गोष्ट कीर्तीची व सत्तेची अथवा अधिकाररूढत्वाची. समाजाची सर्व सत्ता व मत्ता ही तात्त्विकदृष्ट्या समाईक मालकीची झाल्यावरहि समाजाचे व्यवहार चालण्याकरितां दहांनीं काम करावें व एकानें त्यांना कामें समजावून द्यावींत व देखरेख करावी असले प्रकार राहणारच; व जो देखरेख करणार त्याचा दर्जा व वेतन हीं तात्त्विकदृष्ट्या समान लेखलीं गेलीं तरी त्याला थोडा अधिक मान मिळणें हें अपरिहार्यच होईल. शिवाय देखरेख करणाऱ्याच्या जागा संख्येनें कमी असल्यानें त्या थोड्यांनाच मिळूं शकतील. योग्यता असतांहि पुष्कळांना त्या वस्तुगत्याच मिळूं शकणार नाहींत. अशा सर्व ठिकाणीं विलोभनीय वाटणाऱ्या या वस्तूकडे खेळकर वृत्तीनें निःस्वार्थानंदसेवनाच्या दृष्टीनें पाहण्यास शिकलें तरच समाजांत सुखशान्ति नांदेल.

---

— १२ —

# शिक्षणांतील राष्ट्रीय दृष्टि

हिमालयाच्या पायथ्याशीं डेहराडून येथें एक लष्करी शाळा सरकारनें काढली आहे, हें सुशिक्षितांना माहीत आहेच. त्या शाळेंतील एका विद्यार्थ्याच्या वडिलांनीं शाळेंतील जीवनक्रमाविषयीं जें लिहिलें आहे, त्याच्याकडे जनतेचें लक्ष मुद्दाम ओढण्याइतकें तें महत्त्वाचें आहे. मूळ हा लेख 'रॉय' साप्ताहिकांत आला असून ऑक्टोबर १९३६ च्या 'मॉडर्न रिव्ह्यू'मध्यें त्याचा उतारा घेतला आहे. 'रिव्ह्यू'नें त्यावर कांहींच शेरा मारलेला नाहीं. फक्त उतारा मात्र दिला आहे. अर्थात् मुख्य लेखांतील विधानें किती प्रमाणांत खरीं आहेत याविषयीं मला कांहींच सांगतां येणार नाहीं; पण खरीं असलीं तर तीं विचारक्षोभक मात्र खास आहेत.

मुलाचा बाप लिहितो, "केवळ व्यवस्थेच्या दृष्टीनें पाहिलें तर शाळेची व्यवस्था तशी चोख आहे. पण शाळा-चालकांची दृष्टि पाहिली म्हणजे मात्र ती आमूलाग्र सदोष असावी असें वाटूं लागतें. कारण शाळेंतील वातावरण हें एकजात परकी, परधार्जिणें, आंग्लमय करून सोडलेलें आहे. मुलांना अशी ताकीद देण्यांत आली आहे कीं, मुलांनीं नेहमीं इंग्रजींतच बोललें पाहिजे. नुसतें वर्गांतच नव्हे तर एरवीं देखील आपआपसांत जरी ते हिंदुस्थानींत बोलूं लागले, तरी त्यांच्या इंग्रज गुरूंना वाटतें कीं, कांहीं कट तर करीत नाहींत ना? मुलांना अन्न देण्यांत येतें तेंहि इंग्रजांचें अन्न. आठवड्यांतून फक्त एक दिवस त्यांना हिंदी अन्न देण्यांत येतें, आणि मग तें अन्न मुलें अधाशीपणानें अतिरेक होईइतकें खातात. मुलांनीं वर्तमानपत्र वाचावयाचें तर तें कोणतेंहि हिंदी वर्तमानपत्र असतां कामा नये. हिंदी वर्तमानपत्र वाचणें म्हणजे शाळेशीं द्रोह करणें होय असें मानण्यांत येतें. एखादा मुलगा चुकून हिंदी वर्तमानपत्र वाचतांना आढळला तर लवकरच त्यानें समजून चुकावें, कीं आतां कांहीं तरी क्षुल्लक सबबीवर आपली शाळेंतून हकालपट्टी खास होणार. मुलांना गावेंसें वाटलें तर? छे! त्यांनीं हिंदी पदें

म्हणतां कामा नये. थोडक्यांत म्हणजे जेणेंकरून मुलें अंतर्बाह्य आंग्ल बनतील तशा प्रकारचें शिक्षण देणें ही चालकांची पद्धति आहे. या असल्या कडक शिस्तीनें खुद्द मुलांना मोठें सुख होतें असें नव्हे. माझा मुलगा तर मला सांगतो कीं, या शिस्तीनें आमचें स्वत्वच चिरडलें जात असल्यानें आम्हां मुलांमध्यें असंतोष पसरूं लागला आहे."

शिक्षणांतील राष्ट्रीय आणि अराष्ट्रीय वृत्तीची चर्चा सुरू झाली कीं, कांहीं लोक कपाळाला आठ्या घालून विचारतात, " शिक्षणांत कसलें आणतां बोवा तुमचें राष्ट्रीयत्व आणि राजकारण ! शिक्षण तेवढें सगळीकडे सारखेंच; त्यांत राष्ट्रीय शिक्षण आणि अराष्ट्रीय शिक्षण असला बारकावा तो काढावयाचा. गणित शिकवितांना दोन आणि दोन मिळून चार होतात असें इंग्लंडांत शिकविलें म्हणून ते वेडेचार झाले असे मानून हिंदुस्थानांत दोन आणि दोन मिळून पांच होतात असें तर नाहीं शिकवावयाचें ? किंवा चुना आणि हळद मिसळली असतां तांबडा रंग होतो असें अमेरिकेंत शिकवलें म्हणून हिंदुस्थानांत तो निळा होतो असें नाहीं ना शिकवावयाचें ?" असले प्रश्न ज्यांच्या मनांत उद्भवत असतील त्यांनीं वरील डेहराडुनच्या हकीकतीचें मनन करावें. शिक्षणांत राष्ट्रीय दृष्टि म्हणून कांहीं असूं शकते व ती नांदूं देणें आपल्या हिताच्या कसें विरोधी असतें याची परकी सरकारला योग्य जाणीव असते; आणि म्हणूनच त्याला तोड म्हणून टिळकप्रभृति लोकनायकांनीं राष्ट्रीय संस्था उभारल्या, आणि कॉंग्रेसनें अधिकारारूढ होतांच सुरुवातीसच वर्धा शिक्षण-योजनेच्या रूपानें राष्ट्रीय शिक्षणाचा प्रश्न हातीं घेतला.

## नित्य ध्येय व नैमित्तिक ध्येय

' राष्ट्रीय शिक्षण ' या शब्दांतील राष्ट्रीय हा शब्द काढून टाकला व नुसता शिक्षण शब्द घेतला तर या शिक्षणाची ध्येय व पद्धति हीं सर्व राष्ट्रांत एकच असणार. शिक्षणाचें ध्येय बुद्धीचा विकास करणें, हरएक विषयांच्या ज्ञानानें माणसास बहुश्रुत व चतुरस्र करणें व व्यक्तिमात्रांतील कार्यक्षमता वाढविणें हें होय. हें ध्येय नित्य असल्यानें सर्व देशांतील शिक्षणाला सारखेंच लागू आहे; पण या नित्य ध्येयाबरोबर शिक्षणाचें नैमित्तिक असें दुसरें ध्येय असतें आणि हें दुसरें ध्येय मात्र स्थलकालपरत्वें बदलत असतें. कार्यक्षमतेचें वर्धन हें जें वर

नित्य ध्येय सांगितलें त्यांतील 'कार्य' जसजसें बदलेल तसतसें हें दुसरें नैमित्तिक ध्येय बदलत असतें. प्रत्येक राष्ट्रापुढें विशिष्ट काळीं जे महत्त्वाचे प्रश्न उभे असतात किंवा ज्या विशिष्ट गोष्टी साधायच्या असतात त्या गोष्टी जेणेंकरून साधतील असा शिक्षणक्रम आंखणें हें शिक्षणाचें नैमित्तिक ध्येय होय. साक्षरते-चा प्रसार करणें, बुद्धीला व्यायाम देणें, ज्ञानाची आवड उत्पन्न करणें, सद्भावना बळावणें ह्या गोष्टी सर्व देशांत सारख्याच; आणि ह्या गोष्टी ज्या पद्धतीनें उत्कृष्ट रीतीनें साध्य होतील ती पद्धति कोणत्याहि देशांतली असली तरी ती इतर देशांनीं उचलण्यास मुळींच हरकत नसते. पण विकसित झालेल्या बुद्धीचा किंवा उत्पन्न झालेल्या कार्यकर्तृत्वाचा उपयोग ज्या विषयांत कराव-याचा ते विषय मात्र स्थलकालपरत्वें बदलत असतात. या विषयांतहि ज्ञान-संवर्धन हा विषय सर्व स्थलीं व कालीं सारखाच असतो. पण तो समाजांतील मूठभर लोकांचा विषय होय. सर्वसामान्य माणसानें शिक्षण घेतल्यावर त्या शिक्षणाचा उपयोग कोणत्या कामीं करावयाचा हें प्रस्तुत पाहणें आहे. अर्थात् हा उपयोग असा असला पाहिजे, कीं व्यक्तिमात्राची जीवनयात्रा सुखकर होऊन त्याबरोबरच राष्ट्राच्या गरजाहि भागविल्या जाव्यात.

मनुष्याला भावी अनंत कालांत दृष्टि पोंचवितां येत नसली तरी पुढील पांच-पंचवीस वर्षांत राष्ट्रापुढें कोणकोणते प्रश्न उभे राहणार आहेत, राष्ट्रीय जीवनसंग्रामांत कोणकोणत्या ठोकरा खाव्या व टकरा द्याव्या लागणार आहेत त्यांची स्पष्ट नसली तरी अस्पष्ट कल्पना राष्ट्रधुरीणांना खास असते व या कल्पनेप्रमाणें पुढील ध्येय गाठण्यासाठीं व आपत्ति टाळण्यासाठीं लागणारें जरूर तें सामर्थ्य जेणेंकरून अंगीं येईल अशा प्रकारच्या विषयांचा शिक्षणक्रमांत समावेश करावयाचा असतो. राष्ट्रीय शिक्षण म्हणून ज्यास संबोधावयाचें तें या बाबतींतील शिक्षण होय. ज्या शिक्षणानें व्यक्तिमात्रावर असलेल्या राष्ट्रऋणाची जाणीव उत्पन्न होईल व हें ऋण फेडण्याची दिशाहि दिसूं लागेल तें राष्ट्रीय शिक्षण. हें ऋण फेडणें म्हणजे राष्ट्राच्या जीवनक्रमांतील अडचणी दूर करणें व गरजा भागविणें.

त्या गरजा भिन्न राष्ट्रांत भिन्न काळीं भिन्न असतात. म्हणून साक्षरतेचा पाया घालणारें प्राथमिक शिक्षण सर्व देशांत समान असलें तरी पुढील दुय्यम शिक्षणांतील विषय भिन्न असतात. आणि ह्या भेदांतच 'राष्ट्रीयत्व' प्रति-

बिंबित झालेलें असतें. मागच्या महायुद्धाचे पूर्वी अखिल जग पादाक्रान्त करण्याचें ध्येय जर्मनीनें डोळ्यांपुढें ठेवलें असल्यानें जर्मन विश्वविद्यालयीन शिक्षणांत लष्करी नोकरी हा विषय आवश्यक मनाला जात असे. इतर राष्ट्रांना नवीन देश घशाखालीं घालण्याची तात्कालिक गरज भासत नसल्यानें म्हणा, किंवा जरूर त्या वेळीं पुरेसें सैन्य रणभूमीवर उभें करतां येईल अशी खात्री असल्यानें म्हणा, सक्तीच्या लष्करी नोकरीचा शिक्षणक्रमांत समावेश करणें जरूर भासलें नाहीं. इंग्रजांना साम्राज्याचा कारभार हाकावयाचा असल्यानें साम्राज्यविषयक कल्पना व साम्राज्यांतील निरनिराळ्या घटकांची माहिती ह्यावर इंग्रजी पुस्तकांत विशेष भर असतो, तर अमेरिकन हे लोकसत्ताक पद्धतीचे चाहते असल्यानें 'नागरिकांचीं कर्तव्यें' वगैरे विषयांचें ज्ञान तेथील सर्व शाळांतून देण्यांत येतें. तेव्हां पुढील पांच-पंचवीस वर्षांत उदयोन्मुख पिढीला कोणते प्रश्न सोडवावयाचे आहेत हें लक्षांत घेऊन ते सोडवावयास लागणारें कर्तृत्व जेणेंकरून अंगीं बाणेल अशा प्रकारचे विषय शिक्षणक्रमांत गोवणें म्हणजे राष्ट्रीय शिक्षण देणें होय.

## त्रिविध पारतंत्र्य

सध्यां आपल्या राष्ट्रापुढील अत्यंत जिव्हाळ्याचा प्रश्न पारतंत्र्यनाश हा होय. हें पारतंत्र्य राजकीय, औद्योगिक, बौद्धिक असें त्रिविध आहे. पैकीं राजकीय पारतंत्र्य कसें झुगारून द्यावयाचें याचें साक्षात् शिक्षण शाळा कॉलेजांतून देणें अशक्य आहे हें सांगावयास नकोच. पण ही गोष्ट असाध्य असली तरी राष्ट्रापुढील विविध प्रश्नांची योग्य जाणीव उत्पन्न होणें व ते आपल्या मगदुराप्रमाणें सोडविण्याविषयीं उत्साह वाटूं लागणें, म्हणजेच बौद्धिक पारतंत्र्यनाशाचें शिक्षण देणें हें अशक्य नाहीं. या दृष्टीनें प्रयत्न करावयाचा म्हणजे 'हिंदु लोक स्वराज्यास नालायक आहेत, स्वातंत्र्याची त्यांस कल्पना नाहीं, पाश्चात्यांशीं तुलना केली असतां ते सर्वच गोष्टींत हीन आहेत; कला, शास्त्र, वाङ्मय, समाजशासन, संघटना वगैरे बाबतींत ते मागसलेले आहेत, त्यांना इतिहास नाहीं, उज्ज्वल परंपरा नाहीं, अर्थात् अशा लोकांना स्वराज्य मिळावयाचें असल्यास, फार अवधि लागेल' वगैरे जी विचारसरणी परकीयांनीं लिहिलेल्या पुस्तकांच्या

द्वारें विद्यार्थ्यांच्या मनावर बिंबविण्याचा प्रयत्न चालू असतो. तिची लाट थोपविणें व परतविणें होय. ही गोष्ट, राजकारण व अर्थशास्त्र हे विषय आवश्यक करणें आणि राष्ट्राभिमान उत्पन्न होईल अशा रीतीनें इतिहासाचीं पुस्तकें लिहिणें, अशा तऱ्हेच्या वाङ्मयांतील धडे क्रमिक पुस्तकांत समाविष्ट करणें, राष्ट्रीय महापुरुषांचे उत्सव करणें इत्यादि उपायांनीं साध्य करावयाची असते. सारांश, स्वाभिमान, उत्साह व उमेद प्रज्वलित करून मानसिक दौर्बल्य व पारतंत्र्य झाडून टाकणें हें राष्ट्रीय शिक्षणाचें पहिलें अंग होय.

बौद्धिक पारतंत्र्याच्यानंतर औद्योगिक पारतंत्र्याचा विचार करावयास पाहिजे. या पारतंत्र्याचें जोखड झुगारून देणें फारच अवघड आहे. राज्यकर्त्यांना त्यांचा व्यापार म्हणजे दुसरा प्राण वाटतो. एक वेळ हिंदुस्थानचें राज्य गेलें तरी हरकत नाहीं, पण हिंदुस्थानचा व्यापार आमच्या हातून निसटेल तर डोळे पांढरे करण्याची वेळ येईल असें त्यांच्यापैकीं कांहींजण स्पष्ट बोलूनहि दाखवितात. अशा स्थितींत स्वदेशी व्यापार-धंदे ऊर्जितावस्थेला आणणें किती बिकट आहे हें सांगावयास नकोच; पण उद्योग-धंद्यांची वाढ झाल्याविना राष्ट्राचा तरणोपायच नसल्यानें औद्योगिक शिक्षण हें राष्ट्रीय शिक्षणाचें अवश्य अंग समजलें जातें. त्याच्या शक्यतेचा विचार पुढें करूं.

सध्यांचा काळ संग्रामाचा अथवा झगड्याचा आहे आणि कोणताहि झगडा खेळावयास लागणाऱ्या उत्साहाचे आद्य साधन म्हणजे शरीरसंपत्ति होय. अर्थात् राष्ट्रापुढील तिसरा महत्त्वाचा प्रश्न म्हणजे शारीरिक संपत्तीची वाढ हा होय. राष्ट्रांतील तरुण पिढींत शारीरिक संपतीचा ऱ्हास होत चालला आहे ही गोष्ट इतकी ढळढळीत आहे कीं, याचें प्रत्यंतर बहुतेक प्रत्येक कुटुंबांत पाहावयास सापडतें. ज्या कुटुंबांत आजा, पणजा, नातवंडें व पणतवंडें अशा चार पिढ्या हयात असतील त्या ठिकाणीं प्रत्येक दुसरी पिढी पहिलीपेक्षां दुर्बल आढळून येईल. हा ऱ्हास थांबविण्याचा उपाय अमलांत न आणल्यास राष्ट्र दिवसेंदिवस खंगत जाईल हें स्पष्ट आहे. अर्थात् राष्ट्रीय शिक्षणांत शारीरिक शिक्षणाचा अंतर्भाव करणें किती अगत्याचें आहे हें सांगावयास नकोच. एवंच, सद्यःकालीन राष्ट्रीय शिक्षणांत स्वाभिमानशिक्षण, औद्योगिक शिक्षण व शारीरिक शिक्षण या त्रयीस अग्रस्थान पाहिजे.

## शिक्षण-संस्थांचें निरीक्षण

राष्ट्रीय शिक्षणाची स्वाभिमानशिक्षण, औद्योगिक शिक्षण व शारीरिक शिक्षण ही त्रयी डोळ्यांपुढें ठेवून विद्यमान शिक्षण-संस्थांच्या निरीक्षणांत काय निष्पन्न होतें तें थोडें पाहूं. या त्रयींपैकीं शारीरिक शिक्षण ही बाब वस्तुतः इतकी सोवळी व सर्वमान्य आहे कीं, सर्व संस्थांतून प्रामुख्यानें ती दिसून यावयास पाहिजे. राष्ट्रांतील एकंदर उद्योन्मुख पिढीस शारीरिक शिक्षण मिळणें जरूर असेल तर तद्विषयक चळवळ सर्व शिक्षणसंस्थांतून करणें अवश्य आहे, याकडे दुर्लक्ष करून चालवयाचें नाहीं. बौद्धिक शिक्षणाचे बाबतींत असें तरी म्हणतां येईल कीं, शाळां-कॉलेजांतील शिक्षणानें उत्पन्न झालेले पूर्वग्रह प्रौढ वयांत अधिक वाचनानें झाडून टाकतां येतील. शारीरिक संपत्तीची गोष्ट अशी नाहीं. योग्य काळीं शारीरिक शिक्षणाची काळजी घेण्यांत आली नाहीं तर त्याचे परिणाम जन्मभर भोगावे लागतात. अर्थात् शारीरिक शिक्षण हें राष्ट्रीय शिक्षणाचें एक अंग समजावयाचें असल्यास, आणि शरीरसंपत्ति हें सर्व पुरुषार्थाचें मूळ असल्यानें तें तसें समजलें गेलें पाहिजे, ह्या विशिष्ट आणि अपरिहार्य अंगाची वाढ होण्याच्या दृष्टीनें सर्व संस्थांनीं झटलें पाहिजे. पण ह्या संस्थांकडे दृष्टि फेकल्यास ह्या अवश्य बाबीची सर्वतोपरी हेळसांड दिसून येईल.

या संस्थांतील शारीरिक शिक्षणविषयक कर्तव्याची परिसमाप्ति म्हणजे जिमखाना-फी वसूल करणें ही होय. या फीच्या उत्पन्नांतून विस्तीर्ण क्रीडांगण तयार केलेलें असतें हें खरें; पण या क्रीडांगणावर किती विद्यार्थी नेमानें खेळतात याची नोंद असेल तर त्याचा खरा उपयोग. अलीकडे बॉयस्काउट, राष्ट्रीय स्वयंसेवक दल, क्रीडांगणावरील खेळ वगैरेनीं शारीरिक शिक्षणाची थोडीबहुत सोय कांहीं शाळांतून झाली आहे, व कॉलेजांतून पी. टी. चा प्रवेश झाला आहे; पण सर्व प्रकार अद्याप जुजबी आहे.

या अनास्थेचा दोष शाळाचालकांपेक्षां या बाबतींत औदासीन्य स्वीकारणाऱ्या जनतेच्या माथीं मारणें यो य होय.

पालकांची इच्छा असल्यास कोणत्या ना कोणत्या प्रकारचा व्यायाम प्रत्येक विद्यार्थ्यानें घेतलाच पाहिजे, अशी सक्ती शिक्षणसंस्थांवर त्यांना खास करतां येईल. शारीरिक शिक्षण ही अशी बाब आहे कीं, जनतेनें नेट धरल्यास सर्व शाळां-

कॉलेजांत ती सुरू करणें अशक्य नाहीं. या बाबतींत सरकार आड येऊं शकणार नाहीं. पण सरकारच्या भीतीपेक्षां जनतेचें औदासीन्यच येथें नडत आहे शारीरिक स्वास्थ्याच्या दृष्टीनें नुसत्या शाळा भरविण्याच्या वेळेचा प्रश्नच पहा ना. सध्यांची म्हणजे भरल्यापोटीं शाळेंत जाण्याची व्यवस्था शरीरस्वास्थ्यास अपाय कारक आहे हें दिसत असूनहि साधी सुधारणा घडवून आणण्याच्या बाबतींतहि कधीं कोणीं लक्ष घातलें आहे? सरकारी कचेऱ्यांची वेळ अकराची असल्यानें शाळांचीहि तीच असल्यास बरेंच असें वाटणें हें औदासीन्याचेंच लक्षण नव्हे काय? शाळा-कॉलेजें अकरा वाजतां न भरवितां सकाळीं सात वाजतां भरविलीं तर काय सरकार ग्रँट बंद करील? पण समजूतच अशी झालेली कीं, सुधारणा-बिधारणा काय करावयाची असेल ती राष्ट्रीय शाळांत. सरकार-मान्य शाळा या परावलंबी संस्था व त्या मद्दड बैलाप्रमाणें रुळलेल्या चाकोरींतूनच चालावयाच्या.

## औद्योगिक शिक्षणाचा फोलपणा

औद्योगिक शिक्षण हें राष्ट्रीय शिक्षणाचें दुसरें एक महत्त्वाचें अंग मानण्यांत येतें.

ह्या औद्योगिक शिक्षणाची परिसमाप्ति पुष्कळ संस्थांमध्यें सुतारकींतच होत असतें; इतकें कीं धंदेशिक्षण आणि सुतारकी यांचें जवळ जवळ समीकरण बसल्यासारखेंच झालें. परदेशांतून येणारा हरएक प्रकारचा माल येथें तयार करण्यांत यावा हें धंदेशिक्षणाचें बीज. पण आमचें धंदेशिक्षण सुतारकी, किंवा सध्यां चरखा यांच्यापुढें कधींच गेलेलें नाहीं. आणि हें सुतारकीचें ज्ञान तरी किती, तर आठवड्यांतून एखाददुसरा तास शिकून येईल तेवढें. बौद्धिक शिक्षणाच्या जोडीला दिल्या जाणाऱ्या या औद्योगिक शिक्षणाचा हस्त-कौशल्याची आवड विद्यार्थ्यांमध्यें उत्पन्न करणें येवढाच काय उपयोग होईल तो. त्याला औद्योगिक शिक्षण म्हणणें म्हणजे त्या शब्दाची थट्टा होय.

औद्योगिक शिक्षणाचा फैलाव होत नाहीं याचें मुख्य कारण द्रव्याभाव होय असें क्वचित् सांगण्यांत येतें. गोष्ट कांहीं अगदींच खोटी नाहीं. औद्योगिक शिक्षणासारखीं खर्चाचीं कामें सरकारनेंच अंगावर घेणें योग्य. गरीब जनतेला

हा खर्चाचा बोजा झेपणार नाहीं. पण द्रव्याभाव हें कारण प्रमुख मानतां येत नाहीं. कारण नमुनेदार अशी एखादी संस्था चालविण्यायेवढेंहि द्रव्य मिळूं शकत नाहीं की काय ? गेल्या दहा वर्षांत मुंबई इलाख्यांत पांच-सहा नवी आर्ट्स कॉलेजें निर्माण झालीं व त्यांच्याप्रीत्यर्थ कित्येक लाख रुपये वर्गणीच्या रूपानें जमविण्यांत आले असावेत. हेच पैसे औद्योगिक शिक्षणाच्या संस्थेला मिळाले नसते असें नाहीं. खरी गोष्ट अशी आहे कीं, औद्योगिक शिक्षण द्याव-याचें म्हणजे काय करावयाचें याची नीटशी कल्पनाच अद्याप नाहीं. औद्योगिक अवनति पाहून खेद होतो व औद्योगिक शिक्षणाचा फैलाव करणें अवश्य वाटूं लागतें; पण हा फैलाव कसा करावयाचा ह्याचा पत्ता नाहीं. लजपतरायांनीं आपल्या राष्ट्रीय शिक्षणावरील पुस्तकांत औद्योगिक शिक्षणास एक स्वतंत्र प्रकरण खर्ची घातलें आहे; पण सबंध प्रकरणांत औद्योगिक शिक्षण जरूर आहे, येवढीच गोष्ट अनेक प्रकारांनीं वर्णिलेली आहे. मुख्य मुद्याची गोष्ट कीं, औद्योगिक शिक्षणाचा प्रसार कसा करावयाचा याविषयीं एकहि व्यावहारिक सूचना त्यांत नाहीं.

या बाबतींत पहिली गोष्ट लक्षांत घ्यावयास पाहिजे ती ही कीं, देशभर औद्योगिक शिक्षण-संस्थांचें जाळें पसरलें कीं, हिंदुस्थानचे उद्योगधंदे ऊर्जिता-वस्थेला येतील ही कल्पनाच भ्रामक आहे. उद्योगधंदे आधीं व शिक्षणसंस्था मागून असा क्रम न्याय्य व स्वाभाविक होय. उद्योगधंद्यांची योग्य वाढ आधीं झालेली असल्याशिवाय औद्योगिक शिक्षण-संस्था चालूच शकत नाहींत. याविषयीं लखनौ विद्यापीठाचा अनुभव विचार करण्यासारखा आहे. या विद्यापीठानें व्यापारी कॉलेज काढलें; पण त्यांना पुरेसे विद्यार्थी मिळेनात म्हणून शेवटीं त्याचें आर्ट्स कॉलेजांत रूपांतर करावें लागलें. धंदेशिक्षण घेतलें तरी हल्लींच्या यांत्रिक युगांत बहुतेकांना त्या त्या धंद्यांतील नोकरीच पत्करावी लागणार. अर्थात् ह्या नोकरीची आधीं तयारी नसेल तर धंदेशिक्षण मिळवूनहि पुनः बेकारच हिंडावें लागणार. जपान, अमेरिका व युरोपमधून उच्च धंदेशिक्षण संपादन करून आल्यावरहि नोकरी मिळेना किंवा धंदा सुरू करण्यास लागणारें भांडवल कोणी देईना म्हणून आकाशाकडे पाहत बसणाऱ्या उच्च पदवीधरांचीं उदाहरणें वाचकांस अवगत असतीलच. अर्थात् औद्योगिक शिक्षणाचा प्रसार करणें, खटपट करणें म्हणजे शेवटीं उद्योगधंद्याची वाढ

करणेंच होय. ही गोष्ट शिक्षण-संस्थांच्या क्षेत्राबाहेरील होय. उद्योगधंदे भरभराटले म्हणजे त्यांना पोषक अशा शिक्षण-संस्था अस्तित्वांत येत असतात.

आज जर्मनींत ज्या असंख्य औद्योगिक शाळा आहेत त्यांत प्रवेश मिळण्यास पहिली अटच ही आहे कीं, उमेदवारानें ज्या धंद्याचें काम शिकावयाचें असेल त्या धंद्याच्या कोणत्या तरी कारखान्यांत वर्षभर काम केलें असलें पाहिजे. वर्षभर काम केल्यानें त्या धंद्यांत कोणत्या विशिष्ट अडचणी येतात ह्याची विद्यार्थ्यांस कल्पना येते, आणि नंतर तो जो शाळा-कॉलेजाकडे वळतो तो आपल्या अडचणी कशा दूर करतां येतील याचें शास्त्रीय ज्ञान संपादण्याकरितां. अर्थात् उद्योगधंदे आधीं व शाळा मागून. तळेगांव येथील काचकारखान्यानें आपले लोक जपानास शिक्षण घेण्याकरितां प्रथम न पाठवितां जपानी तज्ज्ञ नोकरीस ठेवून आधीं कारखाना सुरू केला व नंतर कारखाना चालू असतां तेथील हिंदी नोकरच जपान्यांच्या हाताखालीं तयार झाले. कोणताहि धंदा सुरू होऊन त्यांतील अडचणींची जाणीव झाल्यावरच अधिक ज्ञानसंपादनाकरितां परदेशास जाणें हितकर ठरतें. जे धंदे आजमितीस चांगले चालू झाले आहेत, त्या धंद्यांतील शिक्षणाच्या शाळाहि निघाल्या आहेत. मात्र ह्या शाळांना व्यवस्थित स्वरूप नसल्यानें त्या चटदिशीं लक्षांत येत नाहींत. ह्या शाळांतील विद्यार्थी म्हणजे निरनिराळ्या गिरण्यांतून उमेदवार किंवा अप्रेंटिसेस असतात ते. ह्या उमेदवारांना सर्व दिवसभर काम करावयास न लावतां कांहीं तास काम व कांहीं तास बौद्धिक शिक्षण घेणें कायद्यानें अवश्य करतां आल्यास ह्या औद्योगिक शाळां म्हणून वापरतां येतील. अशा शाळांना सरकारकडून ग्रँटहि मिळवितां येईल. मध्यप्रांतांत शॉ, वालेस आणि कंपनीचे माइनिंग (खाणकाम)चे क्लासेस आहेत. त्यांना सरकारी मदत मिळत असते. कायद्यानें या अप्रेंटिस क्लासेसना व्यवस्थित स्वरूप देतां येईपर्यंत, कारखानदारांची सहानुभूति मिळवून शक्य तोंवर आजूबाजूच्या प्रदेशांतील विद्यार्थीच उमेदवार म्हणून कारखान्यांत घेतले जातील अशा प्रकारचा प्रयत्न करावा. राष्ट्रीय शिक्षण आणि औद्योगिक शिक्षण यांची गाठ घालावयाची असल्यास ती अशा रीतीनेंच पडूं शकेल. प्रत्येक राष्ट्रीय शाळेंत धंदे-शिक्षण सुरू करावयाचें म्हटलें तर अशक्य आहे. सुतारकाम, वेतकाम, लोहारकाम, झाळकाम वगैरे किरकोळ धंदे शिकवितां येतील. पण तेहि ज्या शाळेंत पांढरपेशा वर्गापेक्षां

मजूरवर्गांतील मुलें अधिक असतील त्या शाळेंत दिल्यास अधिक फलदायी होईल. तात्पर्य, औद्योगिक शिक्षणाचा सार्वत्रिक प्रसार करण्याचा प्रश्न शिक्षण संस्थांतून आजमितीस समाधानकारक रीतीनें सुटण्यासारखा नाहीं.

## स्वाभिमानाची हत्या

राष्ट्रीय शिक्षणाचें तिसरें व सर्वश्रेष्ठ अथवा प्राणभूत असें अंग म्हणजे स्वाभिमानशिक्षण होय. स्वाभिमानवर्धनाच्या प्रयत्नांत सध्यां दोन गोष्टींचा अंतर्भाव केला पाहिजे. पहिली म्हणजे स्वाभिमान जागृत होईल अशा तऱ्हेचे म्हणजे शास्त्र, कला, वाङ्मय वगैरेंतील स्वकीयांचे पराक्रम वर्णन करणारे पाठ क्रमिक पुस्तकांत घालणें ही होय. आणि दुसरी म्हणजे मातृभाषेंतून सर्व शिक्षण देणें ही होय.

स्वाभिमानपोषक शिक्षणाचें एक महत्त्वाचें साधन म्हणजे निरनिराळ्या विषयांतील क्रमिक पुस्तकें होत. विद्यार्थिदशेंत होणारे संस्कार तीव्र आणि चिरकालिक असल्यानें या वयांत योग्य पुस्तकें हातीं पडणें ही महत्त्वाची बाब होय. पण पूर्वी सरकारमान्य शाळांतून चालू असलेल्या क्रमिक पुस्तकांत या बाबीची नुसती हेळसांडच नव्हे तर विपर्यास कसा होत असे हें हीं पुस्तकें शिकविण्याचें ज्यांच्या नशिबीं आलें त्या शिक्षकांना चांगलेंच अवगत आहे. बरींच पुस्तकें परकीयांनीं लिहिलेलीं असतात आणि हिंदु लोक एकंदरीनें नामर्द व हलक्या दर्जाचे ही भावना ह्या लेखकांच्या रोमरोमांत भिनलेली असल्यानें किंवा असें प्रतिपादणें सोईचें वाटत असल्यानें या बहुतेक पुस्तकांत पूर्वग्रह, एकांगीपणा, हिंदुसंस्कृतीविषयीं गैरमाहिती आणि तिची स्पष्ट वा प्रच्छन्न हेटाळणी हे दोष नाहींत असें क्वचित् होतें.

कांहीं वर्षांपूर्वी मॅट्रिकच्या परीक्षेला नेमलेलीं 'हीरोज़ ऑफ राजस्थान' व 'टेल्स ऑफ इंडियन शिव्हलरी' हीं दोन पुस्तकें उदाहरणादाखल पहा. पहिल्या पुस्तकांत राजस्थानच्या दहा-बारा वीरांचीं चरित्रें रेखाटलीं आहेत. वीरांचीं चरित्रें हीं अद्भुतरम्य व शौर्य, धैर्य, स्वाभिमान, उत्साह वगैरे गुणांनीं रसभरित अशीं असावयाचीं. 'अर्थात् राजस्थानचे वीर' हें पुस्तकाचें नांव वाचून अशाच प्रकारचीं उज्ज्वल चरित्रें आपणांस वाचावयास सांपडणार या भावनेनें वाचक पानें उलगडूं लागतो. पण सबंध पुस्तक वाचून झाल्यावर चिडून गेला नाहीं असा वाचक विरळा. शौर्याच्या आणि बाणेदारपणाच्या उज्ज्वल

कृत्यांऐवजीं कपट, विश्वासघात, खून वगैरे कृष्णकृत्यांनींच पुस्तकाचीं बहुतेक पानें माखलेलीं आहेत. रजपूत लोकांमधील दोष म्हणून जेवढे दाखवितां येतील तेवढे कोणत्या ना कोणत्या तरी प्रसंगानें हरएक प्रकरणांत दाखविण्यास लेखक विसरला नाहीं. ऐतिहासिक दृष्ट्या हे दोष खरे किंवा खोटे हा मुद्दा येथें नाही. दोष खरे मानले तरी दोषांकडेच नेमकी नजर वळेल अशा रीतीनें त्यांचें दिग्दर्शन करणें निंद्य होय. वीर पुरुषांचीं चरित्रें लिहावयाचीं असतात तीं, त्या वीरांत असलेल्या गुणांचें अनुकरण व्हावें या हेतूनें. म्हणूनच त्यांच्या दोषांपेक्षां गुणांकडे वाचकांचें लक्ष वेधणें हें चरित्रलेखकाचें कर्तव्य होय. आणि रजपूत वीरांचीं चरित्रें हीं एकजात निंद्यच असतील तर असलीं चरित्रें विद्यार्थ्यांपुढें मांडाच कशाला ?

रजपूत वीरांत जे कपट, विश्वासघात वगैरे दोष प्रामुख्यानें दाखविले आहेत ते दोष इंग्लिश वीर क्लाइव्ह, हेस्टिंग्ज वगैरेंत कोठें नाहींत ? पण हिंदुस्थानांतील इंग्रजी साम्राज्याचा संस्थापक म्हणून क्लाइव्हचें चरित्र वाचकांपुढें मांडतांना या त्याच्या दोषांवर इंग्रज ग्रंथकार भर देण्याचें पातक करील काय ? राजस्थानांत होऊन गेलेल्या वीरांना 'वीर' मानावयाचें कीं नाहीं हा मताचा प्रश्न होऊं शकेल. पण वीर म्हणून त्यांचीं चरित्रें रेखाटण्यास सुरुवात केल्यावर त्यांच्या गुणापेक्षां दोष अधिक उठवून दाखविणें हा खोडसाळपणा होय. या दृष्टीनें पुस्तक वाचल्यावर राजस्थानच्या वीरांपेक्षां उपरोधिकपणें वीरविंडबन दर्शविण्याकरितांच पुस्तक लिहिलें कीं काय असा संशय येऊं लागतो. सगळ्या वीरांत राणा प्रताप याचें चरित्र अत्यंत उज्ज्वल असून त्यास नांवें ठेवण्यास फारशी जागा नाहीं. पण या वीराचें कर्नल टॉडनें जसें मुक्तकंठानें स्तुतिस्तोत्र गाइलें आहे तसें प्रस्तुत पुस्तकाच्या अज्ञात लेखकास गाणें जिवावर आलें आहे. इतकेंच नव्हे तर राणा प्रतापाचा प्रतिस्पर्धी जो अकबर त्याचीच थोरवी गाण्यांत या प्रतापाच्या चरित्रांत दोन-तीन पानें खर्ची घातलीं आहेत. मुसलमानांना उचलून धरून हिंदूंना कमी लेखावयाचें नेहमींचें धोरण लेखक विसरलेला नाहीं. शिवाजीचा उल्लेख करण्याचा एकदां प्रसंग आला आहे. तेवढ्यांत देखील त्याला ' डोंगरांतील उंदीर ' हें शेलकें विशेषण बहाल केलें आहे. पण महात्मा म्हणून संबोधल्या जाणाऱ्या अकबरानें ' मीनाबझार 'चा

निंद्य प्रघात प्रथम सुरू केला हें टॉडनें नमूद केलें असूनहि त्याचा उल्लेख करणें मात्र लेखकास गैरवाजवी वाटलें.

'टेल्स ऑफ इंडियन शिव्हल्री' या पुस्तकाचीहि तऱ्हा वरीलप्रमाणेंच आहे. हिंदु चालीरीतींविषयीं परकीयांना वाटणाऱ्या तिरस्काराचा वास पुस्तकांत सर्वत्र दरवळलेला आहे. पुस्तकांतील पहिलीच गोष्ट पहा. एक रजपूत तरुणी आपल्या पतीच्या शवाबरोबर सती जाण्याकरितां स्मशानांत गेलेली असते, इतक्यांत एक मुसलमान तरुण तेथें येऊन त्या रजपूत तरुणीस म्हणतो, 'सती जाऊन आपल्या देहाची माती करण्याऐवजीं आपल्याबरोबर निका लावून ऐश्वर्य नि विलास कां लुटीत नाहींस?' आणि त्याच्या मोहक भाषणाला व चेहऱ्याला भाळून ती तरुणी आप्तेष्टांना धिक्कारून त्या मुसलमान तरुणाबरोबर तत्काळ पळून जाते!

हीं दोनहि पुस्तकें सामान्य वाचकांकरितां लिहिलेलीं आहेत. पण खास विद्यार्थ्यांकरितां लिहिलेल्या क्रमिक पुस्तकांचाहि हाच प्रकार. पुस्तकांत स्तुतिपर माहिती इंग्रज लोकांविषयीं आणि तुच्छतागर्भ माहिती तेवढी हिंदी लोकांविषयीं असावयाचीं. उदाहरणार्थ, मॅक्मिलनचें न्यू इंग्लिश हायस्कूल रीडर पहा. या पुस्तकाचीं सुमारें १०० पृष्ठें प्रिन्स ऑफ वेल्सच्या चरित्रानें व्यापिलीं आहेत आणि त्याचा खुलासा प्रस्तावनेंत असा केलेला आहे-'ब्रिटिश साम्राज्यांतील अत्यंत लोकप्रिय पुरुष जो प्रिन्स ऑफ वेल्स त्याची इत्थंभूत हकीकत या पुस्तकांत आहे.' तरुण हिंदुस्थानास अशा प्रकारच्या पुस्तकाचें अध्ययन फार योग्य होय! खरें आहे! हिंदी तरुणांना स्फूर्तिदायक अशी वाटणारी महानुभाव विभूति प्रिन्स ऑफ वेल्सपेक्षां दुसरी कोणती असणार? पुस्तकाचा बाकीचा भाग व्हिक्टोरिया क्रॉस मिळविणारांच्या पराक्रमांनीं भरलेला आहे. आणि अशा तऱ्हेचें हें पुस्तक लोकप्रिय व्हावें म्हणून टागोर आणि सरोजिनी यांच्या दोन उताऱ्यांचा ताईत त्याच्या गळ्यांत बांधला आहे.

## नासकी नालस्ती

आणखी एक उदाहरण सातवें न्यू ओरिएंटल रीडर याचें. यांत महाभारतावर एक धडा आहे. त्यांत अशी माहिती पुरविली आहे कीं, श्रीकृष्णाच्या दैवी लीला वर्णन करणारीं सुमारें तीन प्रकरणें प्रक्षिप्त असून तीं बुद्धधर्माच्या

विरुद्ध मोहीम सुरू करण्याकरितां श्रीकृष्णाचें मुद्दाम स्तोम माजविणाऱ्या लोकांनीं मागाहून घुसडून दिलेलीं आहेत. महाभारत आणि श्रीकृष्ण यांविषयीं वाटणाऱ्या आदरबुद्धीस अशा विधानांनीं कसा धक्का बसत असेल हें सांगावयास नकोच. पुस्तकांत नेपोलियनच्या आयुष्यांतील एक प्रसंग दिला आहे, पण तो कोणता तर मॉस्कोहून निराश होऊन हालअपेष्टांत परत फिरण्याचा. नेपोलियनाच्या आयुष्यांत उज्ज्वल प्रसंग अनेक आहेत, पण लेखकाला मॉस्कोचा प्रसंगच तेवढा आवडला. याच पुस्तकांत रजपूत आणि मराठे यांवरहि दोन धडे आहेत. पैकीं रजपूत म्हणजे फंदफितुरी, विश्वासघात, खून वगैरेंचा केवळ अर्क असें वर्णन आहे. जातां जातां हिंदु संस्थानिक हे गबाळे व निर्बुद्ध असून ते युरोपची यात्रा करूं लागल्यापासून माणसांत जमा होऊं लागले आहेत, अशीहि माहिती विद्यार्थ्यांस पुरविली आहे. मराठ्यांच्यावर जो पहिलाच धडा आहे त्याचें पहिलेंच वाक्य असें आहे कीं, मराठी साम्राज्य हें नांवच झूट आहे. हिंदुस्थानच्या इतिहासांतले दोनतीन प्रसंगहि पुस्तकांत आहेत. ते कोणते? तर पहिला, ब्रिटिश राज्यापूर्वीं हिंदुस्थानांत पडणाऱ्या दुष्काळाच्या भयंकरपणाचा; दुसरा, अफगाण लोकांनीं इंग्रजांशीं केलेल्या दगलबाजीचा, आणि तिसरा, मेकॉलेच्या अतिशयोक्तिपूर्ण भाषेनें रंगविलेला ब्लॅक होलचा!

पण हे नुसते तुटक पाठ होत. हिंदु लोकांची मनमुराद नालस्ती करण्याचें खास क्षेत्र म्हणजे इतिहास. सध्यां शाळांत सुरू असलेल्या मार्सडेनच्या इतिहासांतील 'शिवाजी हा चोर व लुटारू होता' हें वाक्य सर्वांच्या परिचयाचें आहे. पण पुरी कल्पना येण्याकरितां इतिहासाचे तज्ज्ञ म्हणून समजले गेलेल्या व्हिन्सेंट स्मिथच्या 'ऑक्सफोर्ड हिस्टरी ऑफ इंडिया' मधील पुढील मुक्ताफळें पहा—

"अहिल्याबाई नांवाच्या एकाच स्त्रीचा अपवाद वगळला तर अठराव्या शतकाच्या अखेरीस होऊन गेलेल्या मराठे सरदारांत म्हणण्यासारखा एकहि सद्गुण नव्हता. उलट दगेबाजपणा, दुष्टपणा, लुटारूपणा व आणखी कित्येक दुर्गुणांची त्यांना काळोखी लागलेली आहे. ज्या घाणेरड्या राज्यपद्धतीचा त्यांनीं अवलंब केला होता ती मनुष्यजातीच्या कोणत्याहि दृष्टीनें प्रगतीस अगर यत्किंचितहि कल्याणास अपात्र होती. मराठ्यांच्या राजकीय राज्यव्यवस्थेंत आढळून येणारा नीतीचा खून अगदीं स्पष्ट व निर्लज्जपणाचा होता. त्यांच्या सैन्याची

व राज्यव्यवस्थेची पद्धति साम्राज्य उत्पन्न करण्यापेक्षां नष्ट करण्याकडेच गणली जाईल. एकंदरींत मराठे हे धंदेवाईक चोर असून त्यांच्या चळवळी त्यांच्या सालस शेजाऱ्यांना असह्य होत असत. धामधुमीच्या काळांत पुढें घुसणाऱ्या सर्व दंगेखोरांशीं ते उघडपणें मिसळत व नंतर त्यांच्या बेलगामी राज्यास दाबून टाकणें हें त्यांचें पहिलें काम असे. **१८१८ त मराठी राज्याचा पुरा नाश झाल्याबद्दल कोणाहि हिंदूंच्या किंवा युरोपियनांच्या अंतःकरणांत विषाद किंवा सहानुभूतीचा यत्किंचितहि विचार उद्भवण्याचें कारण नाहीं.** ज्याला ऐतिहासिक वस्तुस्थितीचा थोडा तरी परिचय झाला आहे, असा कोणीहि मनुष्य मराठ्यांच्या दुष्टपणाबद्दल त्यांचा झालेला पुरा नाश व त्यांच्या जागीं व्यवस्थित ब्रिटिश राज्यपद्धतीचें आगमन हीं हिंदुस्थानच्या अलोट कल्याणासाठीं अवश्य होतीं याबद्दल संदेह बाळगणार नाही."

या विचारसरणीचें जोखड विद्यार्थ्यांच्या कोवळ्या संस्कारक्षम अशा मनावर पक्कें बसलें तर सध्यांचें पारतंत्र्य संपण्याची आशाच नको.

स्वाभिमान दडपून टाकणाऱ्या विचारसरणीच्या जोडीला चित्रांचीहि मदत घेतली जाते. एखाद्या नेटिव्ह राजाचें चित्र द्यावयाचें असतां तें हटकून काळें कुळकुळीत व विरूप असें असावयाचें. रॉलिन्सनच्या शिवाजीचरित्रांत दिलेल्या शिवाजीच्या चित्रांत त्याचा वर्ण अस्सल शिद्द्याच्या वर्णाला मागें टाकील असा दाखविला आहे. 'टेल्स ऑफ इंडियन शिव्हलरी' व त्याच ग्रंथकाराचें 'इन् दि वाइल्ड मराठा बॅटल' या पुस्तकांत देवीचीं चित्रें काढलीं आहेत तीं एखाद्या छचोर युरोपियन तरुणीचीं वाटतात. जुन्या मराठी क्रमिक पुस्तकांत निरनिराळ्या जातींच्या लोकांचीं चित्रें दिलेलीं असत. त्यांत युरोपियनाचें चित्र तेवढें नीटस दाखविलें असून बाकीच्यांचीं ओबडधोबड दाखविलेलीं असत. युरोपियनांचा वर्ण पांढरा येवढेंच, बाकी ते नाकाडोळ्यांनीं जास्त नीटस व तरतरीत आहेत असें मुळींच नाहीं. सातवे न्यू ओरिएंटल रीडरमधील एक चित्र फारच बहारीचें आहे. या पुस्तकांत महाभारतावर एक धडा आहे व त्यांत उल्लेख आलेल्या राजसूय यज्ञाची कल्पना येण्याकरितां यज्ञाचें चित्र दिलें आहे. हें यज्ञाचें चित्र कसें असेल अशी तुमची कल्पना आहे ? मध्यें अग्निकुंड पेटलें असून भोंवतीं दर्भ पसरलेले आहेत, व ऋषि मंत्रोचार करीत असून यजमान आहुति देत आहे अशी तुमची कल्पना असेल तर ती साफ चुकीची होय.

ह्या चित्रांत मध्यभागीं एका खांबाला एक रेडा बांधलेला असून त्याच्या मानेवर एक फॅशनेबल खाटीक सुरा ठेवीत आहे व हा देखावा भोंवतीं बसलेलीं किरिस्तांव मंडळी पाहत आहेत असें दाखविलें आहे व चित्राच्या खालीं 'सॅक्रिफाइस' असा शेरा आहे!

या गोष्टी लक्षांत घेतल्या म्हणजे शिक्षणांत राष्ट्रीय दृष्टि म्हणून कांहीं असते व क्रमिक पुस्तकें राष्ट्रीय वृत्तीनें लिहिलीं जाणें कां आवश्यक आहे हें ध्यानांत येईल.

सर्वच विषयांवरील क्रमिक पुस्तकें राष्ट्रीय दृष्टीनें लिहिलीं गेलीं पाहिजेत. भूगोल विषय घेतला तर तो शिकविण्याच्या अलीकडच्या पद्धतींत त्या त्या देशांतील खनिज संपत्ति, आयात निर्गत व्यापार, चालू कारखाने, देशाच्या आर्थिक गरजा वगैरे गोष्टींचा समावेश करण्यांत येतो. आणि ह्या सर्व बाबी त्या त्या देशांच्या भिन्न असतात. त्यांत आपल्या देशांतील साधनसंपत्ति व गरजा यांची जाणीव विद्यार्थ्यांना स्पष्ट व तीव्रतेनें होईल अशी दृष्टि राखणें म्हणजेच भूगोल राष्ट्रीय दृष्टीनें शिकविणें होय. दाखल्यादाखल महाराष्ट्रापुरतें बोलावयाचें तर ओगले यांचा कंदील बाजारांत परकीय मालाशीं कांहीं काल टक्कर देऊं शकला नाहीं, कोल्हापूरच्या आसपास अल्युमिनियम धातूस लागणारा बॉक्साइट दगड भरपूर सापडत असूनहि व अल्युमिनियमचा कारखाना काढण्याचें एके वेळीं जवळ जवळ ठरलें असतांहि तो निघूं शकला नाहीं, कोंकणांत आंबा पुष्कळ पिकत असूनहि फळें मोहोरबंद करून टिकविण्याचे कारखाने न काढल्यानें बराच आंबा फुकट जात आहे, भाटघरच्या धरणावर वीज उत्पन्न होण्यासारखी असतांहि ती केली जात नाहीं, असल्या प्रश्नांची निर्भीड चर्चा विद्यार्थ्यांच्यापुढें केली जाणें अवश्य आहे. भौतिकशास्त्र व गणितशास्त्र यांत तरी निदान राष्ट्रीय असें कांहीं नसावें असें कोणास वाटेल. या विषयांचें शिक्षण आजमितीस पाश्चात्य गुरूंच्या पायापाशीं बसूनच ग्रहण केलें पाहिजे हें कोणीहि कबूल करील; पण याहि विषयांत राष्ट्रीय दृष्टीला जागरूकता राखण्याचें कारण नाहीं असें मात्र नव्हे. उदाहरणार्थ-वैद्यकशास्त्र घ्या. पाश्चात्य वैद्यकशास्त्र प्रौढ व वर्धमान असलें तरी शेंकडों वर्षांच्या अनुभवानें सिद्ध झालेले आयुर्वेदांतील औषधी पाठ आजहि रोगहरणास समर्थ आहेतच ना? मग सरकारी दक्षिणा फक्त पाश्चात्य वैद्यकाच्याच पदरांत पडावी ही घटना राष्ट्रीय दृष्टीला खुपल्याविना कशी राहील? गणित सगळ्यांत

सोवळें; पण काटकोण त्रिकोणाचा सिद्धान्त शिकवितांना पायथागोरसच्या बरोबर शुल्व सूत्रांचा उल्लेख कां होत नाहीं? तसेंच बीजगणिताची वाढ आपल्याकडे उत्तम झालेली होती व दशांशपद्धतीसारखी बहुमोल पद्धति शोधून काढण्याचा मान भारतीयांचा आहे या गोष्टी विद्यार्थ्यांच्या कानांवरून जावयास नकोत काय? पण राष्ट्रीय दृष्टि जागविल्याविना त्या विद्यार्थ्यांच्या पुढें कधींच यावयाच्या नाहींत. या बाबतींत पाश्चात्यांनीं केलेली प्रगति स्वीकारावयाची नाहीं, व पूर्वजांच्या पराक्रमाचें तुणतुणें कुचमावत बसावयाचें असें मुळीच म्हणणें नाहीं. **पण नवीन ज्ञानाचा स्वीकार न करणें हें जसें राष्ट्रीय पाप होय, तसेंच पूर्वजांच्या अभिमानास्पद कामगिरीचें स्मरण न राखणें हेंहि पण राष्ट्रीय पापच होय.**

इतर सर्व राष्ट्रांना या गोष्टी कळतात. कळत नाहींत फक्त आम्हांलाच.!

## मातृभाषेची महती

या न कळणाऱ्या गोष्टींत जिचा स्वतंत्र व थोडा विस्तारानें उल्लेख केला पाहिजे ती गोष्ट म्हणजे शिक्षणक्रमांतील मातृभाषेचें स्थान ही होय. या बाबी-संबंधानें वाद घालावा लागावा हा देखावाच आधीं विचित्र होय. आणि तो कोठें पहावयास सापडत असेल तर फक्त हिंदुस्थानसारख्या परधार्जिण्या देशांत.

शिक्षणाक्रमांतील मराठी भाषेच्या दर्जाचा हा प्रश्न अनेकवार घाटला जात असूनहि कांहीं विचारवंतांचें अद्यापीहि असें मत आहे कीं, महाराष्ट्र प्रांतांतील शाळा-कॉलेजांत म्हणजे मराठीच्या नांदत्या घरांत अद्यापीहि मराठीनें सून-पणानेंच वावरावें. त्यांच्या मतें जबाबदारी अंगावर घेऊन स्वतंत्र संसार थाटण्याइतका प्रौढपणा मराठीच्या अंगीं अद्यापहि आलेला नाहीं. गोष्ट मोठी विचार करण्यासारखी आहे. जिच्या कुशीं ज्ञानेश्वर, तुकाराम, मुक्तेश्वर, मोरोपंत, यांच्यासारखे अनेक वागीश्वर जन्मास आले व जिनें निबंधमाला, गीतारहस्य, मराठे-इंग्रज, मध्ययुगीन भारत, नीतिशास्त्रप्रवेश, रियासती, ज्ञानकोश यांसारख्या प्रौढ गंभीर सारस्वताचा संसार केला त्या प्रौढ व पोक्त मराठीनें अद्यापीहि शाळा-कॉलेजांतून इंग्रजी सासूच्या हाताखालीं सुनेप्रमाणें वावरावें, म्हणजेच कॉलेजांतील प्रौढ विषयांसारखीं सोंवळ्यांतील जबाबदारीचीं कामें इंग्रजी सासूच्या खास देखरेखीखालीं चालावीं व दुय्यम शिक्षणांतील कांहीं

विषय पारोशांतील कामासारखे मराठी सुनेनें उरकावेत, असलें मत अद्यापिहि कायम असणें आश्चर्य नव्हे काय?

नसेल, इंग्रजी सासूइतकी मराठी सून चलाख नसेल. व्यवहाराच्या कांहीं बाबींचें पूर्ण आकलन तिला अद्याप झालें नसेल. पण जबाबदारी अंगावर टाकल्याखेरीज तें होणार तरी कसें? भौतिक शास्त्राच्या परिभाषेचा व्यवहार अद्याप तिचा बसला नाहीं हें खरें. पण आज नाहीं दहा वर्षांनीं का होईना भौतिक शास्त्राचेंहि शिक्षण आपण मराठीद्वाराच देऊं असा कृतनिश्चय केल्यावर ही गोष्ट अशक्य आहे कीं काय? ज्या भाषेनें ज्ञानकोशासारखा प्रचंड बौद्धिक व्यवहार करून पश्चिमेकडील घाटमाथ्यावर पडणारें पर्जन्यजल जसें महाराष्ट्रांतील नद्या देशभर पसरवितात तद्वत् पश्चिमेकडील ज्ञानसंचयांतील हरएक शाखोपशाखांचें ज्ञान मराठींत रूपांतरित करणें शक्य करून दाखविलें आहे त्या मराठी भाषेला अद्यापिहि प्रौढावस्था प्राप्त झाली नाहीं असें मानणें कितपत वाजवी होईल?

## घरधनीण कीं बटीक?

पण काय असेल तें असो. सूनपणा पत्करून स्वतःच्या घरांतच दुय्यमपणानें वावरणें हें मराठीचे ललाटींच लिहिलें आहे कीं काय असें वाटूं लागतें. कारण मराठीनें स्वतंत्र संसार थाटावा कीं नाहीं, या विषयाचा वाद आजकालचा नसून थेट ज्ञानेश्वराच्या काळापासून सुरू आहे. आजच्याप्रमाणें त्या काळच्याहि कांहीं सुशिक्षितांच्या मनांत मराठीच्या मगदुराविषयीं किंतु होता. वास्तविक ज्ञानेश्वरीसारखें सर्ववंद्य पुत्ररत्न जिला लाभलें तिच्या दर्जाविषयींचा प्रश्न उपस्थित करणेंच गैरशिस्त; पण त्या वेळच्या सुशिक्षित म्हणजे संस्कृतज्ञ शास्त्रीमंडळाला मराठीला मिळूं घातलेला प्रौढत्याचा व स्वातंत्र्याचा मान पाहून चैन पडेनासें झालें. ज्या व्यक्तीला अरे-तुरे म्हणून लहानपणीं संबोधिलें तीच व्यक्ति मोठी होऊन मान्यतेस चढली म्हणजे तिला अहो-जाहो म्हणून गौरविणें भाग असतें हें माहीत असतांहि तसा प्रसंग प्राप्त झाला म्हणजे प्रथम मोठें अवघड जातें. जीभ वळत नाहीं. मनाला चुकल्याचुकल्यासारखें वाटतें. हीच मनोवृत्ति त्या वेळच्या शास्त्रीमंडळांत प्रभावी झाली. मराठीच्या उदयाबरोबर संस्कृतचें सार्वभौमत्व अस्ताचलाची वाट चालूं लागणार व

संस्कृतज्ञ शास्त्रीमंडळाच्या मान्यतेचें आसन डळमळूं लागणार हें त्यांनीं तत्काळ हेरलें आणि अशी हाकाटी सुरू केली कीं, वेदान्तासारख्या पवित्र राजविद्या राजगुह्यांचें अमृत प्राशन करण्यास गीर्वाणवाणीचा सुवर्ण-चषक तिरस्कारून मराठीची भिकार करवंटी हातीं धरावीं हा त्या संस्कृत देववाणीचा उपमर्द होय. भगवद्गीतेसारख्या प्रौढ, गहन, आध्यात्मिक ग्रंथाची चर्चा करणें हा मराठीचा अधिकार नव्हे, तशी तिची योग्यता नव्हे आणि तिला हें काम झेपणारहि नाहीं. आधुनिक परिभाषेंत बोलावयाचें म्हणजे बहुजन-समाजाला वेदान्तासारख्या प्रौढ विषयाचें ज्ञान शिकविण्यास बोधभाषा म्हणून मराठीचा उपयोग करावा कीं नाहीं, तिला गहन विषयाची चर्चा झेपेल कीं नाहीं, व बोधभाषा म्हणून सरास उपयोग करण्याइतका तिच्यांत प्रगल्भपणा येऊं शकेल कीं नाहीं, हाच वाद त्या वेळीं संस्कृत विरुद्ध मराठी अशा रूपानें उपस्थित झाला होता.

पण या शंकोपशंकांचीं कोळिष्टकें झाडून टाकून आपल्या दिव्य वाणीनें जनतेचीं मनें मायभाषेविषयीं साफ करील असा एक सत्पुरुष ज्ञानेश्वररूपानें त्या वेळीं अवतरला. मृत पितर श्राद्धाला हजर करून संन्याशाचीं मुलें म्हणून हेटाळणी करणाऱ्या शास्त्रीमंडळाचा गर्व जसा त्यानें शमविला, तसेंच मातृ-भाषेवरील अपमानास्पद आक्षेप समूल खणून काढण्याविषयीं चंग बांधून अमृताहूनहि सरस व अमर अशीं अक्षरें मेळवीन अशी प्रतिज्ञा ग्रंथारंभीं करून अंतीं ती सिद्धहि करून दाखविली. तथापि ज्ञानेश्वरासारखा एखादा प्रतिभावान् लेखक विजेप्रमाणें चमकून गेल्यानें प्रतिनिविष्ट शास्त्रीमंडळाच्या डोळ्यांतील दुराग्रहाचें कालदृढ तिमिर एकदम नष्ट होण्यासारखें नव्हतें. त्यामुळें वेदान्तासारखा प्रौढ विषय शिकविण्यास मराठी बोधभाषा म्हणून वापरावी कीं नाहीं हा वाद ज्ञानेश्वरकालींच न थांबतां– पुढें एकनाथ, दासो-पंत वगैरे; ग्रंथकारांच्या वेळींहि जोमांत चालू राहिला. ज्ञानेश्वरींत दुसऱ्या एखाद्या कवीनें स्वकृत कविता घुसडून देणें म्हणजे सुवर्णाच्या ताटांत नरोटी ठेवणें येवढी ज्या ज्ञानेश्वरीची योग्यता एकनाथास वाटे, ती ज्ञानेश्वरी डोळ्यां-पुढें असतां शास्त्रीमंडळ आपला मराठीविषयींचा अनुदार दुराग्रह सोडण्यास तयार होईना हें पाहून एकनाथानें त्राग्यानें लिहिलें आहे––'संस्कृत वाणी देवें केली। प्राकृत तरी चोरापासून झाली ।। असो तूं या अभिमान भुली । वृथा बोली

काय काज ।।' तदनंतरचा दासोपंतहि मराठीच्या आक्षेपकांवर खरमरीत कोरडे ओढून लिहितो, 'कीं प्राकृत म्हणोनि दूषिति । तेचि यया ज्ञाना वंचति । भाषाचि केवळ भजति । ते मूर्खकींना ।। संस्कृत बोलणें सेवणें । तेंचि सांडावें प्राकृत वचनें । ऐशिया मूर्खा मुंडणें । किती आतां ।। तथापि, ज्ञानेश्वरानंतर तीनशें वर्षें लोटल्यावरहि जयराम पिंड्यानें लिहिलें आहे कीं, संस्कृत सिंहापुढें प्राकृत भाषा माकडें होत! पण हळूहळू अनेक सत्कवींनीं मायभाषेचा अभिमान-पुरःसर पुरस्कार केल्यानें कालांतरानें विरोधाची अढी ढिली पडत चालली व वामन-मोरोपंताच्या काळीं त्यांच्या भाषेवरील असामान्य प्रभुत्वामुळें व भाषेच्या संस्कृति कारणामुळें मराठी काव्य हरिदासांच्या मुखीं घोळूं लागून मराठीचा सूनपणा संपत आला. फार दिवस सासूपणानें मिरविलेली वृद्ध जरठ संस्कृत सासू घरचा कारभार सुनेवर टाकून वृद्धापकाळीं पोथ्यापुराणें ऐकत काळ कंठूं लागली व मराठीचा स्वतंत्र संसार आतां अनिर्बंध चालणार असा देखावा दिसूं लागला.

## आखाडसासूचें आगमन

पण विधिघटना निराळी होती. सख्ख्या सासूनें कारभाराच्या किल्लया सुनेच्या अंगावर टाकून थोडीं वर्षें लोटलीं असतील नसतील तोंच एक दिवस अगदीं अभावितपणें कोठली तरी एक आखाडसासू घरांत घुसली आणि पुनः सून-बाईचा सूनपणा सुरू झाला! संस्कृताचा वरचष्मा संपतो न संपतो तोंच इंग्रजीचा अंमल सुरू झाला आणि बिचाऱ्या मराठीची स्थिति पहिल्यापेक्षां अधिक केविलवाणी होऊन "खरी सासू धरती कान, तर आखाडसासू मागती मान" असा कटु अनुभव येऊं लागला.

इंग्रजी अमलांतहि मराठी सारस्वताची अपूर्व वाढ होत असून सरस अव्वल दर्जाचे गद्यपद्य ग्रंथ निर्माण होऊं लागले आहेत. पण शाळा-कॉलेजांतून तिला योग्य असें बोधभाषेचें स्थान मिळणें या प्रश्नाला अव्वल इंग्रजींत जें एकदां ग्रहण लागलें त्याचा मोक्षकाल जवळ येण्याच्या बाबतींत अद्यापिहि दुमत आहेच. गेल्या दहावीस वर्षांत अनेक वेळां या प्रश्नाचा खल झाला व अधि-कारी विद्वानांकडून मराठीच्या आक्षेपकांचे मुद्दे खोडून काढण्यांत आले. पण दुःसाध्य रोगानें पछाडलेला रोगी कांहीं दिवस बरा होत जातोसा वाटावा

व आकस्मिक पुनः उलटावा तसें या बोधभाषेच्या प्रश्नावर एकमत होत चाललेंसें वाटूं लागावें, कांहीं काळ वाद थांबला असें दिसावें तों फिरून कलाटणी मिळून वादाचें हरिदासी कथानक मूळ पदावर यावें असें चाललें आहे. आणि वाद सुरू झाला कीं, पूर्वी झालेली चर्चा वाऱ्यावर विरून जाऊन अगदीं प्राथमिक आक्षेपापासून सुरुवात ! मातृभाषेच्या अभिमान्यांच्या पदरीं भोळसट मुद्दे बांधणे हा तर एक डावच आहे. ते असें म्हणतात असें भासवावयाचें कीं, प्रांतिक भाषा शिक्षणमाध्यम करा, कीं पहा काय चमत्कार होतो तो! एकदम ती भाषा ओजस्वी, गंभीर, जगांत उत्तमोत्तम भाषेच्या तोडीची बनवावयाची. मराठी बोधभाषा असावी म्हणून ज्या सर्वांनीं आजपर्यंत तिची तरफदारी केली त्यांनीं काय ती। वरीलसारख्या बावळट व भोळसट मुद्दयावर केली ? मराठीबोधभाषेच्या आक्षेपकांच्या पदरीं राष्ट्राभिमानशून्यता वगैरे दोष बांधले जाऊं नयेत अशी जशी ते न्याय्य अपेक्षा करतात तसेंच तिची तरफदारी करणाऱ्यांच्या पदरींहि भोळसट मुद्दे बांधून प्रच्छन्नतिरस्कार व्यक्त न करतां त्यांचे वाजवी मुद्दे लक्षांत घेणें जरूर नाहीं काय ? पण वर म्हटल्याप्रमाणें वाद सुरू झाला कीं, पोचट मुद्दयांचा कोंडा पाखडण्यापासून सुरुवात.

मराठीला बोधभाषेचा दर्जा प्राप्त होतांच महाराष्ट्र सारस्वतांत अलौकिक उल्कापात होऊन आज जगत्सारस्वताच्या कोठल्या तरी मधल्या थरांत दडलेलें मराठी सारस्वत उद्यां सर्वांच्या माथ्यावर विराजूं लागेल असल्या भोळसट कल्पनेच्या पायावर तिच्या तरफदारीची इमारत उभारलेली नाहीं. स्वकीयांत कदाचित् असलें कांहीं मृगजल पिऊन या अभ्रखंडांत वास्तव्य करणारे कल्पनाभ्रमिष्ट असूं शकतील. पण कांहीं वर्षांपूर्वीचे शिक्षणमंत्री ना. बटलर किंवा व्हाइस-चॅन्सेलर मॅकिकन या परकीयांचाहि कल मातृभाषा बोधभाषा असावी याकडे झुकण्यास देशी भाषांचा प्रेमा कारणीभूत होण्याचें कांहींच कारण नव्हतें. अनेक मिशनरी शाळाधिकाऱ्यांनाहि या बाबतींत योग्य तोच अनुभव येऊन चुकला आहे. सिलोनमधील कँडी येथील ट्रिनिटी स्कूलच्या अधिकाऱ्यांनीं तेथील सरकारशीं याबाबत सनदशीरपणें भांडून स्वभाषेंतून शिकविण्याचा हक्क शेवटीं मान्य करून घेतला असें एक मिशनरीबोवा लिहितात. अर्थात् मातृभाषा बोधभाषा असावी असा आग्रह धरण्यास तशींच कारणें आहेत.

## मातृभाषा हीच बोधभाषा : कारणें

मुख्य हें कीं घरींदारीं कानांवर पडणाऱ्या व हाडींमासीं खिळलेल्या मायभाषेच्या द्वारें कोणत्याहि विषयाचें ग्रहण जसें सुलभ रीतीनें होऊं शकतें तसें तें परकीय भाषेच्या द्वारें होणें निसर्गतःच अशक्य आहे. निदान हायस्कुलांतून तरी मातृभाषा हीच बोधभाषा वापरावी एवढी सवलत देण्यापुरतें तरी एकमत होत चाललें आहे हें भाग्यच म्हणावयाचें; पण ही क्षुल्लक गोष्ट साध्य होण्यास दहा वीस वर्षे ओरड करावी लागली. अद्यापहि कॉलेजमध्यें बोधभाषा परकीच आहे. कॉलेजमधल्या विद्यार्थ्यांचीहि स्थिति कांहीं कमी शोचनीय नसते. तर्कभाषा किंवा शाबरभाष्य अशासारख्या कठीण शास्त्रीय ग्रंथांचें इंग्रजींत भाषांतर करण्याच्या दिव्यांतून जे विद्यार्थी गेले असतील त्यांना ह्या परभाषेंत शास्त्रीय विचार प्रगट करण्याच्या हालांचें मर्म लक्षांत येईल. त्या त्या शास्त्रीय ग्रंथांतील क्लिष्ट भागाचा अर्थ समजावून घेणें आधींच जिगजिगीचें, त्यांत त्यांचा परभाषेंत तर्जुमा करणें तर फारच क्लेशकारक. मग असल्या ग्रंथाचें इंग्रजी भाषांतर घोकण्यांत अर्धें रक्त आटलें तर नवल कसलें? बरें, ह्या बाबतींत मराठी भाषा प्रगल्भ व समर्थ नाहीं असें का आहे? एक भौतिक शास्त्रें सोडली तर वेदान्त, इतिहास, कायदा, राजकारण, अर्थशास्त्र वगैरे विषयांचा प्रौढ ऊहापोह करण्यास आजहि मराठींत शब्दसंपत्तीची वाण नाहीं. तेव्हां हें घरचें सुग्रास अन्न टाकून पचावयास जड अशा इंग्रजी खाणावळींतील अन्नानेंच या विषयाची भूक भागविली पाहिजे असा आग्रह धरणें अपायकारक नाहीं का?

आणि हा आग्रह तरी कां तर महाराष्ट्राबाहेरील परप्रांतीय पाहुण्यांना भावी आदर्शभूत विश्वविद्यालयाच्या मेजवानींत भाग घेतां यावा म्हणून.

## पाहुण्यांची बरदास्त

परप्रांतीयांची काळजी वाहणें, त्यांच्याविषयीं आदर बाळगणें व त्यांना योग्य पाहुणचार देणें हें निःसंशय सज्जनपणाचें द्योतक होय. पण पाहुण्याची बरदास्त राखण्याकरितां घरदार गहाण टाकणाऱ्या फाजील उदार सज्जनाची तारीफ करण्याऐवजीं कींवच केली जाईल. परप्रांतीयांना महाराष्ट्र विद्यापीठांत मज्जाव नसावा एवढ्याकरितां महाराष्ट्रीय विद्यार्थ्यांच्या गळ्यांतील

परभाषेचें लोढणें वर्षानुवर्ष कायम ठेवणें न्याय्य होईल काय याचा तत्पक्षीयांनीं अवश्य विचार करावा. महाराष्ट्र विद्यापीठ आदर्शभूत व्हावें अशी कळकळ बाळगणारांनीं तें महाराष्ट्रापुरतें आदर्शभूत करून दाखविलें तर थोडें होणार नाहीं. आणि तसें ते होऊन खरोखरीच अद्वितीयत्व असें त्याच्यांत उत्पन्न झालें तर परप्रांतीय विद्यार्थी त्याच्यांतील वरिष्ठ व अद्वितीय ज्ञान संपादन करण्याकरितां मराठी भाषा शिकण्यास कमी करतील असें नाहीं. हिंदी विद्यार्थी वरिष्ठ विद्या शिकण्याकरितां परदेशीं जातात तेव्हां फ्रेंच, जर्मन वगैरे भाषा हस्तगत करूनच आपला निर्वाह करतात कीं नाहीं? तद्वतच परप्रांतीयांना मराठी भाषेचें तात्पुरतें ज्ञान जोडावें लागलें तर ते जोडतीलहि. आजमितीसहि मराठींत जुने, बहुमोल, अस्सल असे शेंकडों ऐतिहासिक कागदपत्र उपलब्ध झाल्यानें परप्रांतीय इतिहासप्रेमी मराठीचा अभ्यास करूं लागले आहेत. तात्पर्य, वेदान्त, इतिहास वगैरे ज्या विषयांची प्रौढ प्रगल्भ चर्चा करण्यास मराठी सर्वतोपरी समर्थ आहे त्या विषयापुरता परभाषेचा जुलूम कॉलेजांतील विद्यार्थ्यांच्यावर चालू ठेवणें कोणत्याहि सबबीवर समर्थनीय ठरेल असें वाटत नाहीं.

## बुद्धीला निष्कारण ताण

दुसरें असे कीं परभाषेंतून विचार प्रगट करण्यांत बुद्धीला निष्कारण फाजील ताण पडतो. एवढेंच नव्हे तर या ताणामुळें विषयांचें ज्ञानहि अर्धेकच्चें होऊं लागते. इंग्रजींतून जे विचार वाचतों ते पुन्हा प्रकट कसे करतां येतील याची चिंता नेहमीं मनांत वावरत असल्यानें त्या त्या विषयाचीं लहानसान चोपडी घोकून काढण्याकडे प्रवृत्ति होते व विषयांत मनसोक्त अवगाहन करण्यास फुरसत किंवा मनाचा उत्साह शिल्लक उरत नाहीं. शाकुंतल किंवा उत्तररामचरित यांसारखीं नितांतरमणीय काव्यें तज्ज्ञ व रसिक गुरूच्याबरोबर वाचावयास लाभणें ही वस्तुतः शुद्धानंदाची केवढी पर्वणी! पण बिचारा प्रोफेसर तरी करतो काय? एखादा उत्कृष्ट श्लोक वाचून झाला रे झाला, कीं त्याचें सरस इंग्रजी भाषांतराच्या कसरतीचें कौशल्य दाखविण्यांत त्याचा अर्धा वेळ व विद्वत्ता खर्ची पडते, आणि उरलेल्या वेळांत श्लोकांतील रसाविष्करण करूं

लागला तर प्रोफेसरास साध्य झालेलें भाषांतरकौशल्य आपणास कसें हस्तगत करतां येईल या आचीनें विद्यार्थ्यांच्यापुरता श्लोकांतील रस आधींच आटून गेलेला असतो. संस्कृत काव्यनाटकासंबंधानें हा अनुभव सर्वांच्या परिचयाचा आहे कीं, तीं वर्गांत शिकविलीं जात असतां त्याचें खरें रसग्रहण क्वचितच होतें. तीं मागाहून परीक्षेच्या बागुलबोवाच्या तावडींतून सुटल्यानंतर स्वतंत्र वाचावीं तेव्हां त्यांत रस उत्पन्न होतो. आणि या परिस्थितीला परकीय बोधभाषाहि बऱ्याच अंशीं कारणीभूत आहे. तात्पर्य, परकीय भाषेच्या द्वारें कोणत्याहि विषयाचें अध्ययन चालू असतां बुद्धीवर फाजील ताण पडत असतोच, पण विषयाचें ज्ञानहि उथळ होऊं लागतें. म्हणून संस्कृत, इतिहास वगैरे ज्या विषयांतील मराठी भाषा आजतागायत कमावून तयार झालेली आहे तेवढ्या विषयांत तरी मायभाषेच्या अनिरुद्ध संचारास पायबंद घालणें इष्ट होणार नाहीं.

तिसरें कारण असें की, परकीय भाषेंत विचार करण्याची सवय लागल्यानें सुशिक्षित वर्ग व अज्ञ अशिक्षित बहुजनसमाज ह्यांतील अंतर दुरावत जाऊन सुशिक्षितांचें नेतृत्व दुर्बळ होऊं लागतें. सुशिक्षित माणूस हा एक उज्ज्वल ज्ञानदीप होय. तो जेथें जेथें जाईल, ज्या समाजांत वावरेल, ज्यांच्यांत मिसळेल त्या सर्वांना त्याच्या ज्ञानाचा प्रकाश आपोआपच मिळूं लागतो. पण तो तसा मिळण्यास त्या दीपावरील कांचेची चिमणी मायभाषेच्या शुभ्र स्वच्छ कांचेची असावी लागते. ती तशी नसतां परकी भाषेची रंगीबेरंगी असेल तर प्रकाश स्वच्छ न मिळतां दिव्याजवळ जाणारा धोक्याची सूचना समजून बिचकून बिथरून मात्र जाईल. आज सुशिक्षितांच्या बाबतींत हा अनुभव येतोहि; नोकराकडून कामें करून घेण्याची सवय असलेल्याला स्वतःवर काम करण्याचा प्रसंग आला असतां जसें जड जातें तसें परकीय भाषेंत वाचन-विचार सतत करणाऱ्या आधुनिक सुशिक्षिताला सामान्य अशिक्षित माणसांच्या हृदयास भिडेल अशा सोप्या, घरगुती, अस्सल मराठमोळ्याच्या भाषेंत बोलणें जड जात असल्यानें अज्ञ समाजाला सुशिक्षित वर्ग ही एक भिन्न संस्कृतीची अगम्य अशी निराळी जात वाटूं लागते व तो त्यापासून धोक्याच्या सूचनेप्रमाणें चार हात लांब राहूं इच्छितो. या परिस्थितीच्या कारणांतील परकीय बोधभाषेचा अंश अवश्य लक्षांत घेतला पाहिजे.

## विचार आणि भाषा

सुशिक्षित उच्च वर्गाच्या घाटमाथ्यावर पडणाऱ्या ज्ञानपर्जन्यजलानें सर्व समाजाच्या विचाराची शेती पिकवायची असल्यास तें ज्ञान मायभाषेच्या पाटांतून सर्व समाजभर पसरविलें पाहिजे. परकीय भाषेंत अध्ययन चालू ठेवून त्यांतील ज्ञान मायभाषेंत सरसपणें प्रकट करणें हें अशक्य आहे अशांतला भाग नाहीं. ज्यांनीं मायभाषेंत लेखनाचा किंवा भाषणाचा पेशा स्वीकारला आहे ते विचाराच्या पायांत लुडबुडणारें परभाषानियंत्रणाचें लोढणें पूर्णपणें झुगारून देऊं शकतात; पण धंदेवाईक लेखकांना ही गोष्ट शक्य असली तरी सामान्य माणसास ती सुलभसाध्य नाहीं. कालिदासानें वर्णन केल्या-प्रमाणें विचार आणि भाषा हीं इतकीं संपृक्त, संलग्न व सरूप आहेत कीं, विचारांचा आत्मा हा भाषेच्या कुडीशिवाय राहूं शकत नाहीं. विचार मनो-मंजूषेंत संचित केले जातात, ते भाषानिविष्टच असतात आणि त्यांचें पुनः स्मरण सुरू झालें, कीं जे हजर होतात तेहि पूर्व भाषेच्या देहांतच. नंतर त्यांना तो देह सोडून परकायाप्रवेश करावयास लावणें सहजसाध्य नाहीं. भाषेला पोषाकाचीहि उपमा रूढ आहे ती घेऊन असें म्हणतां येईल कीं, विचार हा सुप्त मनाच्या रंगशाळेतून जागृत मनाच्या रंगभूमीवर येतो, तो भाषेचें नेपथ्य-विधान करूनच येतो आणि रंगभूमीवर येणारा नट साध्या पोषाकांत न येतां कृत्रिम पोषाकांत येणें हेंच जसें स्वाभाविक समजलें जातें तसें परभाषेच्या हरघडीं होणाऱ्या संस्कारामुळें परभाषेंत विचार सुचणें ही सुशिक्षिताची प्रकृति होऊन बसली आहे. ती बदलण्यास अर्थात् कष्ट पडतात. यामुळें परकीय बोध-भाषेच्या द्वारें अध्ययन केलेल्या सुशिक्षित वर्गाला अशिक्षित समाजाशीं समरस होणें व त्याला ज्ञानाचा फायदा देणें अवघड जातें.

## स्वाभिमानाची ज्योत

चौथें कारण हें कीं, राष्ट्राच्या सध्यांच्या पारतंत्र्याच्या अवस्थेंत स्वाभिमानाची ज्योत अखंड प्रज्वलित ठेवणें आवश्यक आहे व ती ज्या साधनांनीं प्रज्वलित राहते त्यांपैकीं मायभाषेचा अभिमान हें एक प्रमुख साधन होय. म्हणूनच

इंग्रजी भाषेशीं बव्हंशीं समरूप असूनहि आयरिश लोकांनीं आपल्या स्वतंत्र आयरिश भाषेचाच अभिमान धरला, व पृथ्वीच्या चारहि खंडांत विखरून गेलेल्या दुर्दैवी ज्यू लोकांनीं आपलीच स्वतंत्र भाषा जागविली. इतर हरएक बाबतींत पाश्चात्यांच्या पावलावर पाऊल टाकणाऱ्या जपाननें शेवटीं स्वभाषेचीच कास धरली आणि याच कारणाकरितां फिनलंड, हंगेरी, कानडा वगैरे ज्या देशांवर परकीय भाषेच्यापुढें मान लवविण्याचा प्रसंग आला त्या सर्वांनीं बाणेदारपणें तो टाळला.

मराठीची तरफदारी करण्यांत येते ती वरील मुद्द्यावर. पर्जन्यास्त्र सोडतांच मुसळधार पाऊस सुरू व्हावा तसें मराठीच्या धनुष्याला बोधभाषेचा बाण चढतांच अभिजात ग्रंथांचा वर्षाव सुरू होईल असल्या भोळसट कल्पनेनें नव्हे. मात्र बोधभाषा म्हणून वापरल्यानें मराठीच्या अभिवृद्धीस मदत खचित होईल आणि ती करणें आपलें कर्तव्यहि आहे.

आतां मराठी बोधभाषेच्या तर्फेचे मुद्दे डोळ्यांपुढें असतांहि कांहीं विचारवंत लोक इंग्रजीच बोधभाषा असावी असा आग्रह धरतात याचें कारण ते राष्ट्रीय आकांक्षेच्या विरुद्ध आहेत हें नव्हे. उलटपक्षीं स्वराष्ट्र व स्वभाषा हीं मान्यतेस चढावीं अशीच त्यांचीहि इच्छा. पण त्यांना भीति वाटत असावी ती ही कीं, स्वभाषेच्या अभिमानाला फाजील भरतें आल्यास पाश्चात्य भाषेबरोबर पाश्चात्य संस्कृतीचीहि पीछेहाट होईल व एकंदरीनें राष्ट्राचें अंतीं नुकसान होईल. या बाबतींत मराठीच्या पुरस्कर्त्यांनीं मोकळ्या मनानें अशी कबुली देण्यास हरकत नाहीं, कीं परकीय भाषा बोधभाषा म्हणून वापरण्याच्या आम्ही विरुद्ध असलों, तरी पाश्चात्य संस्कृतीचें आम्हांला वावडें नाहीं. पाश्चात्य संस्कृतींतील उत्तम भाग पचनीं पाडल्याशिवाय यापुढें कोणत्याहि राष्ट्राला जिवंतच राहतां येणार नाहीं. ज्या पौर्वात्य संस्कृतीचे लोक शतकानुशतकें परकीय दास्य निमूटपणें स्वीकारतात त्या संस्कृतींत गुणाच्या बरोबर दोषहि जबर उत्पन्न झाले असले पाहिजेत व ते पाश्चात्य संस्कृतींतील गुणानुकरणानें धुऊन काढले पाहिजेत हें एखाद्या आंधळ्यालाहि स्वच्छ दिसेल. पण पाश्चात्य ज्ञानाचें सेवन करावयाचें तें स्वभाषेच्या अनुपानांत केल्यानें स्वाभिमानाला पोषक होऊन पचनींहि चांगलें पडतें येवढाच मुद्दा. अर्थात् स्वभाषेच्या पुरस्कारानें पाश्चात्य ज्ञानास

विद्यार्थी पारखे होतील असल्या संशयी किंवा परप्रांतीय लोकांची गैरसोय होईल असल्या अवास्तव औदार्याच्या कल्पनांनीं घेरून जाऊन मराठीला यापुढेंहि इंग्रजी सासूच्या हाताखालींच राबविण्यास लावणें रास्त होणार नाहीं.

## उगवत्या पिढींतील गार्गी

शिक्षणक्षेत्रांत ज्या आणखी एका बाबीचा विचार करावा लागतो ती बाब स्त्रीशिक्षणाची होय. पुरुषांप्रमाणेंच स्त्रियांनाहि शिक्षणाची आवश्यकता आहे हें मूलभूत प्रमेय आतां सर्वमान्य झालेलें आहे. पण स्त्रियांचा शिक्षणक्रम हा पुरुषांच्या शिक्षणक्रमासारखाच तंतोतंत असावा कीं भिन्न असावा हा विषय अद्यापहि चर्चेच्या कक्षेंतच आहे.

स्त्रीशिक्षणाची कल्पना ही स्वातंत्र्याच्या कल्पनेबरोबरच पाश्चात्यांपासून आपण स्वीकारली आहे. खुद्द पाश्चात्यांमध्यें स्त्रीविषयक स्वातंत्र्य व समता या कल्पनांचा समाजाकडून सक्रिय पुरस्कार केला गेला तो १९१४–१८ च्या महायुद्धांत. या युद्धांत पुरुषवर्ग फार मोठ्या प्रमाणावर रणांगणावर गेल्यामुळें सामाजिक जीवनांतील अनेक कार्यक्षेत्रें स्त्रियांच्या हवालीं करण्यांत आलीं. त्यांनीं विविध क्षेत्रांत कामगिरीहि उत्तम केली. अनेक स्त्रियांनीं नोकरपेशा स्वीकारला आणि आर्थिक स्वातंत्र्य संपादन केलें; पण युद्धसमाप्ती-नंतर हा मनू पालटूं लागला. ज्या स्पर्धाक्षेत्रांतून पुरुषवर्ग युद्धामुळें निवृत्त झाला होता त्यांत तो पुन्हा अवतीर्ण झाला आणि मग त्याच्याशीं स्पर्धेंत टिकणें स्त्रियांना कठीण होऊं लागलें. मध्यम स्थितींतील स्त्रियांच्या बाबतींत ही स्थिति इतकी भडकली कीं पांच वर्षांपूर्वी लिहिलेल्या Future of Morals या या पुस्तकांत जोड या ग्रंथकारानें लिहिलें आहे कीं लंडन येथील सुशिक्षित बेकार स्त्रियांची शिरगणती केली तेव्हां असें आढळून आलें कीं या बेकार स्त्रियांची संख्या एकट्या लंडनमध्येंच पस्तीस हजारांवर आहे! यांपैकीं पुष्कळ स्त्रिया विवाहाचा विषय काढला कीं विवाह करणें म्हणजे दुसऱ्याची बटीक होणें होय असें म्हणून मोठ्या ठसक्यानें पूर्वी नाकें मुरडत असत; पण आतां बेकारीची आंच भाजूं लागल्यामुळें विवाह करून पुनश्च चुलीपुढें बसून भाकऱ्या भाजणें कांहीं अगदींच वावगें नाहीं असें त्या म्हणूं लागल्या आहेत असेंहि त्याच ग्रंथकारानें लिहिलें आहे.

हीच स्थिति आपल्याकडेहि आज ना उद्यां अवतरल्याशिवाय राहणार नाहीं. शाळा कॉलेजांतील मुलींची वाढती संख्या व त्यांच्यापैकीं पुष्कळांच्या डोक्यांत घोळणारी आर्थिक स्वातंत्र्याची म्हणजे नोकरीची कल्पना लक्षांत घेतां बेकार तरुणांप्रमाणें बेकार तरुणींचाहि प्रश्न समाजापुढें थोड्याच कालवधींत उभा राहिल्याशिवाय राहणार नाहीं. तो टाळावयाचा असेल तर स्त्रियांच्या आर्थिक स्वातंत्र्याचा हक्क मान्य करूनहि पुरुषांचीं व स्त्रियांचीं कार्यक्षेत्रें भिन्न राखण्याच्या इष्टानिष्टतेचा विचार होणें आवश्यक आहे.

वरील मुद्द्यावर आणि स्त्री-पुरुषांतील निसर्गसिद्ध भेदाच्या मुद्द्यावरहि स्त्री-पुरुषांचे शिक्षणक्रम भिन्न असावेत असें प्रतिपादन करणाऱ्या शिक्षण-तज्ज्ञांचें मत समजून घेणें आवश्यक आहे.

स्त्रियांच्या शिक्षणाचें ध्येय, पद्धति व अभ्यासक्रम हीं पुरुषांच्या शिक्षणापेक्षां भिन्न असावीं व हें साध्य होण्याकरितां प्रो. कर्वे यांच्या विद्यापीठाच्या धर्तीवर स्त्रियांकरितां स्वतंत्र अशीं विद्यापीठें असावींत अशीं मतें पाश्चात्यांतच प्रकट केलीं जात आहेत. त्याला एक कारण म्हणजे स्त्री-पुरुषांमधील शारीरिक, मानसिक व सामाजिक भेद लक्षांत घेऊन स्त्री-पुरुषांना दोघांनाहि पोषक होतील असे विविध विषय सध्यांच्या पुरुषी विद्यापीठाच्या कार्यक्रमांत समाविष्ट नाहीत. दुसरें कारण म्हणजे असे विषय उद्यां समाविष्ट झाले तरी स्त्री-पुरुषांनीं यौवनदशेंत एकत्र शिक्षण घेणें इष्ट आहे का याविषयीं संशय. सह-शिक्षणाचा प्रयोग अमेरिकेंत फार मोठ्या प्रमाणावर होत आहे; पण तेथील विवाहित जोडप्यांचें नैतिक वर्तन वर्णावयाचें म्हणजे त्यांतील शेंकडा ऐंशी ते नव्वद वधूवरांनीं विवाहापूर्वीच वैवाहिक सुख अनुभविलेलें असतें आणि याची जबाबदारी इतर गोष्टींबरोबर सहशिक्षणाच्या माथीं येते असें कांहीं अमेरिकन ग्रंथकारांचें मत आहे.

नवथर मुलामुलींच्या गुन्हेगारीची चौकशी करणारे न्यायाधीश लिंडसे यांचीच या बाबतींत अशी साक्ष आहे कीं, त्यांनीं १९२०–२१ सालीं वैषयिक गुन्ह्याबद्दल ७६९ मुलींचा इन्साफ केला. त्यांत ६०८ मुली शाळेंत शिकणाऱ्या होत्या. प्रत्यक्ष अनैतिक आचरणाबरोबरच सदर शिक्षणाचा दुसरा एक परिणाम म्हणजे मानवी मनांतील अनुकरणप्रेरणेनें मुलींना मुलांसारखे

पुरुषी व्हावें असें वाटतें, व मुलांना बायकी चाळे सुचूं लागतात. याचा अप्रत्यक्ष परिणाम म्हणजे एकमेकांविषयीं वाटणारें गूढ आकर्षण नष्ट होऊन वैवाहिक जीवनाबद्दलची आतुरता नष्ट होते. यामुळें सहशिक्षण घातुक होय असा कांहींचा अभिप्राय आहे.

## स्त्रीपुरुषांतील नैसर्गिक भेद

मुलींना मुलांच्याबरोबर शिक्षण देणें जसें अनिष्ट होय त्याप्रमाणेंच मुलांचा अभ्यासक्रमच मुलींना अभ्यासावयास लावणें हेंहि अनिष्ट होय. कारण स्त्री व पुरुष यांत शारीरिक, मानसिक बाबतींत महत्त्वाचा फरक आहे असें कांहीं शास्त्रज्ञांचें मत आहे. स्त्रियांचें रक्त हें पुरुषांच्यापेक्षां अधिक पातळ असतें. त्यांत रक्तकण कमी असतात. त्याचें विशिष्ट गुरुत्व कमी असतें. त्यांच्या स्नायूंचें एकंदर वजन पुरुषांच्यापेक्षां कमी असतें. त्यांच्या आंतरग्रंथींचें कार्य भिन्न असतें. शीर्षमज्जासंस्थेपेक्षां पृष्ठसंस्था अधिक प्रभावी असते. शरीराच्या विकासाची वयोमर्यादा भिन्न असतात. गर्भारपणीं व बाळंतपणीं उपयोगी पडण्याजोगी सुप्त शक्ति स्त्रीच्या ठायीं मोठ्या प्रमाणांत असते. पुरुषी शिक्षणांतील परीक्षांचा काच व बौद्धिक विषयांच्या प्राधान्यामुळें मेंदूवर पडणारा ताण यामुळें ही सुप्त शक्ति अनाठायीं वेचिली गेल्यास स्त्रियांचें मुख्य कार्य जें मातृपद तें पार पाडण्यास त्या कमजोर ठरतील असें तज्ज्ञांचें मत आहे. १४ ते १९ ही वयोमर्यादा स्त्रीच्या शारीरिक विकासांतील महत्त्वाची होय. या वेळीं ती शाळेंत शिक्षण घेत असल्यास तें शिक्षण या शारीरिक विकासाला खुरटविणार नाहीं असें असलें पाहिजे. स्त्रियांच्या आवडीनिवडींत व मनःप्रवृत्तींतहि फरक दिसून येतो. स्त्रियांची आवड ही निसर्गतःच सुंदर, व्यावहारिक व सिद्ध वस्तूकडे असून पुरुषांची उपयुक्त, तात्त्विक व वर्धमान वस्तूंकडे असते. स्त्रियांना ललितकला आवडतात तर पुरुषांना तर्कशास्त्र आवडतें. स्त्रियांच्या अंगीं स्वभावतःच शुश्रूषा-प्रेम दिसून येतें तर पुरुषांत धाडसी प्रवृत्ति उपजतच आढळून येतें. आज शतकानुशतकें स्त्री व पुरुष यांच्या ठायीं भिन्नभिन्न गुणांचा हा विकास चालू आहे, आणि समाजाला दोघांच्याहि गुणांची सारखीच जरूरी असल्यानें या भिन्नाभिन्न गुणांचा परिपोष होईल असेंच भिन्न शिक्षण स्त्रियांना व पुरुषांना देणें योग्य होय.

## कुटुंब-संस्थेवर परिणाम

येथें अशी शंका येईल कीं, स्त्रीपुरुषांमधील वरील प्रकारचे भिन्न गुण दिसत असतांहि व समाजाच्या प्रगतीला दोनहि गुणांच्या विकासाची सारखीच जरूरी आहे हें मान्य असतांहि स्त्री-पुरुषांचा एकाच प्रकारचें शिक्षण घेण्याकडे जो ओढा दिसून येतो तो कां? याचें उत्तर नव्या मनूंतील समतेची कल्पना हें होय. समतेच्या कल्पनेंत आर्थिक समता ही मुख्य असल्यानें पुरुषाप्रमाणें आपणहि नोकरीधंदा करून स्वावलंबी व्हावें अशी प्रवृत्ति अलीकडील स्त्रियांत उत्पन्न होत आहे. गृहिणी म्हणून गृहांत स्त्रियांना कितीहि मान असला तरी त्यांना आर्थिक स्वातंत्र्य शतकानुशतकें मिळालेलें नाहीं हें खोटें नव्हे. या आर्थिक दास्याविरुद्ध सध्यांची स्वतंत्र नोकरीधंदा करण्याची प्रवृत्ति ही प्रतिक्रिया होय. पण या प्रतिक्रियेचा एक आगंतुक परिणाम असा होतो कीं, स्वातंत्र्याच्या अवास्तव कल्पनांमुळें विवाहानें स्वतः बांधून न घेण्याविषयीं प्रवृत्ति उत्पन्न होते. ही प्रवृत्ति जारी झाल्यास समाजाच्या स्थैर्याचा व अभिवृद्धीचा पायाच भंगेल व कालांतरानें समाज मृत्युपंथास लागेल कीं काय, अशा प्रकारची कांहींशी भीति पाश्चात्य समाजांत कोठें कोठें व्यक्त केली जात आहे. गृहस्थाश्रमाच्या शिस्त व बंधनाला कंटाळून अविवाहित राहण्याची प्रवृत्ति वाढत आहे. ही प्रवृत्ति अनैसर्गिक आहे. याचें एक प्रत्यंतर म्हणजे एकट्या अमेरिकेंतच दरवर्षी अडीच लाख गर्भपात केले जातात असें म्हणतात हें होय.

## सुगृहिणी व सुमाता

वैवाहिक बंधन स्वीकारलें तर मुलें फार होऊं न देण्याविषयीं खबरदारी घेण्यांत येते. डॉ. कॅटले लिहितो कीं, "एकदोन मुलांचें कुटुंब हें इंग्लंड व अमेरिका येथें आदर्श कुटुंब समजलें जातें. विद्यमान शास्त्रज्ञांच्या कुटुंबाकडे पाहिलें तर शेंकडा २२ कुटुंबें निपुत्रिक आढळतात आणि ज्यांच्या कुटुंबांत सहाच्यावर माणसें आहेत असें कुटुंब पंचाहत्तरांत एक सापडतें. आजची लोकसंख्या कायम राहावयाची असल्यास प्रत्येक दांपत्यास चार मुलें तरी झालीं पाहिजेत. पण आजच्या पाश्चात्य सुशिक्षित स्त्रियांना सामान्यतः दोनहि मुलें नसतात अशी आपत्ति येत चालली आहे. शिक्षणामुळें विवाहाची वयो-

मर्यादा ही भलतीच वाढते व त्याचाहि संततीवर अनिष्ट परिणाम होतो." या सर्व गोष्टी लक्षांत घेऊन हालफर्ड नांवाच्या लेखकानें लिहिलें आहे कीं, सुशिक्षित स्त्रियांच्या प्रस्तुतच्या स्वातंत्र्याच्या मिथ्या कल्पना अशाच कायम राहिल्यास इंग्लंड व अमेरिका येथील सुशिक्षित वर्गच तीन पिढ्यांत समूळ नष्ट होऊन जाईल!

मग स्त्रियांना शिक्षण देणेंच बंद करावयाचें कीं काय? कोण करंटा असें प्रतिपादन करील? मानवी संस्कृतीनें आजवर जें ज्ञानभांडार जमविलें आहे तें खोलण्याची शिक्षण ही किल्ली होय. ह्या भांडारावर सर्वांचा सामुदायिक हक्क असल्यानें त्याची किल्ली हस्तगत करण्याचा प्रत्येकाचा हक्क जन्मसिद्धच आहे. अर्थात् स्त्रियांपासून हा हक्क कोण हिरावून घेणार? पण शिक्षणानें वैवाहिक बंधनाविषयीं अरुचि उत्पन्न झाली तर? याचें उत्तर असें कीं, स्त्रियांना शिक्षण तर द्यावयाचें पण तें पुरुषी थाटाचें म्हणजे केवळ नोकरीधंद्याला पोषक असें न देतां स्त्रियांच्या ठिकाणीं निसर्गतःच आढळून येणारे जे वात्सल्य, संगोपन-प्रेम वगैरे गुण ते विकसित होऊन त्या उत्तम गृहिणी व माता होतील असे द्यावें.

ह्या प्रतिपादनाचा विचार करीत असतां जो एक प्रश्न अनेक वेळां मनापुढें उभा राहतो तो प्रश्न असा कीं, स्त्रियांचा अभ्यासक्रम निराळा आंखल्यानें किंवा त्यांच्याकरितां स्थापिलेल्या स्वतंत्र संस्थांतून शिक्षण दिल्यानें स्त्रियांच्यांत आज दिसून येणारी आर्थिक स्वातंत्र्यलालसा नष्ट होईल काय? ती नष्ट होईलसें म्हणवत नाहीं. शिक्षणानें स्त्रिया स्वतंत्र रीतीनें विचार करूं लागल्या असतां आजच्या वैवाहिक स्थितींतील आर्थिक परावलंबितेचा विचार त्या करणार नाहींत किंवा विचार करूनहि हें परावलंबित्व केवळ मातृत्वाच्या तात्त्विक गौरवार्थ स्वीकारण्यास त्या कबूल होतील असें मानणें मनुष्यस्वभावास सोडून होईलसें वाटतें. याज्ञवल्क्याची सुशिक्षित स्त्री गार्गी नवऱ्यास ब्रह्मज्ञानाविषयीं जेव्हां प्रश्न विचारूं लागली तेव्हां तिनें प्रश्नांची अशी झोड उडविली कीं, शेवटीं 'आतां अधिक विचारशील तर तुझें मस्तक तुटून पडेल' अशा त्राग्याच्या उत्तरानें याज्ञवल्क्यास तिचें तोंड बंद करावें लागलें. अर्थात् हा प्रश्न नुसता शिक्षणशास्त्रज्ञांचा नसून ज्या समाजव्यवस्थे-

विषयीं शिक्षणानें अनुकूल मनोभूमि तयार करावयाची असते त्या समाज-व्यवस्थेचा अभ्यास करणाऱ्या समाजशास्त्रज्ञांचा आहे. एक तर पाश्चात्यांतील स्त्रीशिक्षणाचे दुष्परिणाम अवलोकन करून स्त्रियांना शिक्षण देण्याचेंच अजीबात बंद करून स्त्री ही पुरुषाच्या नेहमींच अंकित राहील अशी जुनी व्यवस्था पुनश्च रूढ करावी असें तरी स्पष्टपणें प्रतिपादलें पाहिजे. किंवा स्त्रियांचें स्वातंत्र्यप्रेम हें न्याय्य व योग्य समजून आजच्या कुटुंब-व्यवस्थेची अशी पुनर्घटना केली पाहिजे कीं, तींत आज स्त्रियांना बोचक वाटणारें आर्थिक परावलंबित्वाचें शल्य नष्ट होईल. दुसरा मार्गच श्रेयस्कर नाहीं का ?

## उपसंहार

वरील गोष्टी शिक्षणांत उतरावयाच्या म्हणजे शिक्षणक्रमांत कांहीं एक नियोजना आंखली गेली पाहिजे. आजच्या रूढ शिक्षणक्रमांत कोणत्याच प्रकारची योजना नाहीं, दृष्टि नाहीं, हाच तिचा मुख्य दोष होय. भावी उदयोन्मुख पिढीला जे कोणते प्रश्न सोडवावे लागतील त्यांचें सम्यग्ज्ञान जेणेकरून होईल व तें सोडविण्याची धमक जेणेंकरून तिच्यांत उत्पन्न होईल अशी योजना केली पाहिजे. वर्धा-शिक्षण-योजना ही विशिष्ट दृष्टि ठेवून आंखलेली योजना या नात्यानें अशा प्रकारची पहिलीच होय. ती प्रत्यक्ष अमलांत आली म्हणजे आजच्या विस्कळित शिक्षण-पद्धतीला कांहीं दिशा लागेल. वर्धा-योजनेंत पुस्तकी ज्ञानाच्या जोडीला औद्योगिक ज्ञानाची जोड देण्यांत आली आहे, त्यामुळें उद्योग-धंद्यांचें महत्त्व विद्यार्थ्यांच्या मनांवर बिंबण्यास मदत होईल; मात्र त्यानें बेकारीचा किंवा औद्योगिक उन्नतीचा प्रश्न सुटावयाच्या मार्गास लागेल अशी भाबडी आशा बाळगणें चुकीचें ठरेल. अर्थात् हा दोष त्या योजनेचा नव्हे, तर उद्योग-धंद्यांचा प्रश्न हा शिक्षण संस्थांच्या कक्षेबाहेरचा असतो या परिस्थितीचा होय. शिक्षण-संस्थांत फक्त उद्योग-धंद्यांविषयीं आवड उत्पन्न करतां येईल आणि तशी ती करणें हें आवश्यक होय. नवीन योजनेंत क्रमिक पुस्तकें स्वाभिमानास पोषक अशींच लिहिलीं जातील याविषयीं खात्री बाळगण्यास हरकत नाहीं. मात्र कोण्या जातीच्या लाडावलेल्या नाजूक भावना दुखावल्या जातील या हळव्या भीतीनें इतिहासाची स्फूर्तिकारक अशीं कांहीं

पानें गाळलीं जाणार नाहींत याविषयीं जागरूकता जागविली पाहिजे. मातृभाषेस योग्य तें मानाचें स्थान देणें आणि स्त्रियांच्या शिक्षणाला आर्थिक स्वातंत्र्य तर लाभेल, पण पुरुष-वर्गाशीं स्पर्धा टळेल असें वळण देणें या गोष्टीकडेहि योग्य तें लक्ष पुरविलें जाईलच. शारीरिक शिक्षणाला महत्त्वाचें स्थान शिक्षणक्रमांत कायमचेंच राहील; पण जगांतील इतर बलाढ्य राष्ट्रांनीं शस्त्रसंन्यास जोंवर अमलांत आणला नाहीं तोंवर हिंदुस्थानला लष्करी विद्येची उपासना करणेंहि अपरिहार्य ठरेल. या दृष्टीनें विद्यार्थ्यांच्या पुढें राष्ट्रीय ध्येय मांडावयाचें तें हें कीं, हिंदुस्थानला इतर कोणावरहि आक्रमण करण्याची महत्त्वाकांक्षा नाहीं. परक्याच्या स्वातंत्र्याचा अपहार करणें हें तो पाप लेखतो, पण त्याच नात्यानें इतर कोणी आपल्या स्वातंत्र्याचा अपहार करूं पाहील तर त्याचा आज जगभर वहिवाटलेल्या सर्व उपायांनीं प्रतिकार करणें हें तो आपलें कर्तव्य समजेल. स्वातंत्र्याचें हेंच तत्त्व राष्ट्रांतील अन्तर्गत कारभारास लावून परजातीविषयीं द्वेष वा मत्सर बाळगणें किंवा जातीजातींत उच्च-नीचपणाची भावना स्वीकारणें हेंहि तो पाप समजेल. राष्ट्राचीं ध्येयें आणि शिक्षणाचीं ध्येयें हीं एकरूप होत. म्हणून राष्ट्रीय शिक्षणाचा विचार करणें हें पर्यायानें राष्ट्राच्या पुनर्घटनेचा विचार करणेंच होय.

---

— १३ —

# चंचल नीतिमत्तेंतील अचल घटक



कांहीं कांहीं कल्पनांना आणि त्या व्यक्त करणाऱ्या शब्दांना एकेकाळीं मोठें विलक्षण तेज येत असतें. आजच्या काळची अशीच एक सर्व विचार-क्षेत्रांत विद्युल्लतेप्रमाणें डोळे दिपवून टाकणारी, लकलकणारी कल्पना म्हणजे **क्रान्ति** ही होय. ह्या कल्पनेनें व ह्या शब्दानें आजचें सर्व वैचारिक वातावरण आणि वाङ्मय नुसतें भारून गेलेलें आहे. आजच्या युगाच्या ध्वजावर कोणता एकच शब्द तळपणाऱ्या अक्षरांत लिहिलेला असेल, तर तो क्रान्ति हा होय. जगांत शाश्वत असा विचार नाहीं, सनातन अशी भावना नाहीं, अपरिवर्तनीय असें निष्ठास्थान नाहीं, अमर असें नैतिक मूल्य नाहीं; अशा प्रकारच्या विचारसरणीच्या लाटांनीं वाङ्मयसागर आमूलाग्र ढवळून निघाला आहे. किंबहुना अंतःसृष्टींतील, बहिःसृष्टींतील, समाजसृष्टींतील, कोणतीहि गोष्ट स्थिर नसून परिवर्तनाच्या भोवऱ्यांत सापडलेली आहे याची जाणीव तीव्रपणें होणें हीच या नव्या मनूंतील वैचारिक क्षेत्रांतील अत्यंत श्रेष्ठ आणि मौलिक अशी देणगी होय असें मानण्यांत येऊं लागलें आहे.

ही विचारसरणी हा आजच्या शास्त्रीय युगाचा परिपाक होय. शास्त्रज्ञांनीं अणूपेक्षांहि अणु असे सूक्ष्म पदार्थ पाहण्याचें सूक्ष्मदर्शक यंत्र आणि दृष्टीच्या पल्ल्याच्या अनंत पटींनीं लांब असणारे पदार्थ दिसण्यासाठीं दूरदर्शक यंत्र या साधनांचा शोध लावून आपल्या निरीक्षणाचा व्याप वाढविला आहे. तसाच शास्त्रीय साधनांनीं सुसज्ज झालेल्या आधुनिक समाजशास्त्रज्ञांनींही आपला व्याप विस्तारला आहे. पृथ्वीतलावर चारी खंडांत पसरलेल्या व समुद्रांत इतस्ततः विखुरलेल्या लहानसहान बेटांवर वस्ती करणाऱ्या मानवी समाजाची, इतकेंच नव्हे तर कालाच्या उदरांत कित्येक शतकांपूर्वी किंवा सहस्रकांपूर्वी गडप होऊन नामशेषहि न राहिलेल्या अशा मानवी जातींच्या इतिहासाची, हजारों वर्षांवर पसरलेल्या इतिहासाची, एवढी प्रचंड सामुग्री त्यांनीं गोळा केली

आहे कीं, या सामुग्रीच्या दुर्बिणींतून पाहूं गेलें असतांना मानवी इतिहासाचा चित्रपट मागें उलगडत जातां जातां, हजारों वर्षेपर्यंत उलगडत चाललेला आपल्याला न्याहाळतां येऊं लागला आहे. या हजारों वर्षांच्या प्रदीर्घ कालखंडांत आणि पृथ्वीतलावर एकमेकांपासून हजारों मैल दूर वसत असलेल्या अनेक देशांत मिळून समाजरचनेच्या नियमांचे म्हणजेच नीतिमत्तेचे कैक प्रयोग होऊन गेलेले आहेत.

या प्रयोगांचा अभ्यास बरवर करणाऱ्याच्या मनावर अगदीं पहिला ठसा कोणता उमटत असेल तर तो हाच, कीं समाजरचनेचे शाश्वत नियम, धर्माचीं सनातन तत्त्वें, नीतीची मौलिक मूल्यें म्हणून जी आपण आजवर समजत होतों तें आपलें केवळ अज्ञान होतें. हा अभ्यासू पापभीरु असेल तर वैतागानें असेंहि म्हणेल, कीं ही ज्ञानाची नवीन दृष्टि प्राप्त होण्यापेक्षा आंधळेंच राहिलेलें काय वाईट? ज्ञानवृक्षाची फळें खाल्ल्यामुळेच आद्यमानव आदाम याचा अधःपात झाला असेंच ख्रिस्ती बायबलांत वर्णन आहे. ज्याला ही कल्पना सुचली त्याला-हि वरील पापभीरु अभ्यासकासारखेच सत्याच्या प्रखर तेजाकडे डोळे उघडून पाहण्याचें धैर्य नसावे. पण शास्त्रीय दृष्टीनें या सामाजिक चित्रपटाकडे पाहणाराला असें दिसूं लागेल कीं, पर्वताप्रमाणें अचल अशा ज्या नियमांना आपण मानत होतों ते खरोखर तसे अचल नव्हत. पर्वतांनाहि पूर्वी पंख होते आणि ते स्थलांतर करीत असत असें पुराणांत वर्णन आहे. तीच स्थिति आपण अचल म्हणून समजत असलेल्या नीतिनियमांची असावी!

## पातिव्रत्याची बदलती कल्पना

नैतिक मूल्यांच्या उलथापालथींतील मनाला विजेचा झटका देणारें असें कोणतें उदाहरण असेल तर समाजधारणेंतील एक अत्यंत प्रभावी म्हणून गणलें गेलेलें जें पातिव्रत्य, तद्विषयक मूल्याचें होय. पातिव्रत्य हें एक समाजधारणेचें पायाभूत तत्त्व होय, कीं जें चिराळलें असतां समाजाचा इमलाच कोसळून पडेल अशी शिकवण अनेक ग्रंथांतून उद्घोपित झालेली आहे. अशा या बावनकशी अस्सल मानल्या गेलेल्या तत्त्वानेंहि स्थलकालाप्रमाणें, विसदृश रूपें धारण केलेली आढळली तर सनातनीय वृत्तीला भोंवळ न आली तरच नवल. पण भोंवळ आली म्हणून ऐतिहासिक सत्य थोडेंच त्याची कदर बाळगणार? तें अशीच माहिती

पुरवील, कीं अतिथि-अभ्यागताला संतुष्ट करण्याकरितां ज्या अनेक मूल्यवान देणग्या अर्पण करावयाच्या असत, त्यांत स्वभार्येला अर्पण करण्याची चाल अनेक देशांत होती. ग्रीस देशामध्यें तद्देशीय संतश्रेष्ठ जो सॉक्रेटीस याच्या काळीं ही चाल सर्रास होती. तशाच प्रकारची चाल भरतखंडांतहि एकेकाळीं रूढ असावी असें मत्स्यपुराणांतील उल्लेखावरून दिसून येईल. एवढ्या एकाच गोष्टीचा निर्देश केला तरी समाजाच्या पायाभूत म्हणून समजलें गेलेलें जें पातिव्रत्य त्याच्या कल्पनेंतहि कालांतरानें केवढें महदंतर पडलेलें आहे हें लक्षांत येईल.

वैचारिक क्रान्तीची ही कल्पना मूळ अवतीर्ण झाली ती भौतिक शास्त्रांच्या क्षेत्रांत; आणि मग तेथून ती सर्व क्षेत्रांत वावरूं लागली. भौतिक शास्त्रांत गेल्या शें-दीडशें वर्षांत लागलेले कांहीं शोध खरोखरच इतके विलक्षण व क्रान्तिकारक आहेत की, त्यांकडे कोणीहि डोळे चोळूनच पाहावें. पाण्यांत बुडणें किंवा हवेत तरंगणें ह्या गोष्टी ज्या केवळ कविकल्पनेंत होत्या, त्या शास्त्रज्ञानें आतां प्रत्यक्ष व्यवहारांत उतरवून दाखविल्या आहेत. असल्या अशक्य वाटणाऱ्या गोष्टी शक्याच्या कोटींत प्रत्यक्षच उतरल्यावर एकंदर विचाराच्या पद्धतीवरच आघात व्हावा यांत आश्चर्य कोणतें ! त्या शोधामुळें कधींकाळीं कपिलाषष्ठीच्या वेळीं उपयोजिला जाणारा क्रान्ति हा शब्द आजच्या व्यवहारांत सराइताप्रमाणें स्थायिक होऊन बसला आहे. तो इतका कीं, कोणताहि नवीन शोध आज लागला, कीं त्याचें नामकरण क्रान्तिकारक या ठरीव ठशाच्या लाल भडक शब्दांनींच केलें जातें. रोज सकाळीं उठून वर्तमानपत्र पाहावें तों कुठल्या तरी शास्त्रांत एकादा नवीन शोध लागल्याची नोंद दृष्टीस पडते, आणि त्याचें वर्णन केलेलें असतें तें असें कीं त्या धंद्यांत वा शास्त्रांत या शोधानें विलक्षण क्रान्ति घडून येणार आहे, व त्या धंद्यांतील आणि शास्त्रांतील पूर्वीच्या कल्पना साफ बदलणार आहेत म्हणून !

नित्य नव्या लागणाऱ्या शोधांनीं कल्पनांची उलथापालथ अशी हरघडीला होऊं लागल्यास विचाराला बंधनच नाहींसें होऊन दावें तोडून पळालेल्या आणि वारा प्यालेल्या खोंडाप्रमाणें त्याची गति होईल. असा प्रकार खरोखरच घडून येईल तर समाजधुरीणांच्या हातीं असलेलें सुकाणूंच मोडून पडेल, आणि वादळी वाऱ्यांत सापडलेल्या नौकेप्रमाणें समाजाला आचरणाची कोणतीच

दिशा त्यांना दाखवितां येत नाहींशी होईल पण ही स्थिति केवळ काल्पनिक आहे हें कुणाहि सुज्ञास सांगावयास नको. विचाराची अशी रोज उलथा-पालथ होईल तर विचारसरणी आणि शास्त्रीयपणा या शब्दांना अर्थच नाहींसा होईल. प्रस्तुत आपणास नीतिकल्पनांतील म्हणजेच समाजधारणा व समाजप्रगति यांच्या तत्त्वज्ञानांतील कल्पनांमध्यें होणाऱ्या फरकांचा विचार कर्तव्य आहे. याहि क्षेत्रांत कोणतीच कल्पना स्थिर झालेली नसेल, वरवर बदलणाऱ्या नीतिकल्पनांतून सर्वत्र अनुस्यूत असणारा असा विचाराचा एखादा विलग धागाहि आढळत नसेल, तर नीतितत्त्वांची शास्त्रीय विचार करण्याची कल्पनाच सोडून द्यावी लागेल.

## आचारांतील उलटापालट

अमूर्त नीति कल्पनांना मूर्त स्वरूप दिलें जातें तें आचारात्मक धर्मांत. हा आचारधर्म बदलत आलेला आहे ही जाणीव आजची नसून फार प्राचीन आहे. ॥ **दृष्टोधर्मव्यतिक्रमः साहसं च पूर्वेषाम्** ॥ अशा प्रकारचीं वचनें स्मृति-ग्रंथांतून अनेक ठिकाणीं आढळतात. तसेंच स्मृतिग्रंथांतील सर्व कलीवर्ज्य प्रकरण म्हणजे बदललेल्या आचारविचारांचें मुद्दाम भरविलेलें जगूं संमेलनच. या फेर-बदलाकडे पाहण्याची प्राचीनांची दृष्टि आजच्याहून वेगळी होती. पण फेरबदल होत होता याची जाणीव त्यांना स्पष्ट होती इतकेंच नव्हे, तर बदलत्या परिस्थितीनुरूप योग्य ते फेरबदल ते सुचवीतहि होते. या सर्व फेरबदलांतून समाजधारणेविषयीं आणि प्रगतीविषयीं, ध्येयात्मक अशा प्रकारच्या कांहीं थोडया कल्पना का होईनात पण तगून राहिल्या नसतील तर प्राचीनांच्या मतें युगऱ्हास व अर्वाचीनांच्या मतें युगविकास या दोन्ही कल्पनांच्या तळाशीं असलेलें वैचारिक अधिष्ठानच भंगून जाइल. कारण समाजधारणेच्या म्हणजेच नीतिमत्तेच्या तत्त्वाची कांहीं आदर्शभूत कल्पना गृहीत धरली तरच एखाद्या कालच्या नीतिमत्तेचा ऱ्हास होतो आहे अथवा विकास होतो आहे असें विधान करतां येइल. नीतिमत्ता हा शब्द प्रस्तुत सर्वत्र समाजधारणात्मक नीतिमत्ता या अर्थी योजिलेला आहे हें येथेंच सांगून टाकलेलें बरें.

ज्या आजच्या काळांत क्रान्ति हा शब्द सर्वांच्या जिभेवर नाचतो आहे, त्याच काळांत प्रगति या शब्दानेंहि तेथेंच नाचावें हें आश्चर्य नव्हे काय? क्रान्ति

आणि प्रगति या दोन्ही कल्पना कांहींशा विसंगत नाहींत का? प्रगति म्हणजे एकापुढें दुसरें पाऊल, त्याच्यापुढें तिसरें अशी कांहीं एका दिशेनें होणारी गति; आणि क्रान्ति म्हणजे उलट दिशा! आतां कोणतीच कल्पना स्थिर टिकत नसल्यास आणि रोज दिशा बदलत जाणार असल्यास, प्रवासी शेवटीं जाणार कोठे हेंच सागतां येत नाहींसें होइल. पण अशा प्रवाशाला आपण ध्येयरूपी मुक्कामाच्या जवळजवळ जात चाललों आहोंत, म्हणजेच आपली प्रगति होत आहे असें कधी म्हणतां येईल का? प्रगति म्हणजे विशिष्ट दिशेनें गति. दिशाच जर निश्चित नसेल तर प्रगति, परागति, अनुगति, असल्या शब्दांना कांहीं अर्थच उरणार नाही. पण क्रान्तीइतकाच प्रगति हा शब्दहि सर्रास रूढ होऊन बसला आहे. या शब्दाच्या पाठीशीं असलेली कल्पना खरी असेल तर, समाजधारणेच्या कल्पना बदलत आल्या असल्या तरी, कांहीं एका दिशेनें त्या बदलत आल्या असल्या पाहिजेत असेंच गृहीत धरल्यासारखें होत नाहीं काय? समाजाच्या इतिहासाचा हजारों वर्षांचा कालखंड घेतला असतांना समाजाच्या घटनेंत आणि समाजाच्या कल्पनांत अनेक स्थित्यंतरें, अनेक परिवर्तनें, अनेक अवस्थांतरें घडून आलेलीं आहेत. नुसतीं वैचारिक स्थित्यंतरें घेतलीं तरी या स्थित्यंतराच्या तीन महत्त्वाच्या अवस्था आधुनिक. समाजशास्त्राचा जनक, कोम्ट यानें वर्णन केलेल्या आहेत. धार्मिक आध्यात्मिक आणि शास्त्रीय या सर्वांस परिचित आहेत, पण या अवस्था कांहीं एका दिशेनें बदलत आल्या आहेत कीं नाहीं?

## क्रांति विरुद्ध प्रगति

कोणी म्हणेल कीं प्रगति आणि क्रान्ति या कल्पना एकत्र नांदू शकतच नाहींत असें कां समजावें? समाजरचनेचे प्रयोग चालू असतांना कांहीं प्रयोग अजीबात फसल्यावर त्याच्या सर्वस्वीं विरुद्ध असे प्रयोग जर करण्यांत आले असले तर त्यांना क्रान्तिकारक म्हणावयास काय हरकत? एका दिशेनें वाट चालून पाहिल्यानंतर आपण भलतीकडेच आलों असें आढळून आलें तर आपण काय करतों तर चाललेली वाट सोडून देऊन पुन्हा सर्वस्वीं उलट्या दिशेनें जाण्याचा प्रयत्न करतों. या ठिकाणीं आपण क्रान्ति केली असेंच म्हटलें पाहिजे. अशा रीतीनें अनेक दिशांनी जाऊन पाहिल्यानंतर शेवटीं जरी

खरा मार्ग सापडला तरी एकंदरींत या प्रगतीच्याच अवस्था गणल्या गेल्या पाहिजेत. निरानिराळ्या दिशेनें जाऊन पाहिल्यामुळें आपली गति सुसूत्र आणि एकमार्गी दिसली नाहीं तर न दिसो; पण खरी वाट सापडेपर्यंत निरनिराळ्या मार्गांनीं जाऊन पाहणे ही खरी वाट सापडण्याच्या प्राथमिक व आवश्यक अवस्था होत. त्या दृष्टीनें पाहिलें असतां प्रगतीच्या पोटांत क्रान्तीचा समावेश होण्यास कांहींच हरकत नाहीं. एक मार्ग चुकला असें समजून आल्यानंतर तो अजीबात सोडून देऊन, उलट मार्गास प्रारंभ केला म्हणजे, त्या क्षणीं क्रान्ति झाली असें मानावे, व अशा अनेक चुकीच्या मार्गांनीं चांचपडत गेल्यानंतरच जर शेवटीं खरा मार्ग सापडायचा असेल तर या मार्गावरून धडपड करीत असतांहि, अंतीं प्रगतीच्या मार्गावरच चाललों आहोंत असें म्हणावें लागेल.

मग क्रान्ति आणि प्रगति यांत विरोध तो कोठें उरला? वरील विचार-सरणीच्या दृष्टीनें पाहूं गेलें असतां विरोध विरून गेल्यासारखा दिसतो खरा! पण थोडें अधिक खोलांत शिरले असतां या विरोधाचें अंतःस्वरूप उघड होऊं लागतें. पहिला प्रयोग चुकून दुसरा प्रयोग करूं लागलों ती क्रान्ति, आणि यशस्वी होण्याच्या मार्गाला लागलेला प्रयोग ती प्रगति, असें जें वर म्हटलें त्यांत जी एक गोष्ट अध्याहृत धरली आहे ती अगोदर स्पष्ट केली पाहिजे. अनेक वाटा चुकल्या पण शेवटीं वाट सापडली असें आपण केव्हां म्हणतों, तर जायचें कोणत्या मुक्कामाला तो मुक्काम आधीं निश्चित झाला असेल तर! अर्थात् मुक्कामाची कल्पना तरी निदान कायमची स्थिर अशी पहिल्यापासून असावी लागते. म्हणजेच सामाजिक तत्त्वज्ञानाच्या परिभाषेंत बोलावयाचें म्हणजे समाजरचनेचीं मूलभूत अशीं ध्येयें तरी स्थिर अशीं पाहिजेत.

तुम्ही म्हणाल ध्येयांच्या कल्पनेंतहि क्रान्ति होत नाहीं असें तरी कुठें आहे? जुनीं ध्येयें चुकीचीं ठरून नव्या ध्येयांनीं त्यांची जागा पटकावली असेल, तर त्या ठिकाणीं क्रान्तीचा अवतार झाला असेल म्हटलें पाहिजे. ध्येय गाठण्याचे मार्ग जसे पुष्कळ चुकतात, आणि अनेक वेळां चुकल्या-फसल्यावरच खरा मार्ग गवसतो, तसेंच एके काळीं डोळ्यांपुढें ठेवलेलीं ध्येयें हींहि अन्य-काळीं चुकीचीं वाटावयास लागून, नवीं ध्येयें वर्तवावींसें वाटणार नाहीं असें थोडेंच आहे?

सामाजिक ध्येयाबाबत अशा प्रकारची नित्य उलथापालथ होऊं लागली, तर प्रगतीची ही कल्पनाच सोडून द्यावी लागेल. ध्येय गाठण्याचा पूर्वींचा मार्ग चुकला म्हणून तो सोडून देऊन दुसरा चोखाळण्यास प्रारंभ केला हें म्हणणें निराळें; आणि पूर्वींचीं ध्येयें चुकलीं म्हणून नवीन ध्येयाकडे दृष्टि वळविली हें म्हणणें निराळें. ध्येयें अशीं वरच्यावर बदलूं लागलीं तर आज इष्ट वाटणारें ध्येय तरी उद्यां बदलणारच नाहीं अशाविषयीं केव्हांच निर्वाळा देतां येणार नाहीं.

पण निर्वाळा देतां येणें आवश्यकच आहे असें मानावेंच कां? आजचें ध्येय उद्यां टिकणारें नसलें, तर त्याची निष्कारण चिंता आजच कशाला? उद्यांच्या समाजाला निराळें ध्येय हवें असेल तर त्याची चिंता उद्यांचा समाज वाहील. खरें आहे. पण आपाततः बदलणाऱ्या अशा या ध्येयामधून कोणतेंच सूत्र अनुस्यूत नसेल, तर सामाजिक इतिहास ही शब्दसंहति निरर्थक ठरेल आणि उत्क्रांति व प्रगति हे शब्द अर्थहीन ठरतील.

पण या तात्त्विक प्रश्नांच्या खोलांत न शिरतां, मानवी इतिहासाचा जो कालखंड, वाङ्मय, व पुरातन अवशेष यांच्या रूपानें उपलब्ध झालेला आहे त्या कालखंडांत जीं निरनिराळीं ध्येयें समाजापुढें होतीं, तीं सर्वस्वी विसदृश अशीं होतीं, कीं त्याच्यांत कांहीं परी लावतां येतील हे पाहिलें असतां असें आढळून येईल कीं, आजच्या स्वातंत्र्यसमतावादी समाजापुढें जीं ध्येयें आहेत, तीं ध्येयें प्राचीन काळींहि तत्कालीन बुद्धिमंतांना अवगत होतीं. आणि ध्येयसाधनेच्या बाबतींतहि ध्येयसाधनाचे निरनिराळे टप्पे आढळून आले, तरी त्यांच्यांतहि परिस्थितीच्या अनुकूलतेच्या साहाय्यानें विकास होत गेला आहे असें दाखवितां येईल.

## नीतिमत्तेचें अधिष्ठान

समाजधारणेचें मुख्य मौलीभूत तत्त्व म्हणजे समाजांतर्गत असंख्य व्यक्तींच्या हिताचा समन्वय करणें हें होय. हें साधण्याकरितां प्रत्येक व्यक्तीनें आपल्या स्वार्थास मुरड घालणें अपरिहार्यच ठरतें. जें सुख आपणास विलोभनीय वाटतें तें इतरांसहि तितकेंच वाटतें, आपणाप्रमाणें इतरांचाहि त्यावर तितकाच हक्क आहे ही जाणीव जागविणें हा नीतिमत्तेचा पाया होय. आजची

समतास्वातंत्र्याची घोषणा ही या तत्त्वाचीच परिणती होय. ही जाणीव आज सहस्रमुखानें बोलूं लागली असली तरी तिची योग्य ती कल्पना प्राचीनांना अज्ञात नव्हती. महाभारतकारांनीं नीतिमत्तेचें सारभूत प्रमेय म्हणून जें मांडले आहे तें हेंच कीं 'न तत्परस्य संदध्यात् प्रतिकूलं यदात्मनः' ज्या वागणुकीनें आपणांस सुख होईल त्याच वागणुकीनें इतरांस सुख होईल, ज्या वागणुकीनें आपणांस दुःख होईल त्याच वागणुकीनें दुसऱ्यासहि दुःख होईल या जाणिवेंतच नीतिमत्तेचा प्रारंभ होत असतो. वैदिक वाङ्मयांतील 'सह ना ववतु सह नौ भुनक्तु' ही कल्पना किंवा नाट्यवाङ्मयांतील भरतवाक्यांत प्रतिबिंबित झालेली 'सर्वे नः सुखिनः सन्तु सर्वे सन्तु निरामयाः' ही कल्पना हीहि आजच्या समाजधारणेच्या नीतिमत्तेच्या कल्पनेहून तत्त्वतः भिन्न नाही. अष्टादश पुराणांचें सारसर्वस्व काढून व्यासांनीं समाजापुढें मांडलें तें हेंच की, 'परोपकारः पुण्याय पापाय परपीडनम्'. नीतिमत्तेची यापेक्षां अधिक व्यापक व्याख्या कोणती असणार ?

ध्येयांत बदल झालेला नसला तरी ह्या ध्येयाला प्रत्यक्ष व्यवहारांत मूर्त स्वरूप देण्याविषयींचा आत्मविश्वास व तद्विषयक साधनें या बाबतींत मात्र आजच्या काळीं महत्त्वाचा फरक पडला आहे, आणि म्हणूनच आजचे स्वातंत्र्यसमतेचे प्रयोग हे ध्येयदृष्ट्या भिन्न नसले तरी प्रयोगदृष्ट्या पूर्वीच्याहून भिन्न होत. उदाहरणार्थ, समाजांतील संपत्ति ही एकाच वर्गाच्या जामदारखान्यांत जखडली जाणें अनिष्ट होय याची जाणीव प्राचीन समाजशास्त्रज्ञांनाहि होती. पण ही कोंडलेली संपत्ति समाजांत वाहती करण्याचे त्यांचे मार्ग मात्र आजच्याहून भिन्न होते. धनिकांना इहलोकीं कीर्ति व परलोकीं स्वर्गवास यांचें आमिष दाखविणें हाच त्यांचा मुख्य मार्ग होता. अमर्याद सत्ता, ऐश्वर्य, संपत्ति जोडलेल्या सम्राटानें विश्वजित् यज्ञ करावा व सर्व संपत्ति प्रजाजनांत वाटून टाकावी अशा प्रकारचा आदर्श ते मांडीत. हर्षवर्धनासारखा एखादा सम्राट् तो आदर्श कांहींसा प्रत्यक्ष व्यवहारांत उतरून दाखवीहि. या दानधर्मांत ब्राह्मण श्रमणांना बहुधा फार मोठा वाटा मिळत असावा, अंत्यजांची दादहि लागत नसावी हेंहि डोळ्यांआड करण्याचें कारण नाहीं. पण येथेंहि ध्येय चुकलेलें नसून व्यवहार चुकलेला होता असेंच म्हणावें लागेल.

या ध्येयाचा उपमर्द करणारीं प्रमेयेंहि मांडलीं जात नसत असें नाहीं. उदाहरणार्थ, या संपत्तिविभजनाच्या बाबतच मनूनें स्वच्छ प्रतिपादलें आहे कीं,

पैका कमविण्याची ऐपत असली तरीहि शूद्रानें केव्हांहि धनसंचय करतां कामा नये! 'शक्तेनापि हि शूद्रेण न कार्यो धनसंचयः' पण येथें हें लक्षांत घेतलें पाहिजे कीं, पुरोगामी सिद्धांताच्या जोडीला प्रतिगामी सिद्धान्त नेहमींच मांडले जात आलेले आहेत. **तेव्हां ध्येयसातत्याच्या दृष्टीनें पुरोगामी सिद्धांतावरच आपण आपली दृष्टि स्थिर केली पाहिजे.**

पुरोगामी ध्येय रंगविणाऱ्या प्राचीन समाजनेत्यांवर ढोंगीपणाचा आरोप करणेंहि गैरवाजवी होईल. असें म्हणणें चुकीचें होईल, कीं हे समाजनेते ध्येय मांडतांना मोठी उच्च भूमिका स्वीकारीत; पण प्रत्यक्ष व्यवहारांत मात्र कृपणाहून कृपण होत. खरी स्थिति अशी आहे कीं, कोणत्याहि काळांत ध्येयवादी व व्यवहारवादी यांची जोडी नेहमींच नजरेस पडते. पैकीं जे ध्येयवादी असतात ते आपली भूमिका केव्हांहि सोडीत नाहींत. आपलें ध्येय व्यवहारांत उतरविण्याला परिस्थिति अनुकूल नाही हें त्यांना माहीत असतें. सत्ताधीशाला वेसण घालणें हें तत्त्वज्ञाच्या शक्तीपलीकडचें आहे हें ते विसरलेले नसतात. पण आपणाला पटलेलें ध्येय छातीठोकपणें प्रतिपादन करण्यांत ते कचरतहि नाहींत. अगदीं अलीकडच्या काळांतील याचें उदाहरण द्यावयाचें म्हणजे तत्त्वाधिष्ठित सर्वसत्ताधारी राजाला देहान्त प्रायश्चित्त सांगणाऱ्या रामशास्त्री प्रभुणे यांचें देतां येईल. असलें प्रायश्चित्त घेण्यास राघोबादादा स्वप्नींहि तयार होणार नाहीं, व तें त्यास देवविण्याची आपल्या हातीं काडीचीहि सत्ता नाहीं या गोष्टी न दिसण्याइतका रामशास्त्री आंधळा नव्हता. किंबहुना सत्ताधीशाला देहान्त प्रायश्चित्त सांगणाऱ्याला स्वतःच तें प्रायश्चित्त घेण्याचा प्रसंग ओढवणेंहि अशक्य नाहीं हेंहि त्याला कळत असलें पाहिजे. पण तो ध्येयवादी होता. त्याने आपली तत्त्वनिष्ठा सोडली नाहीं.

## ध्येयवादी आपस्तंब

अशीच तत्त्वनिष्ठा प्राचीन ध्येयवाद्यांच्या ठायीं होती असेंच आपण मानलें पाहिजे. उदाहरण म्हणून पतिपत्नीचें नातें समान असावें कीं नाहीं हा प्रश्न घ्या. या प्रश्नावर व्यवहारवाद्यांनीं पत्नीचें नातें हें फारच दुय्यम दर्जाचें मानलें आहे. दुष्यंतानें शकुंतलेचा पत्नी म्हणून स्वीकार करण्याचें नाकारलें तेव्हां कालिदासाच्या कण्वशिष्यानें शकुंतलेच्या त्या केविलवाण्या स्थितींत तिला स्पष्ट

बजाविलें, कीं तुला परत माहेरीं येतां येणार नाहीं, पतिकुलांतच तुला राहिलें पाहिजे, मग दासी म्हणून राहिलीस तरी चालेल. पति हेंच स्त्रीचें दैवत होय असें पत्नीपुढें कंठरवानें प्रतिपादणाऱ्या व पत्नीच्या क्षुल्लक अपराधासहि कडक शिक्षा सांगणाऱ्या स्मृतिकारांनीं पतीला मात्र कडक शिक्षा सांगितलेली नाही. पण स्मृतिकारांतहि ध्येयवादी स्मृतिकार नव्हते असें नाही. उदाहरणार्थ, आपस्तंब ह्या स्मृतिकारानें या प्रश्नावर आपलें मत ठणठणीतपणें मांडलें आहे. त्यानें स्पष्ट प्रतिपादन केलें आहे कीं, पत्नीविषयक व्यतिक्रम जर पतीच्या हातून घडला तर त्याला पत्नीच्याप्रमाणेंच अद्दल घडेल अशी शिक्षा ठोठावली पाहिजे. ती कोणती? तर अशा पतीनें गाढवाचें कातडें पांघरावें, केसांची बाजू बाहेर करून पांघरावें, सात घरें भिक्षा मागावी व प्रत्येक घरीं आपल्या पापाचा पाढा वाचावा, आणि हा प्रकार सतत सहा महिने आचरावा! दारव्यतिक्रमी खराजिनं बहिर्लोम परिधाय सप्तागाराणि चरेत् सावृत्तिः षण्मासान्। ही शिक्षा आपस्तंबानें प्रत्यक्ष एखाद्या सत्ताधीशाला सुनावली असती तर काय झालें असतें याची कल्पना करण्यास मोठी प्रतिभा नको. ऋषिवर्य आपस्तंबाला कदाचित् वधस्तंभावरच लटकावें लागलें असतें. पण ध्येय स्पष्टपणें मांडलें गेलें हें कबूल केलें पाहिजे. तेव्हां स्वातंत्र्यसमतेचीं ध्येयें मांडण्यांत क्रान्ति झालेली नाहीं. सत्ताधीशाच्या सत्तेला लगाम घालून तीं ध्येयें व्यवहारांत आणतां येतील हा आत्मविश्वास मात्र नवा आहे.

नीतिनिमत्तेचीं कांहीं तत्त्वें तरी अचल राहिलेलीं आहेत याची कल्पना येण्यास "अहिंसा, सत्यं, अस्तेयं शौचं इंद्रियनिग्रहः" या श्लोकार्धांत सामाजिक नीतिमत्तेचीं जीं तत्त्वें मांडलेलीं आहेत तीं पहा; तीं सर्व आजहि अचल अशींच मानलीं जातील. या तत्त्वांपैकीं अहिंसा या तत्त्वाला प्राधान्य दिलें आहे तें सर्वस्वीं योग्य असेंच आहे. कारण अहिंसा हें समाजधारणेचें आद्य तत्त्व होय. ज्या व्यक्तींना, जातींना, राष्ट्रांना गुण्यागोविंदानें एकत्र नांदावयाचें आहे त्यांनीं एकमेकांची शारीरिक वा मानसिक हिंसा करण्यापासून अलिप्त राहिलें पाहिजे हें तत्त्व इतकें सुस्पष्ट आहे, कीं तें अंधासहि दिसावें. आपण सुधेपणानें वागत असतां दुसऱ्यानें आपल्यावर निष्कारण शस्त्र उगारलें तर त्याची गय करण्याचें कारण नाहीं, त्याला ठोकूनहि काढावा—"आततायिनं

आयान्तं हन्यादेव अविचारयन्" या वचनांत अहिंसेची मर्यादा व्यक्त झाली आहे. पण मूलभूत तत्त्व म्हणजे अहिंसा. या तत्त्वाचें पालन होण्यास इंद्रिय-निग्रह अथवा संयम हा अत्यावश्यक होय. या इंद्रियनिग्रहाच्याहि मर्यादा न ओळखल्यास त्याचें पर्यवसान इंद्रियें मारण्यांत होऊन अंतीं आत्मघातकी ठरेल. पण अतिरेकाचा निषेध केला तरी कोणत्याहि समाजाच्या धारणेला म्हणजेच नीतिमत्तेला इंद्रियनिग्रह अथवा संयम हा अवश्य आहे हें कोण नाकबूल करूं शकेल? वरील तत्त्वपंचकांतील उरलेलीं तीन तत्त्वें म्हणजे, सत्य, अस्तेय व शौच हीं तत्त्वेंहि समाजधारणेस नेहमींच उपकारक अशीं तत्त्वें होत. सत्य हें तर सर्व व्यवहाराचा केवळ प्राण होय. प्रामाणिकपणा जगांत नांदतो आहे हें गृहीत धरल्याशिवाय कोणताहि व्यवहार नांवारूपास येणार नाहीं. अस्तेय हा एक अहिंसेचाच प्रकार. दुसऱ्याचे धन लुबाडून गबर झालेल्या लक्ष्मीधराचें धन चोरण्यांत पाप मुळींच नाहीं असें प्रति-पादन करतां आलें तरी कष्टानें मिळवलेल्या धनाचा अपहार करणें पाप होय येवढें मान्य केलें म्हणजे अस्तेय हें तत्त्व म्हणून स्वीकारलें गेलेंच. शेवटचें तत्त्व जें शौच अथवा स्वच्छता तेंहि शाश्वत असें तत्त्व होय. चार माणसें एकत्र नांदावयाचीं म्हणजे प्रत्येकानें वैयक्तिक व सार्वजनिक स्वच्छतेचा नियम पाळला तरच आरोग्य नांदूं शकेल त्याचें विवरण करण्याचें कारणच नाहीं.

एवंच, अहिंसा, सत्य, अस्तेय, शौच व इंद्रियनिग्रह हीं जीं पांच तत्त्वें पूर्वाचार्यांनीं नीतिमत्तेचीं मूलभूत व स्थिर तत्त्वें म्हणून प्रतिपादलीं आहेत तीं आजतागायतहि अचलच आहेत व पुढेंहि तशींच राहतील असें दिसतें.

म्हणूनच नीतिमत्ता ही सर्वस्वीं चंचलस्वभावी आहे हें जें मत आजकाल प्रसार पावत आहे तें अवास्तव आहे. तें मत प्रसृत झाल्यास नीति-तत्त्वांना कांहीं धर नाहीं, तीं हवीं तशीं बदलतात असा विपरीत व समाज-घातक ग्रह होऊं लागेल.

मग नीतिनियम हे परिवर्तनशील आहेत या प्रचलित मताची उपपत्ति कशी लावावयाची? प्रचलित मत हें नुसतें अज्ञानग्रस्त मत म्हणून सोडून द्यावयाचें कीं काय? नाहीं; तसें कांहीं नाहीं. प्रचलित मत हें निराधार नव्हे. फक्त त्याचें खरें स्वरूप स्पष्ट ओळखलें पाहिजे. तें असें कीं नीतीचे नियम

बदलत आलेले आहेत, इतकेच नव्हे तर हा बदल कांही वेळा क्रान्तिकारक स्वरूपाचाहि झालेला आहे; पण नीतीचीं ऊर्फ समाजधारणेची ध्येयभूत तत्त्वें बदललेलीं नाहींत.

तत्त्वें बदललेलीं नाहींत पण **नियम** बदलले आहेत असें प्रतिपादन करणें म्हणजे निवळ शब्दच्छल होय असें सकृद्दर्शनीं कोणास वाटेल, पण खरा प्रकार तसा नव्हे. ध्येयभूत तत्त्वें आणि व्यावहारिक नियम यांत खरोखरच तफावत पडलेली आहे. उदाहरणार्थ, इंद्रियनिग्रह हें तत्त्व ध्या. हें तत्त्व मौलिक तत्त्व होय, पण त्यावरून वैवाहिक जीवनाबाबत नियम बनवितांना मात्र तो पत्नीच्या बाबतींत जितका कडकपणानें बनविला गेला तितका पतीच्या बाबतींत गेला नाहीं. अस्तेय हेंहि मौलिक तत्त्व होय. पण सत्ताधीशानें त्याला कधींच धूप घातला नाहीं. म्हणून सत्ताधीशाकरितां एक नियम आणि दुर्बलाकरितां दुसरा नियम असें अगदीं हिणकस स्वरूप या तत्त्वाला प्राप्त झालें. कोणत्याहि व्यापक तत्त्वाला सत्ताधीशाच्या अेररावीनें असें हीन स्वरूप येऊं शकतें. सत्ताधीशाला हितकारक ते न्याय आणि त्याला खुपणारे ते अन्याय असे जे नियम नीतिमत्तेंत घुसतात ते सर्व मौलिक तत्त्वांचे उपमर्द करणारे होत. प्लेटोनें थ्रॅसिमॅकस याच्या तोंडून हीच तक्रार वदविली आहे कीं जगांत न्याय कोणता समजला जातो तर सत्ताधीशाला उपकारक असेल तो. Justice is the interest of the stronger.

मौलिक व अचल अशा नीतितत्त्वांची वरीलप्रमाणें अवहेलना होण्याचें कारण म्हणजे हीं तत्त्वें सत्ताधीशांच्या गळीं उतरविण्याच्या बाबतींतील समाजाची असहाय स्थिति ही होय. **तर यापुढें नीतिमत्तेला सत्ताधीशाच्या सत्तेची नांगी मोडून त्याला निर्विष कसा करावयाचा याचाहि प्रामुख्यानें विचार करावा लागेल.** पण नीतिमत्तेला बेगुमानपणें लाथाडणाऱ्या सत्ताधीशाची सत्ता मोडून पडल्यावर जीं नीतितत्त्वें कायमचीं अचल म्हणून शिल्लक राहतील तीं म्हणजे वरील अहिंसापंचकांत समाविष्ट केलेलींच होत. आणि सत्तेच्या सर्पाचे दांत उपटून काढावयाचे तेहि कां तर त्यानें लोकांची हिंसा करूं नये, लोकाना लुबाडूं नये, लोभी वृत्तीला मर्यादा घालावी म्हणजेच अहिंसा-सत्यादि मौलिक तत्त्वांचा प्रतिपाल व्हावा म्हणूनच ना ?

तेव्हां व्यावहारिक क्षेत्रांत सत्ताधीशाच्या डोळ्यांकडे नजर ठेवून नीति-नियमांनीं दुटप्पी वर्तन केलेलें असलें तरी समाज-धारणेचीं तत्त्वें म्हणून अहिंसादि तत्त्वें अचल राहिलेलीं आहेत. ह्या गोष्टीकडे आजच्या काळीं समाजाचें मुद्दाम लक्ष वेधलें पाहिजे. तसें तें वेधलें म्हणजे नीतितत्त्वें अथवा समाज धारणेचीं तत्त्वें हीं हवीं तशीं बदलत आलेलीं आहेत हा मिथ्याग्रह नष्ट होईल.

हा मिथ्याग्रह वैवाहिक नीतिमत्तेच्या बाबतींत विशेष प्रभावी दिसतो. वैवाहिक नीतिमत्ता ही ज्या संयमावर अधिष्ठित आहे त्या संयमाचें तत्त्व हें अचल तत्त्व होय. पण त्या तत्त्वाला आजच्या विवाहसंस्थेंत दोन तऱ्हेनें विकृत स्वरूप प्राप्त झालें आहे. एक म्हणजे या तत्त्वाचें फाजील स्तोम माजविलें गेलें आहे; इतकें कीं, त्यांत व्यक्तिमत्त्वाची गळचेपी केली जात आहे. एकनिष्ठपणा हा गुण असला तरी केवळ विवाहविधीनें बद्ध झालें एवढ्याकरितां कसल्याहि विसदृश सहचराशीं जन्म काढावा लागणें म्हणजे संयमाचा अंत पाहणेंच होय. संयमाला आलेलें दुसरें विकृत स्वरूप म्हणजे त्याचा दुटप्पीपणा. पतिपत्नीपैकीं संयमाच्या परिपालनाची खरी सक्ती फक्त पत्नीवर आणि पतीला फक्त त्याची शिफारस. यामुळें वैवाहिक नीतिमत्तेला हीन स्वरूप प्राप्त झालें आहे. या नीतिमत्तेविरुद्ध आज समाजांत उठूं पाहणारी ओरड ही त्याची प्रतिक्रिया होय. संयम म्हणजे स्वातंत्र्यावरील बंधन. हें बंधन जितकें कमी करतां येईल तितकें कमी करणें इष्ट होय; पण तसें तें केलें तरी कांहीं प्रमाणांत संयम हा अचल तत्त्व म्हणून कायम राहीलच. कारण अनेक लोक एकत्र नांदावयाचे म्हणजे त्यांनीं आपल्या स्वार्थी भावनांना लगाम घातला म्हणजेच संयमाचा अवलंब केला तरच नांदूं शकतील.

— समाप्त —

# सूची

( आकडे पानांचे )